# brown book

## THE BOOK WAS DRENCHED

# प्रास्ताविक



सहा वर्षांपूर्वी ' नवनीत रामायण ' नांवानें एक पुस्तक मीं प्रकाशित केलें होतें. संतांच्या मराठी रामायणांतील वेगवेगळ्या प्रसंगींचे सुंदर उतारे मधेंमधें गुंफून मीं त्यांत रामायणाची समग्र कथा संक्षेपानें सांगितली होती. अशाच प्रकारचें महाभारतावरहि एक पुस्तक लिहावें असें त्या वेळेपासून मनांत घोळत होतें तें आजच्या घटकेला मूर्त स्वरूपांत येत आहे.

या पुस्तकांत इतर अवांतर विस्तार गाळून केवळ भारतांतली मुख्य कथा म्हणजे कौरव-पांडवांचा इतिहास संक्षेपानें दिलेला आहे. भारती कथा विद्यार्थ्यांना थोडक्यांत पण सगळी कळावी, एवढेंच धोरण ठेवलेलें आहे.

विस्तारानें दिले आहेत ते मराठी कवींच्या भारतविषयक काव्यांतले वेगवेगळे उतारे.

कविवर्य मोरोपंत यांनीं समग्र महाभारत आर्यावृत्तांत रचलें आहे. कोणत्याहि कीर्तनकाराचें कीर्तन पंतांच्या आर्येवांचून रंगलें नाहीं असा त्याचा लौकिक आहे. श्रीधरकवीचा पांडवप्रताप तर सर्वविश्रुतच आहे. जुन्या काळीं बहुधा तो घरोघर वाचला जात असे. मुक्तेश्वरकवीनें महाभारताचीं पहिलीं चार पर्वें आणि शेवटाकडचें सौप्तिकपर्व एवढीं ओवीछंदांत रचलेलीं आहेत. हें मुक्तेश्वरी अर्धेमुर्धें भारत म्हणजे साहित्यसुवर्णाची खाणच आहे. याशिवाय वामनपंडित, रघुनाथपंडित इ. कवींनीं भारतांतल्या वेगवेगळ्या आख्यानांवर स्फुट काव्यरचना केली आहे ती वेगळीच.

या पुस्तकांत या कविश्रेष्ठांच्या काव्यांतले वेगवेगळ्या प्रसंगांचे उतारे गुंफले आहेत, ते त्यांच्या या विशाल काव्यांची विद्यार्थ्यांना तोंडओळख व्हावी म्हणून. थोडक्यांत म्हणजे हें पुस्तक काव्यनवनीत आहे. या उताऱ्यांतून साहित्यांतल्या नवरसांचा साक्षात्कार होण्याजोगा आहे.

संत कवी म्हणजे ज्ञानेश्वर–तुकारामादिक आणि पंत कवी म्हणजे मोरोपंत–वामनादिक. या दोन्ही प्रकारच्या कविश्रेष्ठांनीं आपली मराठी भाषा घडवली

आहे आणि तिला वैभवहि मिळवून दिलें आहे. मराठीचा अभिमान आपल्याला आहेच. कारण ती आपली मातृभाषा आहे. पण तो अभिमान सार्थ करायचा तर प्रत्येक विद्यार्थ्यानें या संत-पंतांच्या काव्यांचा यथाशक्ति अभ्यास करायलाच हवा. प्राकृत काव्यांच्या अभ्यासावांचून मराठीचें मराठीपण आपल्याला कळणारच नाहीं.

रामायण – महाभारत हे भारताचे सह्य-विंध्यांएवढे उंच आणि सागराइतके विशाल असे इतिहासग्रंथ आहेत. भारतीय संस्कृतीनें जे जे गुण सद्‌गुण मानून गौरवले, त्या प्रत्येकाचा एकेक मानवी उच्च आदर्श या ग्रंथांत पहायला मिळेल. प्रयत्नवादी भगीरथ, एकवचनी रामचंद्र, सत्याचा पुतळा धर्मराज, बळाचा हिमाचल भीम, दानेश्वर कर्ण, बंधुप्रेमाचा आदर्श भरत, सेवामूर्ति हनुमंत, महासाध्वी सीता-द्रौपदी इत्यादि इत्यादि.

भारताची संस्कृति यांनीं घडवली आहे. भारताला मोठेपण यांनीं दिलें आहे. भारताचा उत्कर्ष यांनीं केला आहे. आज आपण पारतंत्र्याच्या शृंखला तोडून स्वतंत्र झालों आहों. आपलें वनपर्व संपलें आहे. यापुढें उद्योगपर्व सुरू व्हायचें आहे. आपल्याला भारताची नवी उभारणी करायची आहे. अशा वेळीं वर उल्लेखलेले खास भारतीय असे उज्ज्वल आदर्श आपल्या दृष्टीपुढें हवेत.

आज आपण आपल्या देशाचें ' भारत ' हें प्राचीन नांव पुनरपि धारण केलें आहे. अर्थात् आपली संस्कृति, आपलें तत्त्वज्ञान, आपले आचार-विचार आपले आदर्श, हें सगळें भारतीयच असायला हवें हें सांगायला नकोच. यासाठीं प्रत्येक भारतीयानें कोणत्याना कोणत्या तरी रूपांत महाभारताचा परिचय करून घ्यायलाच हवा. हें लहानसें पुस्तक त्या कामीं रोचनार्थ म्हणून उपयोगी पडेल असा भरंवसा आहे.

पुणें,<br>ता. १।५।१९५३

—लेखक



श्री. विद्याधर हरि दामले

आणि

श्री. सौ. रुक्मिणीबाई दामले

यांस स्नेहपूर्वक अर्पण.

— महादेवशास्त्री जोशी

# अनुक्रमणिका








मुखपृष्ठ – श्री. दीनानाथ दलाल, मुंबई.

आंतील चित्रें – श्री. भय्यासाहेब ओंकार, पुणें.

# आदिपर्व

महाभारत हा भारतीय वाङ्मयांतला प्रधान ग्रंथ आहे. त्याला समुद्राचीच उपमा शोभेल. कौरव-पांडवांचा इतिहास हा त्याचा मुख्य भाग. शिवाय अनेक आख्यानें-उपाख्यानें यांच्या नद्या त्याला येऊन मिळाल्या आहेत. भगवान् वेदव्यासांनीं हा रचला. याचीं अठरा पर्वें आहेत. प्रत्येक पर्व आपापल्यापरी रसाळ आहे. मानवी स्वभावाचे अनेक नमुने आणि त्यांचे संघर्ष यांत आढळतात. प्रचलित कथेला धरून राजकारण, समाजकारण, तत्त्वज्ञान, धर्म यांची अंगोपांगांनीं यांत चर्चा केलेली आहे. लहान लहान कथांच्या द्वारें नीतितत्त्वें मनावर बिंबवलेलीं आहेत. मानव आणि दानव, देव आणि गंधर्व, ब्रह्मर्षि आणि देवर्षि, नाग आणि पन्नग, या सर्वांचा संबंध यांत आलेला आहे आणि त्यामुळें हा ग्रंथ उत्तुंग आणि विशाल झाला आहे. या ग्रंथामुळेंच 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वम्' अशी म्हण पडली. कारण यांत व्यासांची दिव्य प्रतिभा सर्व विषयांना स्पर्श करून गेली आहे. 'जें भारतांत आहे तेंच इतर सगळीकडे आहे आणि जें भारतांत नाहीं तें कुठेंच आढळायचें नाहीं' अशी याची ख्याति आहे. या ग्रंथामुळें भारतीय वाङ्मयाला तेज आलें. या ग्रंथामुळेंच भारतीय संस्कृतीचा सर्वांगीण विकास आणि मोठेपणा जगाच्या निदर्शनाला आला. विश्वाला वंद्य झालेली भगवद्गीता याच महाभारतांत आहे. भारत हें अठरा पाकळ्यांचें कमल आणि गीता हा त्यांतला मकरंद असें श्रीज्ञानेश्वर म्हणतात.

असा हा सर्वश्रेष्ठ ग्रंथराज संतवाणीच्या आधारें पण थोडक्यांत निवेदन करावयाचा आहे. यांत वाचकांना भारतीय कथेबरोबरच महाराष्ट्रसंतांच्या रसाळ काव्याचाहि आस्वाद मिळावा असा दुहेरी उद्देश मनांत धरलेला आहे. तो उद्देश सिद्धीला जावा म्हणून प्रथमारंभीं मुक्तेश्वरांच्या रसवंतीनें मंगलाचरण करतों.

## मंगलाचरण

आतां बालार्क बीजकंदीं स्कंधीं विरूढला[1] हस्तपादीं
सगुण सुरंगाचा उदधि गजानन नमियेला १

दिसे सजीव कनकाचळें स्वरूप धरिलें सहज लीळें
ऋद्धिसिद्धीचीं स्वर्गफळें भोगभरितें जयापाशीं २

देव ऋषिगणांचे पौळे[2] भोगिती स्वर्गापवर्ग[3] फळें
प्रसाद ओपिलिया वेगळे चिदानंद मोदक ३

कृपामंदाकिनीच्या जीवनें चतुर्दशविद्या नंदनवनें
पाल्हेजैती[4] तेथें सुमनें साधक झाले षट्पद[5] ४

दंतदिनकराची दीप्ती पळे विघ्नांधकार राती
नानादर्शनें[6] दीपावती जो मध्यस्थ गुरुत्वें ५

निर्जर[7] भयें जर्जर होती ते ज्याचेनि आश्रयें जिती
तो माझिये दुर्बळ मती होऊ उन्मेषधनदाता[8] ६

आतां सरस्वती फलसंभारीं कल्पलतिका अति साजिरी
ज्ञानगंगा जे ब्रह्मगिरी वेश ब्रह्मकुमरीचा ७

त्रैलोक्यलावण्यनगरी शृंगारश्रीपर्वतभ्रमरी
साहित्यबाणालिंगाचे शिखरीं विशाळ नदी नर्मदा ८

प्रमेय पोतें साची रंभा विद्या मूळपीठ जगदंबा
चातुर्य सौभाग्याची शोभा कुलस्वामिणी कवींची ९

---

१ वाढला. २ मेळे. ३ स्वर्ग-मोक्ष. ४ प्रफुल्लित. ५ भ्रमर.
६ मीमांसा वगैरे. ७ देव. ८ ज्ञान.

नवरसांची मंदाकिनी महिमें वाहे त्रिभुवनीं
त्रैलोक्यातें वरदायिनी देवत्रया पोंढियंती[1] १०

वीणापुस्तकधारिणी दुःख दारिद्य परिहारिणी
जे पांडित्यदानें सुखकारिणी ते वंदिली शारदा ११

तिनें अनुग्रहाचा त्वरित शिरीं ठेविला वरदहस्त
म्हणे तुझा मनोरथ सर्वदा सुफळ माझेनि १२

आतां कथेचें अन्नसत्र घाली विश्वामाजी पवित्र
तेथें स्वामिनी मी स्वतंत्र पोइकी[2] मात्र त्वां कीजे १३

— मुक्तेश्वरकृत, म. भा. अ. १

जनमेजय राजा कुरुक्षेत्रांत सत्र करीत होता. एक दिवस त्याच्या यज्ञमंडपांत सरमा नांवाच्या कुत्रीचें पोर आलें. जनमेजयाच्या भावांनीं त्याला काठीने मारतांच तें रडत आईकडे गेलें. त्याच्या कळवळयानें सरमेनें येऊन जनमेजयाला शाप दिला कीं, 'तुझा याग सिद्धीला जाणार नाहीं.' जनमेजय उद्विग्न झाला. त्यानें मग सोमश्रवा नांवाचा विघ्नहर्ता पुरोहित वरला.

## धौम्य मुनीचे तीन शिष्य

धौम्य नांवाच्या ऋषीजवळ आरुणि, उपमन्यु व वेद हे तीन शिष्य अध्ययन करीत होते. त्या तिघांचीहि त्यानें तीन प्रकारें कठोर परीक्षा घेतली. आरुणीला सांगितलें कीं, 'ओढ्याला बांध घालून शेतांत पाणी आण.' तो त्या कामाला लागला; पण कांहीं केल्या बांध टिकेना. शेवटीं तो स्वतः तिथें आडवा पडला. उपमन्यूला गायी राखण्याची आज्ञा झाली. धौम्य त्याला शिधोरी न देतां रानांत पाठवी. तो प्रथम भिक्षा मागून, नंतर गाईचें दूध पिऊन आणि सरतेशेवटीं वासरांच्या तोंडांतून गळलेला दुधाचा फेस चाटून दिवस काढूं लागला. पण

---

१ आवडती. २ दास्य.

गुरूनें या सर्व प्रकारांना बंदी केली. तेव्हां एक दिवस भुकेची आग असह्य होऊन त्यानें रुईचा चीक प्राशन केला. त्यामुळें तो आंधळा होऊन एका विहिरींत पडला. गुरूच्या आज्ञेनें अश्विनीकुमारांचें ध्यान केल्यावर त्याला दृष्टि परत मिळाली. वेद नांवाच्या शिष्याकडून धौम्यानें परोपरीची सेवा घेतली. हे तिघेहि शिष्य मग गुरुकृपेनें कृतार्थ होऊन आपापल्या घरीं गेले.

वेदानें उत्तंक नांवाच्या एका शिष्याला विद्या पढविली. तो जेव्हां स्वगृहीं निघाला तेव्हां गुरुपत्नीनें, 'पौष्यराजाच्या भार्येचीं दिव्य कुंडलें मला आणून दे' अशी त्याच्याजवळ गुरुदक्षिणा मागितली. तो त्या राजाकडे गेला. राजानें कुंडलें त्याच्या हातीं देऊन त्याला सांगितलें कीं, 'तक्षकाचा यांच्यावर डोळा आहे, तेव्हां सांभाळून ने.' उत्तंक तिथून निघतांच तक्षक यतिवेषानें त्याच्या पाठीस लागला. एका तळ्याच्या कांठीं कुंडलें ठेवून तो पाणी पिण्यासाठीं आंत उतरला. इतक्यांत तक्षकानें तीं पळविलीं. तो भूमीच्या विवरांतून आंत गेला हें पाहून उत्तंक काठीनें भूमि खणूं लागला. इंद्रानें त्याला साहाय्य केलें. तो पाताळांत जातांच एक पुरुष आणि एक घोडा त्याला दिसला. पुरुषानें उत्तंकाला घोड्याचें अपानद्वार फुंकायला सांगितलें. त्यानें तसें करतांच पाताळांत आग आणि धूर यांचे लोळ उठले. सर्प भयभीत झाले आणि तक्षकानें तीं कुंडलें आणून उत्तंकाच्या स्वाधीन केलीं. उत्तंकानें तीं आणून गुरुभार्येला समर्पण केलीं.

## प्रमद्वरेला सर्पदंश

प्रमद्वरा नांवाची एक गंधर्वकन्या स्थूलकेश ऋषीनें पाळली होती. भृगुकुलांत जन्मलेल्या रुरु नांवाच्या एका तरुण ऋषिकुमाराचें तिच्यावर मन जडलें. पुढें वडिलांच्या संमतीनें दोघांचा वाङ्‌निश्चय झाला; पण लग्न होण्याच्या आधीं एक दिवस तिला सर्पदंश होऊन ती मृत झाली. रुरु तिचें प्रेत मांडीवर घेऊन आक्रोश करूं लागला. त्याच वेळीं वरून विमानांतून जाणाऱ्या एका देवदूताला त्याची दया आली. त्यानें यमाशीं रदबदली केली. रुरूचें अर्धें आयुष्य तिला मिळाल्यास ती उठेल असें यम म्हणाला. रुरूनें तसें करतांच ती सजीव झाली.

त्या दिवसापासून तो सर्पांचा वैरी बनला. दिसेल त्या सापाला काठीनें ठेंचायचें असा त्यानें सपाटा लावला. असाच एक दिवस डुंडुभ नांवाच्या अजगराला तो मारायला धावला असतां डुंडुभ त्याला म्हणाला, ' तूं मला मारूं नकोस. जनमेजयाच्या सर्पसत्रांत सगळ्या सर्पांचा संहार होईल. मी सर्प नसून ऋषि आहे. शापामुळें मी या दशेला आलों होतों; पण आज तुझ्या दर्शनानें माझा उद्धार झाला ! '

## जरत्कारूची कथा

जरत्कारु नांवाचा एक ऋषि गृहस्थाश्रम न स्वीकारतां ब्रह्मचर्यानेंच राहिला होता. एक दिवस तो अरण्यांत संचार करीत असतां आपले पितर एका खळग्यांत उलटे लोंबकळत असलेले त्यानें पाहिले. कारण विचारतांच त्यांनीं सांगितलें कीं, ' तूं विवाह केला नाहींस ; त्यामुळें तुझ्यानंतर आमचा वंश खंडित होणार आहे. तुला पुत्र झाला तरच आमची अधोगति थांबेल ! '

रुरु म्हणाला कीं, ' माझ्याच नांवाची एखादी मुलगी मला मिळेल तरच मी लग्न करीन. ' पण दैवयोगानें वासुकिनागाची बहीण त्याच नांवाची होती ती त्यानें जरत्कारुला दिली. तिच्या पोटीं जरत्कारुला आस्तिक नांवाचा पुत्र झाला व त्यानें सर्पांचें रक्षण केलें.

## कद्रू आणि विनता

कद्रू आणि विनता या दोघी दक्षाच्या कन्या व कश्यपाच्या भार्या. त्या दोघींमध्यें सवतीमत्सर पुष्कळच होता. त्यांनीं कश्यपाची सेवा करुन त्याच्याकडून पुत्र मागून घेतले. कद्रूला एक हजार व विनतेला दोन पुत्र होतील असा वर मिळाला. कद्रूनें एक हजार व विनतेनें दोन अंडीं घातलीं. पांचशें वर्षांनीं कद्रूचीं अंडीं फुटून त्यांतून सर्प निघाले. आपलीं अंडीं अजून उकलत नाहींत म्हणून विनता अधीर झाली व तिनें एक अंडें फोडलें. त्यांतून अरुण जन्माला आला. त्याचें कमरेपासून खालचें शरीर अद्याप बनायचें होतें. त्यामुळें तो पांगळा निपजला. त्याला आपल्या आईचा या गोष्टीबद्दल राग आला आणि त्यानें तिला शाप दिला. ' जिच्या मत्सरानें तूं मला अर्धवट जन्मास

घातलेंस त्याच कद्रूची तूं एक हजार वर्षें दासी होशील. दुसरें अंडें जर जतन केलेंस तर त्यांत जन्म घेणारा गरुड महाप्रतापी निपजेल आणि तो तुला दास्यमुक्त करील.' इतकें बोलून तो निघाला आणि त्यानें सूर्याच्या रथावर सारथ्य स्वीकारलें.

## समुद्रमंथन

दुर्वासऋषीच्या शापानें इंद्राचें ऐश्वर्य खलास झालें. देवांना अवदशा आली. ते सर्व विष्णूला शरण गेले. विष्णूनें सांगितलें कीं, 'दैत्याना सांगातीं घेऊन समुद्राचें मंथन करा म्हणजे अमृतासह चौदा रत्नें त्यांतून निघतील आणि तुमचे क्लेश हरतील.' तें ऐकून इंद्र बळीजवळ आला. त्यानें या कामीं त्याची संमति मिळविली. मिळालेलें अमृत देव-दैत्यांनीं वांटून घ्यावें असें ठरलें. मंदराचळाची केली रवि. वासुकीची केली दोरी. देवांनीं शेपटीच्या बाजूनें आणि दैत्यांनीं मुखाच्या बाजूनें वासुकीला धरून क्षीरसागराचें घुसळण मांडलें.

भोंवरी देतां मंदराचळ भोंवों लागला विरिंचिगोळ
सप्त लोक सप्त पाताळ ताळ तोडिती भूकंपें १

पोट रगडतां, व्यालवदनीं अग्निज्वाळा लागली गगनीं
गरळ वमितां सिंधूचें पाणी कढों लागलें खळखळां २

स्फुलिंग लागतां अळुमाळ[1] यंत्रमुखीं उठती ज्वाळ
तोविं ओढितां सांडी व्याळ विषानळ भडभडां ३

तप्त कांचनरसाचा लोट तेविं फूत्कारी काळकूट
वर्षतां दैत्यांचे संघाट[2] जळों लागले त्या वेळीं ४

विषमिश्रित सिंधूदकीं जळचर जाती हो अनेकी
संहारल्या तया लेखी महाप्रळय कोण पां ! ५

१ थोडासा. २ समुदाय.

न सांठत सागरजीवनीं    काळकूट उसळे गगनीं
तेथें अहीच्यां[1] आहाळेंणीं[2]    विश्व पोळों लागलें    ६

अमृताची धरितां आस    प्राप्त झालें पहिलें विष
देवीं ऋषीं मानूनि त्रास    महादेव स्तवियेला    ७

कृपार्णव तो जगरक्षक    विरूपाक्ष झाला विषभक्षक
जैसा शांतीनें सात्त्विक    प्रबळ क्रोधा आकळी    ८

निरुपम महिमा हर विश्वात्मा    ग्रीवे[3] सांठवी गरळाची गरिमा
तेणें ग्रीवे पातली नीलिमा    नीलकंठ या हेतु    ९

विषबाधा शमलियावरी    अवघे गर्जोनि जयजयकारीं
ओढिते झाले मंदरगिरी    पुनरपि देव-दानव    १०

तंव मागोनि देदीप्यमान    श्वेत कमंडलु उरीं धरून
परमामृतें भरूनि पूर्ण    धन्वंतरी निघाला    ११

तो सुधारस देखतां दृष्टीं    सकळां स्वार्थ सारिखा पोटीं
सुरासुरांचिया थाटी[4]    उतावीळ धाविन्नल्या    १२

'माझें माझें' म्हणत वरी    उड्या पडल्या एकसरीं
तेथें अंगबळें असुरीं    अमृतकुंभ हिरतला    १३

देव उठावले झुंजारीं    परि अमृत शिरकलें असुरकरीं
इंद्र हृदय पिटी करीं    काज नासलें म्हणोनि    १४

ऐसें विषम देखोनि तेथ    विबुधवरद वैकुंठनाथ
मोहिनी-अवतार धरूनि त्वरित    प्रगट झाला ते काळीं    १५

१ वासुकीच्या. २ जळण्यानें. ३ कंठांत. ४ समाज.

असो; ऐसी विश्वमोहिनी मूळमायेची[1] कुळस्वामिनी
सुरासुर देखतां नयनीं पतंगप्राय दीपले १६

अवलोकितां कंदर्पकोटि सांडणें होतसे चरणांगुष्ठीं
त्रैलोक्यलावण्याची पेटी देवां दैवें उघाडिली १७

झळकतां दंतपंक्तींचा रंग पाषाण होती पद्मराग
स्मित होतां भूतळीं चांग रत्नराशी विखुरती १८

पाय ठेवितां महीमंडळीं सुवर्णकमळें सहस्रदळी
उगवती तेथें परागधूळी— माजी लोळे वसंत १९

ते चातुर्यचंपककळिका शृंगारकासारमराळिका[2][3]
नाना कैवल्य कनकलतिका वैकुंठींहूनी उतरली २०

ब्रह्मांडकरंडाबाहेरी अंगींचा परिमळ धांवणें करी
वेधकाचिया चित्तभ्रमरी यात्रे आणी त्या ठायीं २१

नाना कटाक्षांचे जाळीं असुर समुदावो सागरजळीं
मनोमत्स्य एककाळीं वेधोनि पाशीं गोविले २२

—मुक्तेश्वरकृत, म. भा. आ. प. अ. ४

मोहिनीच्या रूपाला दैत्य भाळले. त्यांनीं अमृतकुंभ तिच्या हातीं दिला. तिनें कपट करून देवांना अमृत पाजलें. उरलेला अमृताचा घडा इंद्रानें पळविला. त्यामुळें दैत्य खवळले. उभयपक्षांत युद्ध माजलें. देवांनीं दैत्यांचा पराभव केला.

१ आदिशक्ति. २ तळें. ३ हंसी.

## गरुडाचा जन्म आणि पराक्रम

समुद्रमंथनांतून निघालेला उच्चैःश्रवा कोणत्या रंगाचा आहे याबद्दल कद्रू आणि विनता या दोघींत वाद माजला. विनता म्हणाली, 'शुभ्र आहे,' तर कद्रू बोलली, 'त्याचें पुच्छ काळे आहे.' शेवटीं जी हरेल तिनें दुसरीचें एक हजार वर्षें दास्य करावें अशी पैज ठरली. त्या पैजेंत विनता हरली आणि कद्रूची दासी झाली. पांचशें वर्षें तिनें कद्रूचें दास्य केलें. पुढें तिचें दुसरें अंडें फुटून त्यांतून गरुड जन्माला आला. तो महापराक्रमी निघाला. त्याला आपल्या आईची दुर्दशा पहावेना. 'तुम्हांला काय दिलें म्हणजे तुम्ही माझ्या आईला दास्यमुक्त कराल,' असें त्यानें सर्पांना विचारलें. त्यांनीं अमृतकुंभ आणून देण्याबद्दल त्याला सांगितलें. गरुडानें तिथून उड्डाण करून इंद्राची अमरपुरी गांठली. इंद्राचें आणि त्याचें घनघोर युद्ध झालें. त्यांत तो विजयी झाला. त्यानें अमृतकुंभ आणून सर्पांपुढें ठेवला आणि मातेला स्वतंत्र केलें. सर्प स्नान करून अमृत प्राशन करायला येतात तो इंद्रानें अदृश्य रूपानें तो कुंभ हरण केला. गरुड नंतर श्रीविष्णूचें वाहन झाला.

## जनमेजयाचें सर्पसत्र

परीक्षिति राजा तक्षकाचा दंश होऊन मेला हें पाहून त्याचा पुत्र जनमेजय यानें सर्पसत्र करून सगळे सर्प यज्ञांत जाळून टाकावे असें ठरविलें. त्यासाठीं त्यानें अनेक ऋषींना पाचारण केलें. ऋषींनीं यज्ञकर्म आरंभिलें. कुंडांत अग्नि प्रज्वलित केला. 'स्वाहा' म्हणून अवदानें घालूं लागतांच मोठमोठाले साप येऊन अग्नींत पडूं लागले. असंख्य सर्पांचा संहार झाला. शेवटीं तक्षकावर पाळी येतांच तो इंद्राच्या आश्रयाला गेला. इंद्रानें उत्तरीय वस्त्राप्रमाणें त्याला गळ्याभोंवतीं गुंडाळला.

आपल्या कुळाचा असा सत्यानाश होत असलेला पाहून जरत्कारूनें आस्तिकाला गळ घातली. तो जनमेजयाकडे आला. इंद्र तक्षकाला सोडीत नाहीं असें पाहून 'इंद्रासह तक्षकाची आहुति द्या' असें त्या वेळीं जनमेजय ऋषींना सांगत होता. ऋषींनीं तसें केलें. इंद्राचें आसन डळमळलें. आपल्यावर अरिष्ट कोसळतें असें पाहून इंद्रानें तक्षकाला सोडून दिलें. तो आकाशांतून

वेगानें खालीं येऊं लागला. आस्तिकानें त्याला तपःसामर्थ्यानें वरच्यावर रोखून धरलें आणि जनमेजयाकडे सत्र थांबविण्याबद्दल मागणी केली. जनमेजयानें त्याचा उपदेश ऐकला. तक्षकासह बाकीचे सर्प वांचले.

नंतर जनमेजयानें सभेंत बसून ऋषींना आपल्या पूर्वजांची कथा सांगण्याची विनंति केली. इतक्यांत व्यासमुनि तिथें आले. त्यांनीं वैशंपायन नांवाच्या आपल्या शिष्याला महाभारत कथन करण्याची आज्ञा केली. त्यानें कथेला प्रारंभ केला.

## दुष्यंत आणि शकुंतला

कौरववंशीं विख्यातकीर्ति　　दुष्यंतनामा गुणैकमूर्ति
श्रेष्ठ भूपाळ चक्रवर्ती　　वीर्यें शौर्यें आगळा[1]　　१

विष्णुसमान सत्ताबळ　　प्रतापें जैसा सूर्य तजाळ[2]
धरातुल्य सहनशीळ　　अक्षोभ जैसा सागरु　　२

सप्तसमुद्रींचे लोट　　धरामंडळीं एकवट
ऐसे सेनेचे संघाट　　घेऊनि वना चालिला　　३

कनकरत्नीं निरवाळेलीं　　गोपुरें गगन भेदीत गेलीं
तेथें वळघोनि पाहों ठेलीं　　कामिनीवृंदें आवडी　　४

चंद्रमंडळीं पिकली धरणी　　तैशा श्वेतछत्राच्या उभारणी
रत्नकळसाचिया किरणीं　　कवि[3] गुरु[4] दोन्ही लोपले　　५

कनककुसुमें कनकताटीं　　आवडी धरूनि करसंपुटीं
अवलोकूनि राजमुगुटीं　　पुष्पांजुळी सांडिती　　६

एकीं अवलोकितां नयनें　　म्हणती, 'निवालीं अंतःकरणें'
एक म्हणती, 'पंचबाणें　　चित्तकुरंग वेधिला'　　७

---

१ मोठा.　२ कांतिमान.　३ शुक्र.　४ बृहस्पति.

शोभासंपत्तिसमुद्र वाद्यगजरीं नृपनरेंद्र
नगर टाकोनि चालिला इंद्र- नंदनवना पैं जैसा ८

आशीर्वाद घेऊनि द्विजां मागां परतवी सहित प्रजा
जनप्रदेश लंघोनि पैजा महावनीं प्रवेशे ९

प्रस्थानभेरीच्या[1] गर्जनें वीरमुखींचीं आस्फोटणें[2]
तडैकयंत्रें[3] फुटती तेणें महावनचर बुझाले १०

कोंडले देखोनि चौफेरीं मुसंडी मारिती राजमारीं
ते वधिजेती शस्त्रशरीं महावीरीं असंख्य ११

पारधी खेळावयाची हांव श्वापदें साधावयाचे भाव
सरकैचौकाचें[4] लाघव लपणीं छपणीं धांवती १२

ऐसा करीत विद्याकुशळ रायें खेळोनि मृगया-खेळ
फळें आणोनि महासुकाळ सकळदळ तोषविलें १३

अवलोकोनियां तें वन तंव देखिलें कश्यपारण्य
राजा करी पुढारें गमन सिद्धसाधकीं वसविलें १४

नदी मालिनी पवित्रजीवनी वाहे जैसी देवतटिनी[5]
तरंगळिंगें सुफेन सुमनीं सुपूजित शोभती १५

तिच्या तटाकीं असंख्यात संशितव्रती[6] वानप्रस्थ
श्रौतस्मार्त विधिनिरत अनुष्ठानी तपस्वी १६

१ प्रयाणाच्या वेळचे नगारे. २ उत्साहशब्द. ३ गोळे सोडणारीं यंत्रें. ४ फांस घालणें. ५ गंगा. ६ कठोरपणें व्रत पाळणारे.

याजकीं रचोनि होमशाळा होमकुंडीं प्रदीप्त अनळा
हवी होमितां रविमंडळा धूम भेदिती हविर्गंधें १७

साष्टांग करूनि नमन राहवूनि सेनाप्रधान
निःसंग एकाकी आपण कश्यपाश्रमीं प्रवेशे १८

अवलोकोनि कश्यपाश्रम अंतरीं पाहे नृपसत्तम
तंव कण्वऋषीचा आश्रम अति रमणीय देखिला १९

आदरें येऊनियां निकटीं अंतरीं पाहे पर्णकुटी
मनुष्यावीण सर्व सृष्टी गृहसामुग्री दिसताहे २०

मग गर्जोनि नराधीशें म्हणे या आश्रमीं कोण असे ?
हें परिसोनि इंदिरावेशें लावण्यकलिका साजिरी २१

कनकलतिका सौदामिनी कीं चंद्रिका तनुधारिणी
सुवर्णकेतकीपत्रपर्णी सुगंधखाणी हरिणाक्षी २२

रूपयौवनचातुर्यभरिता बाहेर पातली मुनीश्वरदुहिता
अत्यादरें धरित्रीकांता पवित्रासन वोपिलें २३

स्वागत पुसोनिया वचनीं अर्घ्यपाद्यादि पूजनीं
राजा तोषवोनि बहुमानी कुशळ विचार कुशलत्वें २४

‘ दर्शनें स्वानंद झाला नयना नाम अभिधान करावें श्रवणा
परिचयज्ञानें अंतःकरणा अष्टभावें भेटवणें ’ २५

ऐकोनि चातुर्याच्या गोष्टी राजा चमत्कारिला पोटीं
म्हणे हे वयें धाकुटी विचार वृद्ध दिसताहे २६

मग म्हणे वो सुलक्षणे गुणालय कमलेक्षणे
तुझेनि वचनमात्रें क्षणें श्रम सर्वही हरपला २७
मैथुलीनरेंद्रपुत्र जगती दुष्यंत राजा चक्रवर्ती
ऐकिला असेल तरि हे मूर्ति वोळखें दृष्टीं सुजाणे ! २८
कण्व ऋषीचें दर्शन इच्छून येथें ममागमन
केव्हां होईल ? बोल वचन विलंबें कीं अविलंबें ' २९

— मुक्तेश्वरकृत म. भा. आ. प. अ. १५

शकुंतलेनें त्याचें उत्तम आतिथ्य केलें. दुष्यंतानें तिला तिच्या जन्माची कथा विचारली. ती म्हणाली, ' विश्वामित्र–मेनका यांच्यापासून मी जन्मलें. जन्मतांच आईनें माझा त्याग केला व ती स्वर्गलोकीं गेली. शकुंतपक्ष्यांनीं कांहीं काल माझें पोषण केलें व पुढें कण्वमुनींनीं या आश्रमांत आणून मला कन्येप्रमाणें पाळलें आणि लळा लावला. '

तिचा हा वृत्तांत ऐकून दुष्यंतानें तिला मागणी घातली. ' माझ्या पुत्राला राज्य मिळणार असेल तर मी तुमची भार्या होईन ' अशी तिनें अट घातली. दुष्यंतानें ती मान्य केली. उभयतांचा गांधर्वविधीनें विवाह झाला. ' तुला चार दिवसांनीं मी राजधानींत घेऊन जाईन ' असें सांगून दुष्यंत निघून गेला.

कण्वमुनि परत आल्यावर त्याला ही गोष्ट समजली. झाली गोष्ट चांगली झाली असें मानून त्यानें कन्येला आशीर्वाद दिला. शकुंतला गर्भवती झाली. आश्रमांतच प्रसूत होऊन तिला पुत्र झाला. ऋषीनें त्याचे सर्व संस्कार केले. तो मोठा झाल्यावर कण्वानें त्याच्यासह शकुंतलेची दुष्यंताकडे पाठवणी केली. शकुंतला दरबारांत जाऊन उभी राहिली; पण दुष्यंत तिला ओळखीना आणि तिचा स्वीकारहि करीना. त्याचें हें वर्तन शकुंतलेला मानवलें नाहीं. ' तुला हवी तिकडे तूं जा. तुझा माझा संबंध नाहीं ' असें जेव्हां दुष्यंत बोलला तेव्हां—

ऐसें बोलतां मेदिनीपाळा क्रोधें संतप्त शकुंतला
जेवीं प्रळयाग्नीच्या ज्वाळा स्पर्शों धांवती गगनातें १

आरक्तता लेऊनि नयनें अंजनें[1] क्षाळिलें अश्रुजीवनें
अधर स्फुरती जेवीं पवनें पद्मपत्रें थरकती २

म्हणे ' धन्य गा पुरुषोत्तमा उत्तम ऐसेचि राक्षिती नेमा
कर्मसाक्षी अंतरात्मा तृप्त झाला या वचनीं ३

मना नेणतां नाहीं पाप वन्हि नेणतां कैंचा दीप
जीवनेंवीण वाढलें रोप पृथ्वीवरी कोठूनी ? ४

जाणोनियां होय अजाण परिचय असतां पुसे ' कोण ? '
हें तंव अधमाचें लक्षण तुज उत्तमा ! अयोग्य ५

ईश्वर आणि जोडिलें पुण्य स्मरोनि बोलें यथार्थ वचन
माझी साक्षी तुझेंचि मन तुझे अंतरीं देताहे ६

यथार्थ जाणतां अंतःकरणीं अन्यथा प्रतिपादी जो वचनीं
तेणें कोणती पापकरणी केली नाहीं सांग पां ? ७

आतां असत्यपर्वतातळा उभा न राहें कुंभिनीपाळा[2]
वर पडेल वज्रशिळा परम अकीर्ति दोषाची ८

मस्तक होईल सहस्रभाग यया बोला न म्हणे व्यंग
न्याय बोलतां उद्वेग विवेकीये न पावती ९

सकल ऐश्वर्य घेऊनि भेटी पद्मा[3] पातल्या पायें लोटी
तो सभाग्य कीं अभाग्य सृष्टीं काय लागे सांगणें ? १०

अदुष्टा सविनया पतिव्रता यौवनीं तीतें त्यागी भर्ता
तैं सप्त जन्म भोगी व्यथा बालवैधव्य स्त्रीदेहीं ११

---

१ काजळ. २ राजा. ३ लक्ष्मी.

अचल श्री, आरोग्य काया सुगुण पुत्र, पवित्र जाया
बहुजन्में हरिहरांच्या पायां भजतां हें फळ पाविजे १२

—मुक्तेश्वरकृत, म. भा. आ. प. अ. १७

शकुंतला परोपरीनें बोलली खरी; पण दुष्यंत तिचें वचन मानीना. इतक्यांत आकाशवाणी झाली आणि तिनें त्याला पत्नी-पुत्रांचा स्वीकार करण्यास सांगितलें. नंतर राजानें तिला बहुमान दिला. पुत्राचें नांव भरत असें ठेविलें.

## कच-देवयानी

पूर्वी देव-दैत्यांचें घनघोर युद्ध झालें. त्या युद्धांत दैत्यांनीं देवांना खूप हैराण केलें. दैत्य मेले कीं, शुक्राचार्य अमृतसंजीवनीचा मंत्र जपून त्यांना उठवी. देवगुरुकडे ती विद्या नसल्यामुळें रणांत पडलेले देव मात्र उठत नसत. तेव्हां ही आपत्ति जाणून इंद्रानें बृहस्पतिपुत्र कच याला शुक्राकडे ती विद्या मिळविण्यासाठीं पाठविलें.

शुक्रानें त्याला ठेवून घेतलें. कच त्याची मनोभावें शुश्रूषा करूं लागला. शुक्राचार्यांची मुलगी देवयानी हिचें त्याच्यावर प्रेम जडलें. पण दैत्यांना ही गोष्ट मानवली नाहीं. तो आपल्याकडची विद्या चोरील म्हणून त्यांनीं कचाला अनेक वेळां ठार मारलें; पण देवयानीच्या आग्रहासाठीं शुक्रानें प्रत्येक वेळीं त्याला जिवंत केलें.

शेवटीं एक दिवस दैत्यांनीं त्याची राख करून शुक्राचार्यांच्या दारूंत मिसळली आणि ती त्यास पाजली; पण शुक्रानें मंत्र जपतांच तो त्याच्या पोटांत सजीव झाला. 'मला कच हवाच' असा देवयानीनें हट्ट धरल्यामुळें शुक्राचार्याला कचाला संजीवनीमंत्र शिकवणें भाग पडलें. कचाला विद्या मिळाली. तो शुक्राचें पोट फोडून बाहेर आला आणि मेलेल्या शुक्राला त्यानें उठवलें.

कृतकृत्य होऊन तो जेव्हां स्वर्गांत जाऊं लागला तेव्हां देवयानीनें त्याला अडवून सांगितलें कीं, 'माझें तुझ्यावर प्रेम आहे; तूं माझें पाणिग्रहण कर!' पण ती गुरुभगिनी असल्यामुळें कचानें तिची मागणी अमान्य केली. देवयानी

रागावली व तिनें त्याला शाप दिला कीं, 'संजीवनीविद्या तुझ्या उपयोगी पडणार नाहीं.' कचालाहि राग आला आणि तो म्हणाला कीं, 'मी ही विद्या दुसऱ्याला शिकवून उपयोगांत आणीन. तुला मात्र ब्राह्मणकुळांतला पति मिळणार नाहीं.'

कच निघून गेला. देवांनीं त्याचा मोठा सन्मान केला.

## शर्मिष्ठा व देवयानी यांचें भांडण

वृषपर्वा या दैत्यराजाची शर्मिष्ठा नांवाची कन्या होती. ती एक दिवस देवयानी व इतर सख्या यांच्यासह जलक्रीडेसाठीं गेली. तळ्याच्या कांठीं नेसतीं वस्त्रें ठेवून त्या पाण्यांत उतरल्या. पाठीमागून वारा आला आणि त्यांचीं वस्त्रें एकमेकांत गुंडाळलीं गेलीं. त्यामुळें पाण्यांतून बाहेर आल्यावर शर्मिष्ठा देवयानीचें वस्त्र चुकून नेसली. पण तेवढ्यानेंच देवयानीला भयंकर क्रोध आला आणि ती शर्मिष्ठेला तडातडा बोलूं लागली. शर्मिष्ठेनेंहि मग तोंड सोडलें. दोघींनीं एकमेकींच्या थळ्याकुळ्या उद्धरल्या. सरतेशेवटीं शर्मिष्ठेनें देवयानीला एका विहिरींत ढकलून दिलें आणि ती चालती झाली.

थोड्या वेळानें ययाति राजा मृगयेच्या श्रमांनीं थकून पाणी पिण्यासाठीं तिथें आला. त्यानें तिला वर काढली. तिनें बापाला शर्मिष्ठेचें निंद्य कर्म निवेदन केलें. शुक्राचार्य आपल्या लाडक्या कन्येच्या अपमानानें संतापला आणि दैत्यांना सोडून जायला निघाला. वृषपर्व्याला ही बातमी समजतांच त्यानें येऊन त्याचे पाय धरले व निघून न जाण्याबद्दल त्याला विनविलें. शुक्र म्हणाला कीं, 'देवयानीची समजूत घाल. ती भयंकर खवळली आहे.' वृषपर्वा तिला शरण गेला. तिनें सांगितलें कीं, 'शर्मिष्ठा माझी दासी होईल तरच मी इथें राहीन.' वृषपर्वा आणि शर्मिष्ठा या दोघांनींहि तिची अट मान्य केली.

नंतर ययाति राजा पुनः तिथें आला. शुक्राचार्यानें आपली कन्या त्याला दिली. वरात निघाली तेव्हां शर्मिष्ठा दासी म्हणून तिच्या बरोबर होतीच. शुक्राचार्यानें त्या वेळीं ययातीला सांगितलें कीं, 'शर्मिष्ठेशीं तूं प्रेमसंबंध ठेवतां कामा नये.' ययातीनें तें कबूल केलें खरें; पण पुढें त्याच्या हातून

तें वचन पाळलें गेलें नाहीं. देवयानीला हा प्रकार समजतांच ती रागावून बापाकडे गेली. तिच्या पाठोपाठ ययातीहि गेला. देवयानीनें त्याचा अपराध कथन करतांच शुक्र संतापला आणि त्यानें 'तूं अकालीं म्हातारा होशील' असा त्याला शाप दिला. ययातीनें करुणा भाकून उःशाप मागतांच त्याला दया आली व त्यानें म्हटलें कीं, 'तुझ्या पुत्रांपैकीं कोणी आपलें तारुण्य तुला दिल्यास तूं तें घेऊं शकशील.'

त्याला पांच पुत्र होते. यदु आणि तुर्वसु हे देवयानीचे व द्रुह्यु, अनु आणि पुरु हे शर्मिष्ठेचे. सर्वांना त्यानें आपलें म्हातारपण घेऊन आपलें तारुण्य देतां का, म्हणून विचारलें; पण चौघांनीं नकार दिला आणि पुरूनें ती गोष्ट कबूल केली. त्याचें तारुण्य घेऊन ययातीनें हजार वर्षें विषयभोग घेतले. नंतर पुरूचें तारुण्य पुरूला देऊन त्याला राज्याधिकारी केलें व ययाति दोन्ही स्त्रियांसह वनांत निघून गेला.

## भीष्मजन्म

महाभिष या नांवाचा एक राजा शंभर यज्ञ करून स्वर्गांत विराजमान झाला होता. एक दिवस तो ब्रह्मसभेंत बसला असतां गंगेचें वस्त्र वाऱ्यानें उडवलें आणि त्याच क्षणीं दोघांनीं एकमेकांकडे साभिप्राय नजरेनें पाहिलें. तें पाहून ब्रह्मदेवानें दोघांनाहि शाप दिला कीं, तुम्ही मृत्युलोकीं जन्म घ्याल. तसाच इकडे वसिष्ठाची गाय चोरल्याबद्दल अष्टवसूंनाहि मानवयोनींत जन्म पावण्याचा शाप झाला होता. ते वसु गंगेला येऊन भेटले आणि म्हणाले कीं, 'तूं आम्हांला जन्माला घाल आणि नदींत टाकून दे. म्हणजे आम्ही मरून परत देवपद मिळवूं.' गंगा म्हणाली कीं,'हें घोर कर्म मी कसें आचरूं?' वसु बोलले कीं,'आमच्यांतला प्रतीप नांवाचा एक वसु तुझा पुत्र म्हणून पृथ्वीवर राहील.' गंगेनें मग त्यांचें म्हणणें मान्य केलें.

पुढें महाभिष राजा शंतनूच्या रूपानें जन्माला आला. वनांत मृगया करायला गेला असतां गंगा त्याला भेटली. तिच्या रूपाला भुलून त्यानें तिला मागणी घातली. माझ्या कोणत्याहि कृत्याला तूं अडथळा आणतां कामा

नये अशी अट घालून तिनें त्याच्याशीं विवाह केला. तिला सात पुत्र झाले. ते तिनें नेऊन नदींत बुडविले. आठवा देवव्रत जन्मला. त्यालाहि जेव्हां ती बुडवायला निघाली तेव्हां शंतनूला राहवलें नाहीं. त्यानें तिला अडविलें. 'हा पुत्र तुला मी कांहीं कालानें देईन ; आतां तुझा माझा संबंध संपला' असें सांगून गंगा देवव्रताला घेऊन अदृश्य झाली. वसिष्ठांपासून सकळ विद्या आणि भार्गवरामापासून धनुर्वेद शिकल्यानंतर गंगेनें त्याला आणून शंतनूच्या हवालीं केलें.

पुढें कांहीं कालानें शंतनु मृगयेला गेला असतां नाव चालविणाऱ्या एका कोळ्याच्या मुलीवर त्याचें मन बसलें. त्यानें कोळ्याकडे तिला मागणी घातली. कोळी म्हणाला, 'हिच्या मुलाला राज्य देत असशील तर मुलगी देतों.' राजाला तें कबूल करवेना. तो हस्तिनापुरांत आला ; पण तिच्या आठवणीनें त्याचें कशांतच मन रमेना. बाप उदास कां हें देवव्रतानें प्रधानांकडून समजून घेतलें व तो तातडतोब त्या कोळ्याकडे गेला. त्यालाहि कोळ्यानें तेंच सांगितलें. तेव्हां देवव्रत सर्वांच्या देखत प्रतिज्ञावचन बोलला कीं, 'मी राज्यावरचा हक्क सोडीत आहें आणि पुढें माझ्या पुत्रांनीं तो सांगूं नये म्हणून आमरण ब्रह्मचर्य पाळण्याची प्रतिज्ञा करीत आहें !'

कोळी प्रसन्न झाला आणि त्यानें आपली सत्यवती नांवाची ती कन्या देवव्रताच्या स्वाधीन केली. तो तिला घेऊन हस्तिनापुरीं आला. शंतनूनें तिच्याशीं विवाह केला. त्याला आपल्या पुत्राच्या स्वार्थत्यागाचा परम संतोष झाला. त्यानें त्याचें भीष्म असें नांव ठेवलें आणि त्याला इच्छामरणाचा वर दिला.

सत्यवतीला दोन पुत्र झाले. पहिला चित्रांगद आणि दुसरा विचित्रवीर्य. पुढें शंतनूनें देह ठेवला. चित्रांगद मोठा झाल्यावर त्यानें पृथ्वी जिंकून अपार धन आणलें. एके दिवशीं गंधर्वाशीं युद्ध करीत असतां तो मारला गेला. नंतर भीष्मानें विचित्रवीर्याला राज्यावर बसविलें. आतां त्याचा विवाह करावा असा भीष्म विचार करीत आहे तोंच काशीश्वराच्या अंबा, अंबिका आणि अंबालिका अशा तीन मुलींचें स्वयंवर मांडलें असल्याची वार्ता त्याच्या कानीं आली. त्या तिघी जणी अतिशय सुंदर होत्या. भीष्मानें तिथें जाऊन त्यांचें हरण केलें.

## अंबेची कथा

हस्तिनापुरांत येऊन त्यानें त्या तिघींचाहि विचित्रवीर्याशीं विवाह लावण्याचें ठरविलें. तेव्हां थोरली मुलगी अंबा म्हणाली कीं, 'मी आधींच मनानें शाल्व राजाला वरलें आहे.' भीष्मानें तिचें म्हणणें मान्य करून तिला शाल्वाकडे पाठवून दिलें; पण शाल्व तिचा स्वीकार करीना. 'तुला भीष्मानें पळवून नेलें आहे. तूं आतां त्याची झालीस. मी प्राणांतींहि तुझें पाणिग्रहण करणार नाहीं!' असें त्यानें तिला निक्षून सांगितलें.

उरलेल्या दोघींचें विचित्रवीर्याशीं लग्न झालें आणि त्यानंतर चौथ्या दिवशीं अंबा परत आली. तिनें शाल्वाकडे घडलेला वृत्तांत सांगून भीष्माला म्हटलें कीं, 'आतां तुम्हींच माझें पाणिग्रहण करा.' भीष्म म्हणाला कीं, 'ही गोष्ट शक्य नाहीं. तूं तुझ्या बापाकडे जा. तो तुझें दुसरीकडे लग्न जमवील.'

अंबेला तो अपमान वाटला. ती परत बापाकडे न जातां बदरिकाश्रमीं गेली. तिथें खडतर तप करून तिनें परशुरामाला प्रसन्न करून घेतलें. तो पुढें उभा राहिल्यावर अंबा त्याला म्हणाली कीं, 'भीष्माला माझ्याशीं विवाह करायला लावा.' त्यानें 'तथास्तु' म्हटलें आणि तो भीष्माकडे आला. भीष्म त्याचा शिष्य खरा; पण गुरूच्या आज्ञेसाठीं तो आपली प्रतिज्ञा मोडायला तयार होईना. त्यामुळें दोघांत युद्ध जुंपलें. त्या युद्धांत परशुरामाचा पराभव झाला. आपल्या शिष्यानें आपल्याला पराभूत केलें याचा परशुरामाला संतोष वाटला. तो अंबेला म्हणाला, 'भीष्म तुझ्याशीं लग्न करणार नाहीं. तूं स्वस्थानीं जा आणि तप कर.'

अंबा आतां हट्टाला पेटली. या भीष्माचा प्राण घेईन तेव्हांच स्वस्थ बसेन असा तिनें निर्धार केला. घोर तप आचरून तिनें योगाग्नीनें आपला देह भस्म करून टाकला. त्याच वेळीं द्रुपदराजा पुत्रासाठीं शंकराची आराधना करीत होता. शंकर प्रसन्न होऊन त्यानें त्याला वर दिला कीं, 'पूर्वी स्त्री आणि मग पुरुष असा तुला एक पुत्र होईल.' त्यानंतर याच अंबेनें द्रुपदाच्या पोटीं जन्म घेतला. द्रुपदानें तिचें शिखंडी असें नांव ठेवलें व आपल्याला पुत्र झाल्याची नगरांत वर्दी दिली. पुरुषवेष घालूनच त्या कन्येला त्यानें वाढविलें. पुढें मुली सांगून येऊं लागल्या. द्रुपदानें दशार्ण देशच्या राजाच्या मुलीशीं शिखंडीचें लग्नहि केलें.

कांहीं दिवसांनीं आपला पति पुरुष नसून स्त्री आहे हें तिला उमगलें. ती बिचारी दुःखी होऊन माहेरीं गेली. तिच्या बापाला हें वर्तमान समजतांच त्याला राग आला. त्यानें द्रुपदाशीं युद्ध पुकारलें. झाली एवढी फजिती पुरे असें समजून शिखंडी त्याच रात्रीं रानांत पळून गेली. ती एकांतीं रडत बसली असतां एक यक्ष तिथें आला आणि त्यानें तिची सदय चित्तानें विचारपूस केली. शिखंडीनें घडलेला प्रकार त्याला सांगितला.

त्यावर यक्ष म्हणाला कीं, 'आठ दिवसांकरितां मी माझें पुरुषत्व तुला देतों नि तुझें स्त्रीत्व मी घेतों.' शिखंडीला जें हवें होतें तेंच अनायासें मिळालें. तो पुरुषत्व घेऊन राज्यांत परत आला. द्रुपदालाहि या घटनेनें अत्यंत आनंद झाला. त्यानें आपल्या व्याह्याला निरोप पाठविला कीं, 'अविचारानें युद्ध करूं नको. समक्ष येऊन माझ्या पुत्राची परीक्षा कर.'

त्याप्रमाणें परीक्षा केल्याअंतीं शिखंडी पुरुष आहे असें ठरलें. शिखंडीच्या स्त्रीला हर्ष झाला. तिचा बाप युद्ध थांबवून स्वस्थानीं गेला. पुढें आठ दिवस लोटल्यानंतर यक्षाला पुरुषत्व परत देण्यासाठीं शिखंडी वनांत गेला; पण तिथें एक निराळीच घटना घडली होती.

यक्ष स्त्रीरूप घेऊन बसला असतां एकाएकीं कुबेर तिथें आला. यक्षानें केलेली अदलाबदल त्याला कळताच त्यानें त्याला शाप दिला कीं, 'तूं आतां कायमचाच स्त्री हो!' यक्षानें जेव्हां ही गोष्ट सांगितली तेव्हां शिखंडी कुबेराकडे गेला आणि त्याला म्हणाला, 'माझ्यावर उपकार करण्यासाठीं यक्षानें ही गोष्ट केली आहे. तेव्हां त्याचें प्रायश्चित्त त्याला भोगावें लागूं नये अशी माझी तुम्हांला विनंति आहे.' त्यावर कुबेर म्हणाला, 'तूं देह सोडल्यावर मग यक्ष पुरुष होईल. तूं घरीं जाऊन सुखानें संसार कर.' तें ऐकून शिखंडी परत आला आणि झाल्या गोष्टीचा सर्वांनाच आनंद झाला.

हस्तिनापुरांत आपल्या दोन्ही राण्यांसह विचित्रवीर्य राज्य करूं लागला. भीष्मच सगळें करीत होता आणि विचित्रवीर्य विहार–विलासांत दंग होता. अशा स्थितींत एकाएकीं त्याला क्षयरोग जडला आणि औषध-उपाय सगळे व्यर्थ होऊन तो एक दिवस काळाचें भक्ष्य झाला. पोटीं संतान नसल्यामुळें राज्याला वारससुद्धां कोणी उरला नाहीं. सत्यवतीनें शोक मांडला.

त्यांत वंशखंडन झालें हीच भावना अधिक तीव्र होती. तिनें एक दिवस मग भीष्माला सांगितलें कीं, ' आतां तूं विवाह कर. '

" माते ! मेरु-मांदार चळतील ; पण माझा निश्चय मोडणार नाहीं ! तूं श्रोत्रिय ब्राह्मणाकडून सुनांच्या ठिकाणीं संतति उत्पन्न कर. परशुरामानें एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केल्यावर क्षत्रिय स्त्रियांनीं याच मार्गाचा अवलंब केला आहे." भीष्म तिला म्हणाला.

तें ऐकून सत्यवतीला व्यासांची आठवण झाली. कारण व्यासमुनि हे कौमार्यावस्थेंत तिच्या उदरीं जन्मले होते. तिनें स्मरण करतांच ते तिच्यापुढें येऊन उभे राहिले. चंद्र, सूर्य आणि अग्नि यांचें एकवटलेलें तेज आपल्या-पुढें मूर्तिमंत उभें आहे असें तिला वाटलें.

तिच्या विनंतीला मान देऊन व्यासांनीं अंबिकेच्या उदरीं धृतराष्ट्र, अंबालिकेच्या उदरीं पांडु आणि दासीच्या उदरीं विदुर असे तीन पुत्र उत्पन्न केले. धृतराष्ट्र जन्मतःच अंध निपजला. पांडु हा कापुरासारखा पांढरा शुभ्र झाला आणि विदुर तर साक्षात् यमाचा अवतार. तो महाभक्त, तत्त्वदर्शी झाला.

पांडु आणि धृतराष्ट्र वेदशास्त्रप्रवीण झाले. तारुण्यांत आल्यावर त्यांच्या लग्नांचा विचार सुरू झाला. भीष्मानें विदुराच्या संमतीनें सौबलकन्या गांधारी हिच्याशीं धृतराष्ट्राचा विवाह केला. वसुदेवाची बहीण कुंती पांडूची भार्या झाली. मद्रकन्या माद्री हिनेंहि पांडूला वरलें. आपल्या पतीला दृष्टि नाहीं हें जाणून गांधारीनेंहि आपले डोळे बांधून घेतले.

कुंती ही लग्नापूर्वी आपल्या पितृगृहीं असतां दुर्वासमुनि एकदां तिथें आले. त्यांची सेवा-शुश्रूषा कुंतीनें मन लावून केली. दुर्वासानें प्रसन्न होऊन तिला पांच देवतांचे पांच मंत्र दिले आणि सांगितलें कीं, ' हे मंत्र जपतांच तो तो देव तुझ्यासमोर प्रगटेल आणि तुझी इच्छा पूर्ण करील. '

## कर्णजन्म

दुर्वासमुनि निघून गेल्यावर तिनें एक दिवस मंत्राची प्रचीति पहायचें ठरवून सूर्याचा मंत्र जपला. तत्क्षणीं सूर्य तिच्यापुढें उभा राहिला. कुंती

झाली आणि त्याला ‘ जा ’ म्हणाली; पण सूर्यानें सांगितलें कीं, ‘ तुला एक पुत्र देऊनच मी जाईन. पुत्राला जन्म दिलास म्हणून माझ्या वरानें तुझें कौमार्य नष्ट होणार नाहीं ! ’

तावडतोब कुंती एका बालकाला प्रसवली. त्याच्या अंगावर जन्मसिद्ध सोन्याचीं कवच-कुंडलें होतीं. बाप रागावेल आणि आपली अपकीर्ति होईल म्हणून तिनें त्या मुलाला नदींत सोडून दिलें. तो वहात वहात खालीं चालला. गंगेनें त्याला लाटांवर झेलून धरलें होतें.

अधिरथ नांवाचा एक सूत नदीवर आला असतां त्याला तो मुलगा सांपडला. त्याला संतति नसल्यामुळें आपलाच मुलगा म्हणून त्यानें त्याचा सांभाळ केला. त्यानें त्याचें कर्ण असें नांव ठेवलें. कर्ण हा स्वभावतःच मोटा उदार होता. कोणी कांहींहि मागितलें तरी त्याच्या तोंडून नकार निघत नसे. पुढें कांहीं वर्षांनीं इंद्रानें त्याच्या औदार्याचा फायदा घेतला. तो आपला पुत्र अर्जुन याच्याहून वरचढ होऊं नये म्हणून इंद्र ब्राह्मणरूपानें त्याच्याकडे आला आणि त्यानें त्याच्या जन्मसिद्ध कवच-कुंडलांची मागणी केली. कर्णानें क्षणभरहि विचार न करतां तीं त्याला काढून दिलीं.

धृतराष्ट्राला दुर्योधन, दुःशासन इत्यादि शंभर पुत्र आणि दुःशीला नांवाची एक कन्या झाली. हे शंभर कौरव या नांवानें पुढें प्रसिद्ध झाले. पांडूला अजून संतान नव्हतें. राज्यांत सर्व समृद्धि निर्माण केल्यावर तो कुंती-माद्रींसह वनांत शिकार करायला गेला. बराच काळ तो तिथेंच मुक्काम करून राहिला होता.

एक दिवस कर्दम नांवाचा एक तपस्वी आपल्या भार्येसह वनांत विहार करीत होता. लोकांचें लक्ष जाऊं नये म्हणून त्या दोघांनीं मृगरूप घेतलें होतें. पांडूला हें काय ठाऊक ! त्यानें बाण सोडून त्या हरणाला मारलें. विलास पूर्ण होण्याच्या आधीं आपला असा घात झालेला पाहून त्या ब्राह्मणानें पांडूला शाप दिला कीं, ‘ जेव्हां स्त्रीसंग करशील तेव्हां तूंहि माझ्यासारखाच मरशील ! ’

पांडूला अत्यंत दुःख झालें. आपला संसार आटोपला असें समजून त्यानें हिमालयांत जाऊन तप आरंभिलें. दोघी स्त्रियाहि त्याची सेवा करून नेम-

धर्मानें राहूं लागल्या. पुढें कांहीं ऋषि स्वर्गाला चालले असतां हाहि त्यांच्या-बरोबर निघाला. ऋषींनीं त्याला सांगितलें कीं, 'बाबा रे, तूं पुण्यवान् आहेस खरा; पण पोटीं पुत्रसंतान नसल्यामुळें तुला स्वर्गांत प्रवेश मिळणार नाहीं!'

## पांडवजन्म

तें ऐकून पांडु तिथेंच थांबला. त्यानें मग कुंतीला सांगितलें कीं, 'तूं ऋषींकडून पुत्रोत्पत्ति कर.' त्यावर ती म्हणाली कीं, 'मजकडे चार मंत्र आहेत. त्यांचा जप केल्यानें देव प्रसन्न होऊन आपल्याला पुत्र देतील.' पांडूला तें ऐकून आनंद झाला. नंतर कुंतीनें यमाचा मंत्र जपतांच यम प्रगट होऊन त्यानें तिच्या ठिकाणीं पुत्रोत्पत्ति केली. पांडूनें त्याचें युधिष्ठिर असें नांव ठेवलें. तो पुण्यश्लोक आणि धर्मात्मा झाला. पुढें वायूच्या अंशानें भीम आणि इंद्राच्या अंशानें अर्जुन असे आणखी दोन पुत्र तिला झाले. चवथा मंत्र तिनें माद्रीला दिला. माद्री अश्विनीकुमारांच्या अंशानें नकुळ आणि सहदेव अशा दोन पुत्रांना प्रसवली. रानावनांतच हे पांचहि पुत्र वाढले. पांडूला अत्यंत हर्ष झाला.

पुढें एक दिवस पांडु हा माद्रीसह वनांत हिंडत असतां त्याचा कामविकार प्रज्वलित झाला आणि माद्री 'नको नको' म्हणत असतां त्यानें तिला हृदयाशीं धरलें. आपल्याला ऋषीचा शाप आहे हें त्याला भान राहिलें नाहीं. ताबडतोब तो धरणीवर पडला आणि गतप्राण झाला. कुंती-माद्री शोकसागरांत बुडाल्या. त्यांचा तो आक्रोश ऐकून चराचर हळहळलें. पुढें माद्री पांडूबरोबर सती गेली. नंतर तपोवनांतल्या ऋषींनीं कुंतीसह पांडवांना हास्तिनापुरांत आणून पोंचविलें.

कौरव-पांडव हीं मुलें एकत्र झालीं. शुक्लपक्षांतल्या चंद्राप्रमाणें वाढूं लागलीं. धृतराष्ट्र वरकरणी आपल्या पुत्रांप्रमाणेंच पांडवांवरहि ममता दाखवूं लागला; पण दुर्योधन आणि दुःशासन हे मात्र पांडवांना लहानपणापासूनच पाण्यांत पाहूं लागले. ते वेळोवेळीं त्यांची कुचाळी करीत आणि तें पाहून भीम त्यांचें पुरतें कांडात काढी.

## भीमाच्या बाललीला

नाना यानीं आरूढती लोक फिरतां विलोकिती
कुमारदशेचे खेळ खेळती नाना गति विचित्र १

दक्षत्वें पांडव आगळे होती डाव मात्र कौरव हरती
जैसा श्वापदांत ऐरावती भीमसेन तेवीं दिसे २

पळतां अवघे मागें सांडी झोंबींत अवघ्यांस एकला पाडी
पृष्ठीं वाहूनि तांतडी शिवोनि हारी आणित ३

माणिक गोटिया रत्नकंदुक[1] भोंवरे चक्रें विटिया सुरेख
सर्व खेळीं हारी आणी अधिक अजाशब्दें[2] बाहे तयां ४

म्हैसा[3] करून भीमसेन शकुनि आणी दुर्योधन
दुःशासनादि मिळोन हस्तपाद कवाळिती ५

मुसंडी देवोनि सबल मस्तकें फोडून पाडी सकल
चरणकर खुरें केवळ अंगें चूर्ण करी त्यांचें ६

एका झुगारीत गगनीं एकास आपटीत मेदिनीं
बाहीं बहुसाल कवळूनी अगाध डोहीं बुडवीत ७

नाकीं तोंडीं पाणी भरित मग बाहेर टाकी प्रेतवत
वृक्षावरी कौरव चढत फळें तोडितां देखिले ८

लत्ताप्रहारें वृक्ष मोडी एकदांच तितुके खालीं पाडी
टेंकावरून[4] बळें ओढी पाठी खरडी सर्वांच्या ९

---

१ रत्नाचा चेंडू. २ बोकड या शब्दानें. ३ रेडा. ४ टेंकडीवरून.

आपण एडका होत धडका कौरवांस देत
धर्मास राजा करीत आपण होत कुंजर[1] पुढें १०

चोर करूनि कौरव आपुले चरणीं बांधी सर्व
शिळेसंधींत[2] घेत धांव तेव्हां मस्तकें फुटती पैं ११

कौरवांस म्हणे अवधारा असंख्य मुष्टिघातें मज मारा
मग तीं मूर्खें आठवूनि वैरा हाणतां मागें न पाहती १२

हाणतां भागती त्यांचे कर मग त्यांस म्हणे वृकोदर
आपुलें उसणें घ्या समग्र व्याजासहित एधवां १३

मग मुष्टिप्रहारें हाणी बळी तेणें कुंभिनी[3] डळमळी
मूर्च्छित पडती कौरव सकळी उसणें देतां तयांचें १४

म्हणे उसणें घेतां हांसतां देतां कां रे अवघे रडतां ?
मग म्हणे उठा आतां रडी खेळतां नका खाऊं १५

धर्मासि भत्रानी करित कौरव ओढून आणी बस्त[4]
न खेळतां बडवीत सोडवीत धर्म तेव्हां १६

ऐसा भीम खेळ खेळत कौरव विषाद पावती समस्त
बल न चाले पाहती तटस्थ न दाविती बोलोनियां १७

— श्रीधरकृत पांडवप्रताप अ. ८

भीमाला मारल्यावांचून आपली धडगत नाहीं असें कौरवांना वाटलें. त्यांनीं गुप्तपणें एक कारस्थान शिजविलें. एक दिवस यमुनेंत जलक्रीडा करायला सर्व जण गेले असतां कौरवांनीं भीमसेनाला विषाचे मोदक चारले

१ हत्ती. २ खडकांच्या सापटींत. ३ पृथ्वी. ४ बोकड.

आणि तो मूर्च्छित पडल्यावर वेलींनीं त्याचे हातपाय जखडून त्याची मोटळी यमुनेंत फेंकून दिली.

पण भीमसेनाचें दैव बलवत्तर होतें. त्याला नागांनीं पाताळांत ओढून नेलें. त्याचें विष शोषून घेतलें. सर्पराज वासुकीनें त्याचें स्वागत करून त्याला मिष्टान्नें वाढलीं. त्याला अमृततुल्य रस पाजला. त्या रसानें दहा हजार हत्तींचें बळ त्याच्या अंगीं आलें. मग वासुकीनें त्याला परत यमुनेच्या तीरावर आणून सोडलें. तो घरीं आल्यावर शोकमग्न झालेल्या कुंतीचा जीव खालीं पडला.

नंतर धृतराष्ट्रानें सर्वांच्या मुंजी केल्या. त्यांना धनुर्वेद पढविण्यासाठीं कृपाचार्याला गुरु नेमलें. कर्णहि विद्यार्जनासाठीं तिथें आला. कौरवांची आणि त्याची गट्टी जमली. सगळे विद्यार्थी लक्ष लावून विद्या शिकूं लागले आणि त्यानंतर कांहीं कालानें द्रोणाचार्य हस्तिनापुरांत आला.

द्रोण हा भरद्वाजाचा पुत्र. तो गंगाद्वारीं तप करीत असतां घृताची नांवाची अप्सरा तिथें आली. तिला पाहून भरद्वाज कामातुर झाला व त्याचें रेत स्रवलें. तें त्यानें द्रोणकलशांत घालून ठेवलें आणि तिथेंच द्रोण जन्मला. अग्निवेश नांवाच्या गुरूजवळ त्यानें धनुर्विद्या हस्तगत केली.

पांचाळदेशाचा राजपुत्र द्रुपद हाहि त्याच्याबरोबर तिथेंच धनुर्वेद शिकत होता. अर्थात् द्रोण आणि तो दोघे गुरुबंधु झाले. दोघांचीहि विद्या पूर्ण झाली. द्रुपद स्वगृहीं जायला निघाला त्या वेळीं द्रोण त्याला म्हणाला कीं, 'तुला राज्य मिळाल्यावर तूं माझा सांभाळ करशील ना?' द्रुपदानें 'अवश्य!' म्हटलें.

द्रोणानें कृपाची बहीण कृपी हिच्याशीं विवाह केला. त्याला अश्वत्थामा नांवाचा एक पुत्र झाला. तो चिरंजीव ठरला. त्यानंतर परशुरामाकडे जाऊन द्रोण अस्त्रविद्या पढला. सर्व विद्या आत्मसात् झाल्या; पण दारिद्र्य मात्र गेलें नाहीं! अश्वत्थामा एक दिवस शेजारच्या श्रीमंताच्या घरीं खेळायला गेला असतां तिथल्या मुलानें सोन्याच्या वाटींत दूध प्राशन केलेलें त्यानें पाहिलें. घरीं येऊन अश्वत्थाम्यानेंहि हट्ट धरला कीं, 'आई, मला दूध प्यायला दे.' बिचारी माता. तिनें मुलाची समजूत घालण्यासाठीं पाण्यांत पीठ कालवून त्याला दिलें

द्रोणाला तें पाहून वाईट वाटलें. आपल्या दैन्याचा त्याला उद्वेग आला. तो तडक आपल्या आश्रमांतून निघाला आणि द्रुपदाजवळ आला. 'मला एक दुभती गाय दे' म्हणून त्यानें मागणी केली; पण द्रुपदानें त्याला ओळखलेंसुद्धां नाहीं. तो राज्यप्राप्तीनें उन्मत्त झाला होता. आपण दोघे गुरुगृहीं मित्र होतों असें द्रोणानें त्याला जाणविलें; पण त्यानें स्वच्छ सांगितलें कीं, 'दरिद्री माणूस राजाचा मित्र असूं शकत नाहीं. तूं इथून चालता हो!'

द्रोणाच्या वर्मावर घाव बसला. 'या अपमानाचं प्रायश्चित्त तुला भोगवीन तरच नांवाचा द्रोण!' असें प्रतिज्ञावचन बोलून तो तिथून निघाला. नंतर तो आपल्या कुटुंबासह हस्तिनापुरांत येऊन गुप्तरूपानें राहिला आणि थोड्याच दिवसांत एका चमत्कारिक योगायोगानं त्याचा राजवाड्यांत प्रवेश झाला.

कौरव-पांडव खेळण्यासाठीं म्हणून नगराबाहेर आले होते. विटीदांडूचा खेळ चालला होता. खेळतां खेळतां त्यांची विटी जवळच्या विहिरींत पडली. सगळेजण कांठावर येऊन आंत पाहूं लागले. इतक्यांत द्रोण तिथें आला. त्यानें एक दर्भ मंत्रून विहिरींत टाकला. क्षण न लागतां तो दर्भ विटी घेऊन वर आला. तें पाहून सर्व मुलें विस्मित झालीं. त्यांनीं ही हकीगत भीष्माला सांगितली. भीष्मानें द्रोणाला राजवाड्यांत आणलें. त्याचा वृत्तांत समजावून घेतला. त्याची गुरु म्हणून नेमणूक केली आणि सर्व मुलें त्याच्या हातीं दिलीं. त्याला रहायला एक प्रशस्त वाडा देऊन घरांत वस्त्र-भूषणें आणि धन-धान्यें यांची समृद्धि केली. द्रोणाचें दैन्य फिटलें.

कौरव-पांडव त्याच्याकडे शस्त्रास्त्रांचे प्रयोग शिकूं लागले. बुद्धिमत्ता आणि कौशल्य या गुणांनीं अर्जुन द्रोणाचा आवडता झाला. अर्जुनापेक्षां कोणीहि वीर वरचढ होऊं नये अशी आकांक्षा धरून त्याला त्यानें सर्व रहस्यें शिकविलीं. अश्वत्थाम्यालासुद्धां मिळालें नाहीं तें अर्जुनाला मिळालें. एक दिवस एकलव्य नांवाचा एक भिल्लाचा मुलगा धनुर्विद्या शिकण्यासाठीं द्रोणाकडे आला असतां तो हीन यातीचा म्हणून द्रोणानें त्याला शिकविण्याचें नाकारलें. तो निघून गेला आणि एका रानांत मातीचा द्रोणगुरु तयार करून त्याच्या समोर धनुर्विद्येचे प्रयोग करूं लागला. कौरव-पांडवांसह द्रोण एकदां शिकारीस गेला असतां या एकलव्यानें सूक्ष्म शरसंधान करून द्रोणाला चकित

केलें. हा आपल्या अर्जुनापेक्षांहि शरपंडित होईल या भयानें द्रोणाचार्यानें त्याच्यापाशीं गुरुदक्षिणा म्हणून उजव्या हाताचा अंगठा तोडून मागितला आणि त्या परम गुरुभक्तानें तो दिलाहि !

कांहीं कालानें सर्वांची विद्या पूर्ण झाली. कर्णार्जुन धनुर्विद्येंत आणि भीम-दुर्योधन गदाविद्येंत विशेष निष्णात झाले. सर्व शिष्यांना घेऊन द्रोण धृतराष्ट्रापाशीं गेला आणि आपण शिकविलेल्या विद्येची एकदां प्रगटपणें परीक्षा पहावी अशी त्यानें राजाला विनंति केली. धृतराष्ट्राला ती गोष्ट मानवली. त्यानें त्यासाठीं एक दिवस निश्चित केला.

## कौरव-पांडवांची विद्यापरीक्षा

आज्ञा घेऊनि आचार्यासी साधनें दाविती शस्त्रास्त्रांचीं
'बाप बाप' या शब्दाची वीरगर्जना माजली १

एक झांकोनियां नयन नेमिलें पाडिती विंधोन
एक पाठमोरे जाण अचूक लक्ष्य भेदिती २

रथफेरी कुंजरफेरी[1] दाविती युद्धाची कुसरी
एक वळंघोनि रहंवेरीं[2] रथझुंजार तळपती ३

ऐसे अनेक युद्धांचे भेद कुमारीं दावितां विविध
तंव परिसिला महानाद अत्यद्भुत दोघांचा ४

एक शिखराचा गिरिवर एकदंती मैत्तकुंजर[3]
एकश्रृंगी[4] नंदिकेश्वर दोनी रूपें आवगलीं[5] ५

तेवीं दुर्योधन भूपती दुजा भीम बळसंपत्तीं
प्रचंड गदा उचलोनि हातीं भद्रजाती लोटले[6] ६

---

१ हत्ती फिरवणें. २ घोड्यावर. ३ मस्त हत्ती. ४ शिंगांचा. ५ स्वीकार केला. ६ घुसले.

विचित्र दाविती रणमंडळें गदा परजती हस्तदाळें
मही पिटोनि पादतळें मुखीं करिती गर्जना ७

दोघीं उभारोनि कर सन्मुख झाले येरा येर
देखोनि उठला हाहाकार महावीर गजबजले ८

उभयपक्षीं आर्तली सभा एक वर्णिती सुयोधनप्रभा
एक म्हणती गगन[1]स्तंभा तुळणे भीम दुसरा ९

द्रोणाचार्य ते अवसरीं स्वपुत्रातें आज्ञा करी
दोघे वीर धरूनि करीं दोहींकडे करावे १०

विद्या परीक्षेलागीं सुभग कौतुकें[2] मांडिलासे रंग
येथें कोपाचा प्रसंग उचित काय विचारा ? ११

अश्वत्थामा उठोनि कोंडे हातीं धरूनि वारिले कडे
आचार्यपादुकांचीं तोंडें आणि[3] दोघां घातली १२

द्रोण आज्ञापी समस्तां पुत्राहूनि मज पढियंता[4]
पार्थ पाचारा आरुता[5] कौतुक दाऊं तयाचें १३

कणकतूणीर कनकचाप कनककवचीं दावी ओप[6]
ऐसा पार्थ पातला दीप जेवीं आंधारीं उजळिला १४

यानंतरें धनुष्यधर गुणीं[7] अभिमंत्रूनि शर
अस्त्रविद्या चमत्कार दाविता झाला समस्तां १५

---

१ मेरू. २ कौतुकानें. ३ शपथ. ४ आवडता. ५ समीप. ६ कांति.
७ दोरीवर.

अग्निअस्त्रें प्रगटे अनळ[1]　　वरुणअस्त्रें मोकली[2] जळ
पर्जन्यास्त्रें महाप्रबळ　　मेघवृष्टी पाडित　　१६

क्षणें रथीं क्षणें भूमीं　　क्षणें तळपत दिसे व्योमीं
चोजें[3] करूनि अंतर्यामीं　　सभा पाहे तटस्थ　　१७

सभानायकांचिया दृष्टी　　मनेंसहित पावल्या तुष्टी
उपमा न सरे म्हणोनि गोष्टी　　म्हणती नये बोलतां　　१८

तंव अकस्मात एकसरीं　　हाक वाजिन्नली बाहेरी
नाद न समाय अंबरीं[4]　　तळीं थरारी भूतळा　　१९

वाटे तडकला कनकाचळ[5]　　खंडें आतलें पृथ्वीतळ
एक म्हणती महाप्रबळ　　मेघ गर्जे प्रळयींचा　　२०

असो; यापरी गर्जना करीत　　कर्ण पातला प्रतापवंत
कवचकुंडलीं तरुणादित्य[6]　　रंगाकाशीं उगवला　　२१

दिव्य किरीट विराजमान　　दिव्य चाप दिव्य बाण
द्रोणपायां करूनि नमन　　कृपाचार्या वंदिलें　　२२

रे रे कुंतीच्या बाळका　　ज्या ज्या कळा दाविल्या लोकां
त्यांचीं नामें आणूनियां मुखा　　कर्णी मातें परिसवीं　　२३

त्या त्या मी दावीन चौगुणी　　झणीं श्लाघ्यता मानिसी मनीं
अहंकार वाहे त्याची मूर्धी[7]　　पायांतळीं माझिया　　२४

---

१ अग्नि. २ सोडी. ३ कौतुक. ४ आकाशांत. ५ मेरु. ६ बालसूर्य. ७ मस्तक.

ऐसें बोलोनि दिव्यास्त्रें गुणीं जोडिलीं बीजमंत्रें
पार्थें सोडिलीं विचित्रें तीं तीं सर्वेही दाविलीं २५

शस्त्रास्त्रांचिया संधाना अद्भुत दृष्टीं दाविलें जना
हें देखोनि दुर्योधना परमानंद न संधटे २६

कौरव म्हणे सुहृद्श्रेष्ठा ! समान करूं राज्याचा वांटा
स्वीकारूनि भाग्य सुभटा भोग भोगीं मजसरी २७

साधूनि सुहृदाचिया हिता पाय देईं असुहृदमाथां
हें ऐकोनियां पार्था क्रोध अद्भुत नावरे २८

म्हणे रे न पाचारितां येणें न बोलवितां बहु बोलणें
त्यातें नीतिवंत शहाणे 'शहाणा' ऐसें न म्हणती २९

शूरत्वें ज्यासी अहंभाव त्याचा वारूनियां घाव
वैरियातें वर्मठाव यम दावी मारावया ३०

ऐसें बोलतां अर्जुन राधेय क्षोभला दारुण
म्हणे रे रंगीं हा समान वीरविद्येसी मांडिला ३१

येथें आपुलालिया शक्ती दाविजे बळाची प्रचीती
शंका नाहीं यया अर्थी बोलतां किंवा झूजतां ३२

सावित्रें आणि पाकशासनी दोघां कलहाची मांडणी
देखोनि दु:खाचा दावाग्नी कुंतीहृदया लागला ३३

सजले देखोनि दोघेजण कृपाचार्य बोले वचन
पांडुनृपाचा नंदन प्रसिद्ध अर्जुन नामें जो ३४

१ भावेना. २ शत्रुमस्तकीं. ३ सभास्थान. ४ कर्ण. ५ अर्जुन.

सोमवंशीं विजयध्वज पृथादेवीचा आत्मज
तिचा जनक कुंतिभोज मातृवंश यादवी ३५

कर्णा ! त्वांही उभयकुळें वचनीं उच्चारूनि विमळें
समान योग्यतेच्या बळें द्वंद्वयुद्ध खेळावें ३६

ऐकोनि आचार्याचें वचन कर्ण झाला विवर्णवदन
पद्मपत्रीं जळधारकण[1] तैसा घर्म आननीं[2] ३७

हें देखोनि दुर्योधन गुरूसि बोले परिहारवचन
त्रिविध योगें श्रेष्ठपण पुरुषालागीं बोलिजे ३८

जातिकुळें नामांथिला[3] तो एक श्रेष्ठत्वें मानिला
एक विद्येनें पूज्य झाला सेनाबळें पैं एक ३९

राजा ऐसी भावना गुणीं वर्तत असेल जरी अर्जुनीं
तरी हा अंगराज्यासनीं[4] अभिषेकीन मी आतां ४०

भीष्मादिकां देखतां नयनीं रणांगणीं मध्यस्थानीं
अंगदेश राज्यासनीं अभिषेकिलें कर्णातें ४१

— मुक्तेश्वरकृत, म. भा. अ. ३१

अशा प्रकारें परीक्षेच्या प्रसंगीं अंतःकलह पेटण्याचा प्रसंग ओढवला होता; पण मोठ्या लोकांच्या मध्यस्थीनें तो टळला. मात्र त्या दिवसापासून त्यांच्यामध्यें कायमचे दोन पक्ष निर्माण झाले. कौरवांच्या मनांत वैराची आग धुमसूं लागली.

## गुरुदक्षिणा

नंतर द्रोण आपल्या शिष्यांना म्हणाला कीं, ‘ तुमची विद्या पूर्ण झाली, आतां मला गुरुदक्षिणा द्या !’ त्यावर सर्वांनीं ‘ काय पाहिजे ’ म्हणून विचार-

१ मेघबिंदु. २ मुखावर. ३ प्रख्यात. ४ अंगदेशाच्या राज्यावर.



दुःशासनानें भरसभेंत द्रौपदीचें वस्त्रहरण केलें. —पृ. ६४

तांच द्रोणानें सांगितलें. 'पांचालदेशच्या द्रुपदराजाला बांधून आणा आणि माझ्या स्वाधीन करा!' तात्काळ कौरव-पांडव सैन्यासह पांचाल देशावर धांवले. द्रोणहि त्यांच्याबरोबर गेला. त्यांनीं नगर वेढलें. संग्रामभेरी झडल्या. पांचालपूर हडबडलें. द्रुपदराजा युद्धार्थ पुढें आला. दुर्योधनादि वीर, पांडवांना मागें टाकून अभिमानानें द्रुपदावर चालून गेले. युद्धाची धुमाळ उडाली. द्रुपदानें कौरवसेनेला जर्जर केलें. त्याचा मार असह्य होऊन कौरव पळूं लागले. द्रुपदराजा टाळ्या वाजवून हंसला.

तें पाहून अर्जुन पुढें सरसावला. बाकीचे पांडव त्याच्या पाठीशीं उभे राहिले. त्यानें द्रुपदाला आव्हान दिलें. बराच वेळ युद्ध चाललें. पांडवांनीं कंदन आरंभिलें. द्रुपदसैन्य टेकीला आलें. द्रुपदानें आपली पराकाष्ठा केली; पण अर्जुन आवरेना. द्रुपदाचें बळ कमी झालें आहे असें पहातांच अर्जुनानें रथाखालीं उडी घेतली आणि धांवत जाऊन त्याला धरलें. त्याचे हात बांधून त्याला द्रोणापुढें उभें केलें. द्रुपद द्रोणाला शरण आला.

"द्रुपदा! राज्यमदानें उन्मत्त होऊन माझा अपमान केलास त्याचें हें प्रायश्चित्त! हें राज्य आतां तुझें नसून माझें आहे; पण तूं माझा मित्र असल्यामुळें मी तुला यांतला अर्धा वांटा देतों." द्रोणानें त्याला म्हटलें.

द्रुपदानें त्याच्या अटी मान्य केल्यावर अर्जुनानें त्याला सोडलें. द्रुपदाला राजधानीला पाठवून कौरव-पांडव माघारे फिरले. द्रुपदाला तो अपमान असह्य झाला. शंकराची आराधना करून द्रोणाला ठार मारील असा एक पुत्र मागून घेण्याचें त्यानें मनांत ठरविलें.

## लाक्षागृहदाह

पुढें भीष्मानें धर्माला यौवराज्याचा अभिषेक केला. धृतराष्ट्राला तें पाहून वाईट वाटलें. आपल्या पोरांना आतां भीक मागावी लागणार अशी त्याची भावना झाली. त्याच वेळीं कणिक नांवाचा एक प्रधान त्याच्या भेटीस आला. त्यानें धृतराष्ट्राला कपटनीतीचा उपदेश केला आणि कोणत्या तरी निमित्तानें पांडवांना हस्तिनापुरांतून घालवून द्यायला सांगितलें. राजाला तो उपदेश

पटला. त्यानें पांडवांना बोलावून म्हटलें कीं, ‘ तुम्ही वारणावतीं जाऊन स्वच्छंदानें रहा. तोहि आमच्याच राज्याचा भाग आहे. तिथें तुमचें मन रमेल असें मला वाटतें. ’

पांडवांनीं राजाचें म्हणणें मान्य केलें. ते रथांत बसून कुंतीसह तिकडे जायला निघाले. कौरवांना हर्षाच्या उकळ्या फुटल्या. त्यांनीं पांडवांचा कांटा काढण्याची एक नामी युक्ति योजली. पुरोचन नांवाच्या एका यवनाला सांगितलें कीं, ‘ वारणावतांत एक ज्वालाग्राही पदार्थांनीं भरलेलें असें सुंदर घर तयार कर आणि पांडव त्यांत राहूं लागले कीं एक दिवस त्याला आग लावून दे ! ’

पुरोचनानें त्याप्रमाणें घर बांधलें. पांडव त्या घरांत रहायला गेले. कौरवांनीं गुप्तपणें हे बेत रचले खरे ; पण विदुरानें पांडवांना जातेवेळींच ही गोष्ट सुचवून ठेवली होती. त्यामुळें पांडव सावध होते ; पण आपणांला कांहींच ठाऊक नाहीं असें ते पुरोचनाला भासवीत होते. विदुरानें पाठविलेल्या माणसाकडून त्यांनीं त्या घरांतून एक भुयार खणून घेतलें. पुरोचनाला मात्र त्याचा पत्ता नव्हता. एक दिवस संधि साधून प्रहर रात्रीं पुरोचनानें त्या घराला आग लावली. पांडव तयार होतेच. त्यांनीं कुंतीसह भुयारांत प्रवेश केला. लाक्षागृह भडकून भस्म झालें. त्या रात्रीं एक भिल्लीण आपल्या पांच मुलांसह तिथें वस्तीस येऊन राहिली होती. तीं माणसें मात्र जळून मेलीं.

पुरोचनाला वाटलें कीं, पांडवच मेले ! त्यानें ती वार्ता कौरवांना कळविली. कौरवांनीं ती नगरांत प्रसृत केली. त्यांना मनांतून परम हर्ष झाला ; पण वरकरणीं मात्र त्यांनीं खूप शोकप्रदर्शन केलें. धृतराष्ट्रानें त्यांचें क्रियाकर्मांतर केलें. सर्व लोक हळहळले ; पण कौरवांना मात्र हायसें झालें.

## हिडिंबवध

पांडव भुयारांतून बाहेर पडल्यावर त्यांना एक भयानक अरण्य लागलें. काळोखी रात्र आणि वृक्षवेलींची दाटी. त्यामुळें त्यांना एक पाऊलहि पुढें टाकतां येईना. कुंती तर अगदीं गळून गेली. मग भीमानें तिला खांद्यावर घेतलें, नकुल-सहदेवांना कडेवर बसविलें, धर्म-अर्जुनांचे हात धरले आणि तो

रान दणाणीत दाक्षिण दिशेनें धावूं लागला. पुढें कांहीं वेळानें कुंतीला तहान लागली. सर्वांना एका झाडाखालीं बसवून भीम पाण्याचा शोध करायला निघाला. त्याला एका ठिकाणीं पाणी दिसलें. आपलें उत्तरीय वस्त्र भिजवून घेऊन तो परत आला. पहातो तों अतिश्रमानें सगळ्यांना झोंप लागली आहे. त्यानें कोणाला उठविलें नाहीं. तो मात्र पहारा करण्यासाठीं जागा राहिला.

जवळच एका वृक्षावर हिडिंब आणि हिडिंबा अशीं दोन राक्षसभावंडें बसलीं होतीं. हिडिंबाला माणसाचा वास आला आणि त्यानें कोण असतील त्यांना मारून आणण्यासाठीं हिडिंबेला पाठविलें. ती आली तों समोरच तिला भीम दिसला. त्याचा तो बांधेसूद देह आणि सुंदर मुख पाहून हिडिंबा भुलली. खाण्याचा विचार नष्ट झाला आणि हा आपला पति व्हावा अशी इच्छा तिच्या मनांत बळावली. लगेच तिने आपलें रूप पालटलें. एक लावण्याची खाण अशी तरुण रमणी भीमापुढें उभी राहिली. तिनें त्याची चौकशी केली आणि लाजत-मुरडत आपला मनोभाव त्याला सांगितला.

भीम त्या गोष्टीला कबूल होईना आणि ती आपली विनवणी सोडीना. अशांत बराच वेळ गेला. हिडिंबाला एवढा उशीर सहन झाला नाहीं. तो स्वतः उतरून तिथें आला. पहातो तों हा प्रकार. त्यानें करकरां दाढा खाल्ल्या, बहिणीची खूप निर्भर्त्सना केली आणि भीमावर उडी घातली. दोघांचें द्वंद्व झालें आणि त्यांत हिडिंब भीमाच्या क्रोधाला बळी पडला.

इतक्यांत सगळी मंडळी जागी झाली. हिडिंबवध सर्वांनीं पाहिला आणि भीमाचें कौतुक केलें. तूं कोण म्हणून कुंतीनें विचारतांच हिडिंबेने तिचे पाय धरले आणि आपली इच्छा तिला सांगितली. कुंतीनें धर्माकडे पाहिलें. तिच्या मनांत कपट नाहीं हें जाणून धर्मानें भीमाला तिच्याशीं विवाह करण्यास अनुज्ञा दिली. एका वर्षाच्या बोलीनें भीम हिडिंबेचा पति झाला. त्यानें तिच्यासह दिवसभर रानावनांत विहार करावा आणि रात्रीं भावांकडे परत यावें असा क्रम चालू झाला. तेवढ्या अवधींत हिडिंबेला घटोत्कच नांवाचा एक पुत्र झाला. वर्ष संपलें. त्या दोघांचा निरोप घेऊन पांडव पुढें निघाले.

## बकासुराचा वध

एकचक्रा नगरींत आल्यावर गुप्तरूपानें ब्राह्मणाचा वेष घेऊन ते एका

ब्राह्मणाच्या घरीं आश्रयास राहिले. उपजीविकेसाठीं त्यांनीं माधुकरी मागणें सुरू केलें. त्या नगराच्या जवळच एक बकासुर नांवाचा राक्षस रहात होता. तो नगरीला अत्यंत पीडा देऊं लागला. तेव्हां लोकांनीं त्याच्याशीं करार केला कीं, रोज एक गाडाभर अन्न, एक माणूस आणि दोन रेडे एवढें भक्ष्य त्याच्याकडे पाठवायचें आणि तें खाऊन त्यानें स्वस्थ बसायचें. रोज एकेका घरावर ही पाळी नेमून दिली आणि असा क्रम बरेच दिवस चालला. होतां होतां ही पाळी, पांडव रहात असलेल्या ब्राह्मणाच्या घरावर आली. त्यामुळें घरांत रडारड सुरू झाली. भीमानें तें ऐकून कुंतीला म्हटलें कीं, ' तूं जाऊन काय प्रकार आहे त्याची चौकशी कर. ' कुंती तिथें गेली तों त्या मंडळींत राक्षसाचें भक्ष्य कोणीं व्हावें याविषयीं वाद चालला होता.

जाय द्विजाकडे ती गाय जशी वांसुराकडे मोहें
करितां विलाप बोलत होता निजदुःख तेधवां तो हें १

जाये वदलीस परस्थळगमन विचार सर्वथा राहो
माहेर येथ होतें, ओळखिती लोक सर्व थारा हो २

गेलों असतों तरि कां पडतें हें प्राणसंकट प्रमदे !
स्वकुटुंब व्यसन जसें देतें न तसें बुधां विष भ्रम दे ३

जरि दान तुझें द्यावें कांते ! मज भासतें तसें तरि तें
सिंधूदरीं विकावें[1] स्वहितार्थ तितीर्षुनें[2] जसें तरितें[3] ४

पुत्रचि अधिक न कन्या, अन्यास गमे मला न लोभ्याला
नयनयुगांतुनि एकहि द्याया स्वप्नीं न कोण तो भ्याला ! ५

देतों निजवपु परि तूं भीरु कसी साहसील विरहातें ?
स्वप्नींहि दुःसहचि जें म्हणसील मज स्मरोनि चिर 'हा' तें ! ६

---

१ शहाण्याला. २ तरून जाण्याची इच्छा करणारानें. ३ होडीला.

तों ब्राह्मणी म्हणे ' हो कवि साधु तुम्ही करूं नका शोक
यन्मूळ[1] आपदर्थे[2] तो शंकरसाचि आठवा श्लोक ७

रक्षाल तुम्हीच मुलें, अबला वाहील भार जीवा हे
रक्षील कसी अन्या नवपूरीं भीरु फार जी वाहे ८

जाईन मीच राक्षस जरि करकर सर्व मानवां चावे
दैवें स्त्री म्हणुनि दया येतां मत्प्राण कां न वांचावे ? ९

परिसे असें पृथा जों, तोंचि म्हणे त्यांसि कन्यका मातें
द्या, द्यायाचीच सुता, हे किमपि नयेचि अन्य कामातें १०

आत्मा पुत्र, सखा स्त्री, कन्या चिंताचि सर्वकाळ, जिला
प्रसवोनि[3] वाहति मनीं श्रीमंतहि पितर सर्व काळजिला ११

ऐसें वदोनि कन्या रडवूनि रडे तशांत जवळूनी
स्ववळून उठे बालक बोले हस्तें तृणास कवळूनी १२

समजावुनि त्यांसि म्हणे ' ऐसें ल[4]ल्लिंचलासि मालीन
कां ललतां आललतां ? पलतां मी सागलांत तालीन ! ' १३

हांसविलीं हर्षविलीं व्यसनार्त तिघेंहि बालशब्दानें
अब्दानें[5] ग्रीष्मदवा[6]कुळबर्हिकुलें जसींच अब्दानें[7] १४

तेव्हांचि पृथादेवी भेटे, अभयोक्ति जी वदे त्यांतें
संजीवनीच जाणों ती रोगें करुनि जीव देत्यांतें १५

१ ज्याचें मूळ. २ आपत्कालीं उपयोग व्हावा म्हणून धन, भार्या इ. रक्षावीं अशा अर्थाचा श्लोक. ३ जन्म देऊन. ४ राक्षसास. ५ मेघानें. ६ उन्हाळ्यांतल्या वणव्यानें आहाळलेले मोर. ७ पाणी पाडून.

कुंती म्हणे ' दिला तुज एक स्वसुत द्विजा ! नकोचि रडों
हा शोकभर स्वशिरीं घेउनि सकुटुंब तूं नको चिरडों ' १६

— मोरोपंती भारत आदिपर्व अ. ३१.

मग त्या ब्राह्मणावरचें संकट दूर करण्यासाठीं भीमानें कंबर बांधली. ठरलेलें अन्न घेऊन तो दुसऱ्या दिवशीं बकासुराकडे गेला. ठरलेल्या ठिकाणीं जाऊन त्यानें बकाला उंच स्वरांत हांक मारली आणि तें अन्न स्वतःच खाण्याचा सपाटा सुरू केला. बकासुर आला. त्यानें ही गोष्ट पाहिली. तो खवळून भीमाला बुकलूं लागला. भीमानें सर्व अन्न संपविलें आणि बकाच्या मानेवर हात टाकला. दोघेहि बराच वेळ झुंजले. अखेर भीमानें त्याला उताणा घातला. भीमाचे मुष्टिघात असह्य होऊन बकासुरानें प्राण सोडले. त्याचें तें धूड दरादरा ओढीत त्यानें वेशीबाहेर आणून टाकलें आणि तो गुपचूप घरीं येऊन झोंपला. ब्राह्मणाचे उपकार फिटले. नगरीवरचें संकट कायमचें टळलें.

## द्रौपदी-स्वयंवर

नंतर पांडवांना कळलें कीं, द्रुपदानें आपल्या कन्येचें स्वयंवर मांडलें आहे. त्यांनीं स्वयंवराला जाण्याचें ठरविलें. ब्राह्मणाचा निरोप घेऊन ते निघाले. पांचाळपुरांत पोंचल्यावर त्यांनीं कुंभारवाड्यांत एकाच्या घरीं कुंतीला ठेविलें आणि ते ब्राह्मणवेषानें स्वयंवरमंडपांत आले. मंडपांत लोकांची दाटी झाली होती. द्रौपदीची प्राप्ति व्हावी म्हणून देशोदेशींचे राजकुमार तिथें आले होते. कृष्ण, बलराम इत्यादि यादव आले होते. दुर्योधन, दुःशासन, कर्ण इत्यादि कौरवहि आले होते. पांडव वेष पालटून आल्यामुळें त्यांना कोणीं ओळखलें नाहीं. कृष्णाला मात्र ओळख पटली ; पण त्यानें तसें दर्शविलें नाहीं. पांडव ब्राह्मणसमाजांत जाऊन बसले.

द्रुपदानें पुढें येऊन स्वयंवराचा पण जाहीर केला. ' राजपुत्र हो ! मंडपांत मध्यमार्गी उंच जागीं एक यंत्र फिरत आहे. त्यांत एक मत्स्याकृति आहे. तिचा डोळा बाणानें जो फोडील त्याला द्रौपदी माळ घालील ! ' असें बोलून

त्यानें आपला पुत्र धृष्टद्युम्न याला द्रौपदीला मंडपांत घेऊन येण्यास सांगितलें. वस्त्रालंकारांनीं झळकत द्रौपदी मंडपांत प्रवेशली. सर्वांचे डोळे दिपले.

कांहीं राजपुत्रांनीं पुष्कळ प्रयत्न केले ; पण एकालाहि मत्स्ययंत्राचा भेद करतां आला नाहीं. शेवटीं कर्ण आत्मविश्वासानें उठला. त्यानें धनुष्य उचललें. बाण जोडून नेमहि धरला ; पण द्रौपदी म्हणाली कीं, ' यानें मत्स्यभेद केला तरी मी या सूतपुत्राला वरणार नाहीं ! ' द्रौपदीचे ते शब्द कर्णाच्या वर्मीं लागले. त्यानें धनुष्य खालीं टाकलें आणि खिन्न मनानें सूर्याकडे पाहिलें.

त्यानंतर मात्र कोणीच उठेना. सगळ्यांनाच त्या फिरत्या यंत्राची दहशत बसली. थोडा वेळ वाट पाहून द्रुपद गर्जून बोलला.

" काय ? कोणीच पुढें येत नाहीं ? आज पृथ्वी निर्वीर झाली काय ? "

तें ऐकून धर्मानें अर्जुनाला उठण्याबद्दल आज्ञा केली.

युधिष्ठिर म्हणे विजयवंता    द्रुपदसंकट निरसीं आतां
स्पष्ट पण भेदीं पंडुसुता    तुजवीण हें कोणा नव्हे    १

उठीं उठीं वीर्यसागरा    या त्रैलोक्यांत होई नोवरा
तुझी लज्जा शार्ङ्गधरा    तो रक्षिता होय तुजलागीं    २

येरु तत्काळ उभा ठेला    दिव्यांबर होता पांघुरला
तें कटीं बांधोनि नमिला    धर्म पार्यीं सत्वर    ३

शिरीं कर ठेवूनि युधिष्ठिरें    म्हणे यश दीधलें श्रीवरें
मग भीमासि वंदोनि महावीरें    द्रुपद दृष्टीं लक्षिला    ४

आनंद झाला रमारमणा    तंव किरीटी लागला चरणा
शीघ्र उचलोनि म्हणे पणा    भेदीं आतां द्विजराजा    ५

१ कठीण.

तेणें मनोदय अर्जुनाचा भेद करूनि गेला पणाचा
मग वेग आक्रमूनि पवनाचा[1] यंत्रापासीं पावला ६

तेथें धनुष्य होतें ठेविलें तें काय वज्राचें घडियेलें
रत्नखचित बंधीं मिरवलें पवित्र आणि प्रचंड ७

झाला पार्थ चापशरपाणि सज्जूनि टणत्कारिलें रंगणीं
मंडप दणाणिला सकळांकर्णीं चंड भडकू बैसली ८

पाहे त्रैलोक्याचा समूहो तंव तो दिसे आजानुबाहो[2]
म्हणती महावीर हा पाहा हो अर्जुनासारिखा लक्षणीं ९

हा कैसा म्हणावा ब्राह्मण देखा मांडिलें भार्गवठाण
धनुर्विद्येविषयीं संपूर्ण हा पण भेदील हो सर्वथा १०

ऐसे मंडपींचे जन बोलती अर्जुन होय ना नोव्हे म्हणती
तंव तो विक्रमाचा गभस्ती[3] मत्स्ययंत्रीं मिळाला ११

संधान केलें महावीरें मीनाचा वामचक्षु शरें
भेदूनि मंडप ऊर्ध्वद्वारें शरीं साच नेला आकाशीं १२

मच्छमंडित रंगणीं पडिला हाक झाली पण भेदिला भेदिला
प्रळयवाद्यांचा गजर झाला द्रौपदी कुंजैरी[4] लोटली १३

पार्थाच्या मस्तकावरी पुष्पवृष्टि केली सुरवरीं
तंव गजगंडीं बैसूनि सुंदरी वरमाळा घालिती झाली १४

---

१ वाऱ्याचा. २ गुडघ्यापर्यंत पोंचणारे हात ज्याचे तो. ३ सूर्य.
४ द्रौपदी बसली होती ती हत्तीण.

आनंदु पावली द्रौपदीदेवी धन्यधन्य माझी भाग्यपदवी
तंव अर्जुनासीं आठवलें जीवीं कौरव वैरी आमुचे १५

म्हणे आयका क्षितीचे नृप हो म्यां पण जिंकिला वीर हो
असह्य असेल तरी याहो मी रणकोड पुरवीन १६

कार्मुकवदनीं देऊनि शरु गर्जत बोले महावीरु
पुढें महावाद्यांचा गजरु नोवरा मिरवत चालिला १७

—अवचीसुत काशीकृत, द्रौपदी-स्वयंवर.

एका भणंग ब्राह्मणानें द्रौपदी मिळविली हें क्षत्रियांना सहन झालें नाहीं. ते युद्धार्थ उभे ठाकले. कौरव त्या सर्वांत प्रमुख होते; परंतु पांडव सर्वांना मारून, झोडपून विजयी ठरले. जयघोष करीत मिरवीत मिरवीत ते कुंभारवाड्याकडे चालले.

चिऱ्हाडीं येऊन त्यांनीं कुंतीला नमस्कार केला. द्रौपदीहि कुंतीच्या चरणाला लागली. तिनें त्या नववधूला कौतुकानें मांडीवर बसविलें. हनुवटी धरून भरल्या डोळ्यांनीं सुनमुख पाहिलें. ती रूपगुणांची खाण द्रुपदबाळा तिला मानवली. लावण्यसागरांतलें रत्न, चंद्रमंडळांतलें सार किंवा मानससरोवरांतलें अष्टदळ कमळच आपल्याला जोडलें असें कुंतीला वाटलें.

नंतर धर्मानें तिला द्रुपदाच्या स्वयंवरमंडपांतला वृत्तांत अर्जुनाच्या अचूक लक्ष्यभेदासह विस्तारून, विवरून सांगितला. 'कौरव सगळे खवळून आले; पण तुझ्या पायांच्या पुण्याईनें आम्ही त्यांचा समुद्र मंथून हें नारीरत्न बाहेर काढलें,' असें म्हणून धर्मानें आपल्या मातेला मोठेपणा दिला. कुंतीचा हर्ष पोटीं मावेनासा झाला. तिनें पांच वाती पाजळून द्रौपदीसह पांची पुत्रांचें औक्षण केलें.

नंतर द्रुपदानें हे ब्राह्मण आहेत का कोण आहेत त्याची चौकशी केली. चौकशीअंतीं ते पांडव असल्याबद्दल त्याची खात्री झाली. धर्मराजानें आपण पांचहि बंधु द्रौपदीशीं विवाह करणार असल्याचें त्याला सांगितलें. द्रुपदाला

१ युद्धाची इच्छा.

ती गोष्ट कशीशीच वाटली; पण एवढ्यांत व्यास मुनि तिथें आले आणि त्यांनीं सांगितलें, 'पूर्वजन्मीं द्रौपदीनें शंकराची आराधना करून पांच वेळां 'पति दे' अशी मागणी केली होती. तेव्हां शंकरानें पुढील जन्मीं तुला पांच पति होतील असा हिला वर दिला आहे. यासाठीं हे द्रुपदा, तूं निस्संकोच मनानें आपली कन्या पांची पांडवांना अर्पण कर!'

हें व्यासवचन ऐकून द्रुपदाचें समाधान झालें. त्यानें मग पांडवांना आपल्या राजवाड्यांत बोलावून नेलें. मोठ्या थाटानें लग्नसोहळा केला. अपार आंदण दिलें. पांडव लाक्षागृहांत जळाले नसून ते जिवंत आहेत आणि द्रौपदीसारखें स्त्रीरत्न त्यांना लाभलें आहे ही वार्ता हस्तिनापुरांत कळली. नागरिकांना आनंद झाला. कौरवांचीं तोंडें मात्र काळीठिक्कर पडलीं. आतां पांडवांचें काय करावें आणि त्यांच्याशीं कसें वागावें याचा खल सुरू झाला. विदुरानें धृतराष्ट्राला सांगितलें कीं, 'तूं पांडवांना सन्मानानें पाचरण कर. त्यांना अर्धें राज्य दे आणि कलहाचें बीज नष्ट करून सुखी हो!' कौरवांना हें बोलणें आवडलें नाहीं; पण धृतराष्ट्रानें पोरांच्या मताची पर्वा न करतां विदुराला पांडवांना आणण्यासाठीं पांचाळपुराला पाठविलें. शुभ मुहूर्त पाहून द्रुपदानें त्यांची पाठवणी केली.

वाजत-गाजत ही वरात हस्तिनापुरांत आली. नरनारी द्रौपदीला पहाण्यासाठीं धांवल्या. त्यांनीं वधूवरांना पंचारती ओवाळल्या. लोकांनीं राजवाड्यांत मंडपघसणी केली. धृतराष्ट्रानें पांडवांना हृदयाशीं धरून प्रेमाश्रु ढाळले. कुंती, गांधारी एकमेकींना भेटल्या. नव्या सुनेचें सर्व वडील मंडळींनीं पोटभर कौतुक केलें.

नंतर धृतराष्ट्रानें विदुराचा विचार घेऊन राज्याचा अर्धा भाग पांडवांना तोडून दिला. इंद्रप्रस्थ ही तुमची राजधानी करा आणि तिथें सुखानें रहा असें त्याना सांगितलें. सर्व प्रकारची सामुग्री सिद्ध करून धर्माला राज्याभिषेक केला. हत्तीवरून त्याची मिरवणूक काढली. त्याच्यावर सोन्याचीं फुलें उधळलीं. धर्म आपल्या भावांना आणि आईला घेऊन इंद्रप्रस्थाला आला. तिथल्या नागरिकांनीं त्याचें सहर्ष स्वागत केलें. धर्मानें वस्त्रभूषणें देऊन सर्वांचा संतोष केला. श्रीकृष्णानें येऊन त्यांच्यासाठीं नगररचना वगैरे सर्व गोष्टी यथास्थित केल्या. धर्माचें धर्मराज्य सुरू झालें. लोक सुखावले.

कृष्ण द्वारकेला निघून गेल्यावर नारद इंद्रप्रस्थाला आला. धर्मानें त्याचा आदरसत्कार केला. पांडवांत स्त्रीनिमित्त कलह माजूं नये म्हणून त्यानें एक नेम सुचविला. वर्षाच्या दिवसांचे पांच भाग करून दोन महिने बारा दिवस द्रौपदीनें प्रत्येक पतीजवळ रहावें असें ठरविलें. जो हा नियम मोडील त्यानें बारा वर्षें वनवास भोगावा अशी शिक्षाहि ठेवली. पांडवांनीं ती गोष्ट सुखानें मान्य केली.

कांहीं काल याप्रमाणें सुरळीत चाललें; पण पुढें एक दिवस चमत्कारिक प्रकार घडून आला. एका चोरानें रात्रीं नगरांतल्या एका ब्राह्मणाच्या गायी पळवून नेल्या आणि तो ब्राह्मण आरडतओरडत पांडवांच्या दाराशीं आला. अर्जुनानें त्याचें सांत्वन केलें; पण चोराचा पाठलाग करायचा तर धनुष्य-बाण राहिले शस्त्रागारांत आणि तिथें तर धर्म आणि द्रौपदी एकान्तांत बसलेलीं! क्षणभर त्यानें विचार केला आणि मनाशीं निश्चय ठरवून तो शस्त्रागारांत गेला. धनुष्यबाण घेऊन बाहेर आल्यावर त्यानें चोराचें पारिपत्य करून ब्राह्मणाच्या गायी त्याला परत मिळवून दिल्या.

घरीं आल्यावर बारा वर्षे तीर्थयात्रेला जाण्यासाठीं तो धर्माची आज्ञा मागूं लागला. 'ब्राह्मणाचें कार्य साधण्यासाठीं तूं नियमभंग केलास त्यामुळें तुला दोष नाहीं. तूं तीर्थयात्रेला जाऊं नको!' असें धर्मानें त्याला समजाविलें; पण 'नियमभंग तो नियमभंग! मग तो कोणत्याहि कारणासाठीं झालेला असो; त्याचें प्रायश्चित्त घेतलेंच पाहिजे!' असें अर्जुनानें प्रतिपादिलें. सर्वांचा निरुपाय झाला. अर्जुन इंद्रप्रस्थांतून बाहेर पडला!

तिथून गंगाद्वाराला आल्यावर उलुपी नांवाची नागकन्या त्याला भेटली. तिनें त्याला आपल्या धरीं नेलें व तो नको म्हणत असतांहि त्याला वरलें. एक रात्र तिच्याकडे राहून अर्जुन पुढें निघाला. मणिपुराला येतांच चित्रवाहन राजाच्या चित्रांगदा नांवाच्या मुलीचें त्याच्यावर प्रेम बसलें. राजानें विधि-पूर्वक अर्जुनाशीं तिचें लग्न लावलें. एका वर्षाच्या करारानें अर्जुन तिथें राहिला. तेवढ्या अवधींत बभ्रुवाहन नांवाच्या एका मुलाला चित्रांगदेनें जन्म दिला.

पुढें त्यानें अनेक शिवक्षेत्रें आणि विष्णुक्षेत्रें पाहिलीं. अनेक पुण्य नद्यांचें अवगाहन केलं. दक्षिणेला जाऊन सेतुबंधरामेश्वराचें दर्शन घेतलें. तिथें

रामभक्त हनुमान आणि तो यांच्यांत एक पैज लागली व मारुति ती पैज हरला. ठरलेल्या करारप्रमाणें मारुतीनें अर्जुनाच्या ध्वजस्तंभावर बसण्याचें मान्य केलें.

## सुभद्राहरण

कृष्णाची सुभद्रा नांवाची एक रूपस आणि सर्वांगीं सुकुमार अशी बहिण होती. तिचें लग्नाचें वय झालेलें पाहून बलरामानें दुर्योधनाशीं सोयरीक करण्याचा विचार ठरविला होता. कृष्णाच्या मनांतून मात्र सुभद्रा अर्जुनाला मिळावी असें होतें. या वेळीं अर्जुन इथें आला तर काय बहार होईल असा देवाच्या मनांत विचार येतो तोंच अर्जुन यात्रा करीत द्वारकेला आला. तो वल्कलवेष्टित असल्यामुळें त्याला कोणी ओळखूं शकलें नाहीं. नगराच्या बाहेर कोणी एक महंत आला आहे अशी दूतांनीं राजवाड्यांत वर्दी दिली. बलरामानें त्याला आपल्या वाड्यांत आणून चार महिने राहवून घेतलें. त्याची शुश्रूषा करण्यासाठीं सुभद्रेची नेमणूक केली.

ती राजसबाळा त्याच्या मनांत भरली. पुढें एक दिवस देवीच्या यात्रेसाठीं द्वारकेचे जन रैवतक पर्वतावर निघाले. त्या यात्रेंत कृष्ण, बलराम, सुभद्रा इत्यादि खाशी मंडळीहि होती. अर्जुनाला कृष्णानें आपल्या रथांत घेतलें होतें. तो कृष्णाशीं गप्पागोष्टी करीत होता; पण त्याची दृष्टि मात्र सुभद्रेच्या रथावर होती. कृष्णानें त्याचा भाव जाणला. त्याची गोडशी थट्टाहि केली आणि मग त्याच्या कानांत सांगितलें कीं, परत येतांना तूं सुभद्रेचें हरण कर! अर्जुनाला पडत्या फळाची आज्ञा पुरली. तो अंतरीं हृष्टपुष्ट झाला.

येतांना संधि साधून कृष्णानें अर्जुनाला डोळा मोडला. अर्जुनानें रथावरून उडी टाकली आणि सुभद्रेच्या रथाला पकडून तिला अलगत उचललें आणि आपल्या रथांत आणून शेजारीं बसविलें. सुभद्रेला तेंच हवें होतें. तिनें गालांत हंसून अर्जुनाला उत्तेजन दिलें. घोड्यांच्या पाठीवर चाबूक कडाडला. अर्जुनाचा रथ इंद्रप्रस्थाच्या दिशेनें भरधांव निघाला.

ही वार्ता बळरामाला कळली. तो बलाचा सागर अर्जुनावर खवळला. माझें धनुष्य आणा. बाण कुठें आहेत? आणि माझीं शस्त्रास्त्रें? बाकीचें

सगळें राहूं द्या. एक फक्त मुसळच पुरे!' अशी त्याच्या जिवाची धांदल झाली. त्याच्या क्रोधरंजित मुखाकडे कोणाला पाहवेना. तो अर्जुनाचा पाठलाग करायला निघणार हें पाहून श्रीहरि पुढें झाला. त्यानें नम्र होऊन गोड शब्दांनीं त्याची समजूत काढली अन् मग कुठें स्वारी शांत झाली.

राग शमल्यावर मग धांवत जाऊन त्यानें अर्जुनाला वळविलें. त्याला सन्मानानें नगरांत आणलें. शुभमुहूर्तीं सुभद्रा–अर्जुन यांचा विवाह झाला. लाडक्या बहिणीच्या लग्नासाठीं बलरामानें आपलें भांडार खुलें केलें. मेहुण्याला अपार आंदण मिळालें. लग्नाचा थाट अवर्णनीय झाला. मांडव-परतणें झाल्यावर अर्जुन सुभद्रेला घेऊन मंगलवाद्यांच्या गजरांत इंद्रप्रस्थाला आला. अर्जुनाला पाहून धर्माच्या मनांत प्रेम दाटलें. कुंतीनें दोघांनाहि हृदयाशीं धरून आशीर्वादांचा वर्षाव केला. नंतर सुभद्रेला हातीं धरून अर्जुन द्रौपदीच्या महालांत गेला. तिलाहि अंतरीं हर्ष झाला; पण तिनें रुसण्याचा बहाणा केला. अर्जुनाकडे एक सरोष कटाक्ष फेकून ती म्हणाली, 'आतां कशाला आलांत माझ्याकडे? नवी सुंदर बायको मिळाली ना तुम्हांला! बसा आतां तिलाच घेऊन!' पण लगेच सुभद्रेनें द्रौपदीच्या पायांवर मस्तक ठेवलें. तिचा तो विनय पाहून द्रौपदीचे प्रेमाश्रु अनावर झाले. तिनें तिला उचललें आणि गळां मिठी घातली. त्या दृश्यानें अर्जुनाला धन्य वाटलें!

## खांडववनदाह

नंतर कांहीं काल सुखाचा आणि शांततेचा गेला. द्रौपदीला पांच पांडवांपासून पांच पुत्र झाले. सुभद्रेला अभिमन्यु नांवाचा पुत्र झाला. धौम्य पुरोहितानें सर्वांचे जातकर्मादि संस्कार केले. मोठे झाल्यावर ते वेद-शास्त्रें पढले. अर्जुनापासून उत्कृष्ट धनुर्विद्या त्यांना मिळाली. असा सगळीकडे आनंदीआनंद असतां भगवान् श्रीकृष्णाचें इंद्रप्रस्थांत आगमन झालें. मग काय! हर्षाचें अन् सुखाचें माप शिगोशीग भरलें.

एक दिवस ग्रीष्मऋतूंत कृष्णार्जुन जलविहारासाठीं यमुनेवर गेले. संगें द्रौपदी-सुभद्राहि होत्या. डोहांत यथेच्छ डुंबून तीराला आल्यावर त्यांच्यापुढें एक तेजस्वी पुरुष प्रगटला. हात जोडून त्यानें कृष्णार्जुनांची प्रार्थना केली.

" महाराज, मी अग्नि आहें. श्वेतकेतु राजाच्या बारा वर्षे चाललेल्या सत्रात तूप खाऊन मला अजीर्ण झालें आहे. तोंडाची रुचि गेली आहे. हें जवळचें खांडववन जर मला भक्षायला मिळेल तर मला आरोग्य लाभेल. मी पुष्कळ वेळां तें खाण्याचा प्रयत्न केला; पण प्रत्येक वेळीं इंद्रानें पाऊस पाडून माझा निरुपाय केला. मग मी ब्रह्मदेवाला शरण गेलों. त्यानें मला सांगितलें कीं, " तूं कृष्णार्जुनांना शरण जा. ते तुझा मनोरथ पूर्ण करतील."

तें ऐकून अर्जुन म्हणाला कीं, 'मजपाशीं अस्त्रें आहेत; पण इंद्राचा पराभव करतां येईल असा रथ आणि धनुष्य नाहीं!' त्यावर अग्नीनें यमुनाजलांत बुडी दिली आणि वरुणाला प्रार्थून त्याच्याजवळचें गांडीव धनुष्य आणि अक्षय भाते आणून ते अर्जुनाला दिले. तसाच एक विजय-रथहि दिला. त्याला चार शुभ्र घोडे होते. जणूं कापुराचे बनवलेले किंवा चंद्रकिरणांचा रस आटवून ओतलेले. कांतीव अन् घोटीव. श्रीकृष्णालाहि सुदर्शनचक्र आणि गदा अग्नीनें समर्पिली.

कृष्णार्जुन सज्ज होऊन रथांत बसले. रथ खांडववनाभोंवतीं फिरूं लागला. पाऊस पडूं नये म्हणून अर्जुनानें त्या रानावर बाणांचा मंडप उभारला. अग्नि तें वन भक्षूं लागला. चहूं बाजूंनीं ज्वाळा भडकूं लागल्या. वृक-व्याध जळाले. रीस-वानर होरपळले. हरिण-ससे आहाळले. कृष्णार्जुनांचा जागता पहारा असल्यामुळें कोणालाहि बाहेर पळतां येईना. आगीनें जोर धरला. स्वर्गाला ज्वाळा भिडल्या. सप्तसागर उकळले.

तें पाहून इंद्र मुसळधार वर्षूं लागला. विजांचीं झुंबाडे तळपूं लागलीं; पण एक थेंब मंडपाच्या आंत शिरेना. मग इंद्र देवांसह साक्षात् युद्धाला आला. एका बाजूनें जलधारा अन् दुसऱ्या बाजूनें शरधारा; पण कृष्णार्जुन हालेनात! देवांचीं सगळीं शस्त्रास्त्रें फुकट गेलीं. तेव्हां आकाशवाणी वदली कीं,' इंद्रा! हे उभयवीर तुला अजिंक्य आहेत. तूं वृथा श्रम करूं नको!' तें ऐकून देव हताश होऊन परत गेले.

अग्नि सावकाशपणें भोजन करूं लागला. इतक्यांत मय नांवाचा असुर त्या वनांत होता तो बाहेर पडला. कृष्णानें त्याला मारून आंत टाकण्यासाठीं

चक्र उचललें; पण तो दोघांना काकुळती आला. अर्जुनानें त्याला अभय दिलें. मयासुर, तक्षकाचा पुत्र आणि सारंगपक्ष्याचीं चार पिलें इतके जीव त्या वणव्यांतून वांचले. बाकी सर्व वृक्षवल्ली आणि वनचरें यांचा स्वाहाकार झाला. अग्नीनें भरल्या पोटीं ढेंकर दिली. 'आज तुम्हीं मला आकंठ भोजन घालून तृप्त केलेंत!' असें म्हणून त्यानें कृष्णाला वंदन केलें आणि अर्जुनाला अनेक आशीर्वाद दिले. कृष्णार्जुन मयासुराला सांगातीं घेऊन परत यमुनातीरीं आले. सर्वांनीं पुनश्च एकदां जलक्रीडा केली आणि मग इंद्रप्रस्थीं गमन केलें.

---

# सभापर्व

अर्जुनानें आपल्याला जीवदान दिलें हे उपकार स्मरून मयासुर अर्जुनाला म्हणाला, ' महाराज ! मजकडून आपण कांहीं तरी सेवा घ्यावी अशी इच्छा आहे. ' तेव्हां अर्जुनानें कृष्णाकडे बोट दाखविलें. तो उत्तम शिल्पकार आणि वास्तुशास्त्रज्ञ आहे हें जाणून कृष्णानें पांडवांसाठीं एक सुंदर सर्वोत्तम सभा निर्माण करण्याबद्दल त्याला सांगितलें. त्यानें ती गोष्ट आनंदानें मान्य केली. नंतर मयासुर बिंदुसरोवरावर गेला. तिथें धनरत्नांच्या राशी पडल्या होत्या. ती सामुग्री असंख्य राक्षसांच्या मस्तकीं देऊन तो इंद्रप्रस्थाला आला. शुभ मुहूर्त पाहून त्यानें सभेचा उपक्रम केला.

अष्ट आय आणि अष्ट कोन साधून पाया खोदला. त्यांत सप्तरंगी विशाळ शिळा बसविल्या. नवरत्नांचे चिरे उभे केले. मंडपाची आंखणी कलाकुसरीनें केली. पद्मरागांचे तोळंबे उभारले. पुष्परागरत्नांच्या चौकटी जडविल्या. वर माणकांचे अष्टभुज विनायक कोरून बसविले. घोटीव पाचूच्या पाषाणांनीं चौक मांडले. गोमेदाचीं राजांगणें विस्तारलीं. वर गोमेदाच्याच बैसका मांडल्या. त्यांवर विद्रुमांचे राजहंस करून ओळीनें मांडले. त्यांच्या मुखीं मुक्ताफळांचे घोंस लोंबविले. पाचूचीं पांखरें बनवून रत्नमण्यांचीं जांभळें त्यांच्या चोंचींत दिलीं. नाचते मोर, गात्या-नाचत्या पुतळ्या, झुंजते हत्ती आणि रेडे असे प्राणिगण जागोजाग बसविले. शंभरखणी गोपुरें, सुवर्णाचीं शिखरें, विजेसारख्या झळकत्या पताका, पद्मरागाचीं कपाटें आणि चतुर्दश भुवनें यांची उभारणी केली. पाचूचें वैकुंठ, पुष्कराचें ब्रह्मसदन, हिऱ्या-मोत्यांचा कैलास असे तिन्ही देवांचे लोक उभे केले. सोमकांताच्या पायऱ्या बांधलेल्या पुष्करिणी, उष्णोदकाच्या वापी, प्रसन्न सुंदर तळीं अशी जलाची सोय केली. जळाच्या जागीं स्थळ, स्थळाच्या जागीं जळ, भिंतीच्या जागीं द्वार आणि द्वाराच्या जागीं भिंत असे भ्रांतीचे चमत्कारहि ठायीं ठायीं मांडले. अतिअद्‌भुत अशी ती मयसभा निर्माण झाली. हजारो राक्षसांना कामाला जुंपून चौदा महिन्यांत मयानें तें स्वर्गालाहि लाजविणारें भव्योत्तुंग कलामंदिर निर्माण केलें.

धर्मराजा ती सभा पाहून अत्यंत हर्षला. 'धन्य धन्य मयासुर!' असे त्यानें उद्गार काढले. अपार धन अर्पून त्यानें मयाची बोळवण केली. शुभ मुहूर्तावर धर्मानें सर्वांसह त्या सभेंत प्रवेश केला. त्यानिमित्त महोत्सव मांडला. दहा सहस्र ब्राह्मणांना इच्छाभोजन घातलें. सगळे याचक संतुष्ट केले.

नंतर अमृतवनांत वसंत प्रगटावा तसा नारद तिथें आला. तो स्वर्गांतून पांडुराजाची भेट घेऊन आला होता. त्यानें त्याच्या सभेची तोंड भरून प्रशंसा केली. त्याला राजनीतिविषयक अनेक प्रश्न विचारले आणि नंतर त्याला पांडुराजाचा निरोप सांगितला.

"धर्मा! तूं ऐश्वर्यसंपन्न आहेस. तुझे बंधु तुझ्या आज्ञेत आहेत. तेव्हां तूं राजसूय नांवाचा यज्ञ कर. त्यामुळें तुझें यश दिगंत फडकेल आणि मला स्वर्गांत याहून मानाचें स्थान लाभेल!"

इतकें सागून नारद निघून गेला. धर्मराजानें आपल्या पित्याची इच्छा पूर्ण करायचें ठरविलें. लागलीच कृष्णाला बोलावण्यासाठीं द्वारकेस दूत रवाना केला. कृष्ण लगबगीनें इंद्रप्रस्थांत आला. धर्मराजानें त्याच्यापुढें राजसूययज्ञाचा प्रश्न काढला. कृष्णानें म्हटलें,

"पृथ्वीतले सर्व राजे जिंकून धन आणलें पाहिजे. मगधेश्वर जरासंधानें बावीस हजार राजे बंदींत टाकले आहेत. त्यांना आधीं सोडविलें पाहिजे आणि त्यासाठीं जरासंधाला मारलें पाहिजे. त्याचा वध केल्यावांचून तुझा यश तडीला जाणार नाहीं!

जरासंध हा बृहद्रथाचा मुलगा. त्याच्या जन्माची कथा विचित्र आहे. बृहद्रथाला दोन भार्या होत्या; पण एकीलाहि संतान होईना. राजा बहुत हिंपुटी झाला. दोघींनाहि घेऊन त्यानें वनवास पत्करला. तिथें चंडकौशिक ऋषीची भेट झाली. त्यानें कृपाळू होऊन राजाला एक आम्रफळ दिलें. तें त्यानें चिरून दोघींना दिलें. त्या गर्भवती झाल्या. नवमास भरतांच एकाच वळी प्रसूत झाल्या; पण दोघींनाहि जें मूल झालें तें अर्धें. बिचाऱ्या खूप रडल्या. राजाच्याहि आशेवर पाणी पडलें. दाईनें तीं दोन्ही गर्भशकलें गांवाबाहेर टाकून दिलीं.

ऐन मध्यरात्रीच्या वेळीं जरा नांवाच्या राक्षसीनें तीं पाहिलीं. तीं दोन्ही सांधलीं तेव्हां तो एक सजीव मुलगा बनला. तिनें तो नेऊन राजाच्या स्वाधीन केला. जरेनें सांधलेला म्हणून जरासंध असें त्याचें नांव ठेवलें.

पुढें तो मोठा झाला. आपल्या प्रबळ शक्तीच्या जोरावर त्यानें राज्यविस्तार केला. अनेकांना छळलें. अनेकांना बंदींत टाकलें. पृथ्वीवर महान् अनर्थ मांडला. तेव्हां त्याला मारणें हें पहिलें काम. राजसूय यज्ञ नंतर. तूं भीम आणि अर्जुन या दोघांना माझ्याबरोबर दे. आम्ही तिघेही त्याच्याकडे जातों. भीमाच्या हातीं त्याला मरण येईल असा माझा विश्वास आहे."

धर्मानें कृष्णाची आज्ञा मान्य केली. भीमार्जुन आणि कृष्ण हे ब्राह्मणवेषानें शुभ्र वस्त्रें परिधान करून मगध देशाकडे जायला निघाले. योग्य वेळीं जरासंधाच्या राजवाड्यांत पोंचले.

## जरासंध-वध

सुस्नात आणि श्वेतवसनीं    चंदनलेप माळा सुमनीं
मार्ग सांडोनि राजसदनीं    प्रवेशले अमार्गें    १

कुंजरवनीं[1] माजी केसरी[2]    कीं गोठणीं प्रवेश कीजे व्याघ्रीं
तैसे तिघे होमागारीं    जरासंधें देखिले    २

न बोलतां आशीर्वचनीं    स्तंभप्राय उभे मौनी
रायें देखोनि सन्मानीं    प्रत्युत्थानीं[3] गौरविले    ३

तिघां बोपिलीं कनकासनें    मधुपर्कविधी पूजाविधानें
देतां ' ने घें ' म्हणतां वचनें    इच्छा कांहीं असेना    ४

कृत्रिमवेश यदुनायक    म्हणे राजया अल्पसें ऐक
मागणें असे कांहींएक    तें अविलंबें अनुवादें    ५

---

१ हत्तींच्या रानांत. २ सिंह. ३ उभें राहून.

हे दोघे व्रतस्थ मौनी अर्धप्रमाण लोटतां रजनी
वृत्तांत बोलतील वचनीं तो त्वां पुढें परिसणें ६
होमशाळे स्थापूनि द्विजां राजगृहीं प्रवेशे राजा
अर्ध लोटल्या शशांकभाजा[1] पुढतीं आला जवळिके ७
अतिथी म्हणती ' कुशल राया ' तो म्हणे ' देखतां पवित्र पायां
सकल कल्याण येथोनिया आशीर्वचनीं स्वामींचिया ८
कोठोनि येणें कोठवरी ? इच्छा केउती पुढारीं
आज्ञा असेल उत्तरीं प्रगट केली पाहिजे ९
पाहतां तापसियांचीं सोंगें वर्ततां देखोनि अविधिमार्गें
भेरीभंग शृंगभंगें किमर्थ केलें सांगिजे १०
अमार्गें आलेति राजसदना हेहि दोषामाजी गणना
पूजा न घ्यावया कारणा सांगितलें पाहिजे ११
पुष्पगंधें श्वेतसुमनें कवणा आश्रमाचीं हीं चिन्हें
इच्छा नाहीं तरी कां येणें ? प्रभूप्रती विरक्तीं १२
असो तुमचे गुणागुण मागाल तें देईन दान
या निश्चयें निश्चल मन करूनि बोला याचक हो ' १३
तिघांमाजी गुरुत्व मुख्य तो म्हणे ' राया यथार्थ ऐक
जाणतां वर्तेति अविवेक हें अघटित सर्वथा १४
प्रकट अपकीर्तीचा घोष यालागीं पवित्रा आला रोष
भेरी भंगिल्या त्याचा दोष पाहतां कांहीं असेना १५

---

१ चंद्राची भार्या = रात्र.

मार्गे जाइजे मित्रसदना  अमार्गें येइजे शत्रुस्थाना
नीतिधर्मे नरमंडना !  वर्तणूक आमुची ' १६

ऐकोनि बोले मागधेश्वर  आम्हां काय ऐसें वैर
कोणे काळीं विरोधाचार  मी आचरलों तुम्हांशीं १७

आतां यथार्थ तेंच सांगा  मागणें तें प्रकट मागा
नसतां कलंक माझिया अंगा  वैर शब्द न लावणें १८

अच्युत म्हणे ' ऐक वचन  वैरास कांहीं नलगे यत्न
दुष्ट ज्याचें आचरण  तोचि वैरी विश्वाचा १९

राजे धरूनिया लक्षावधि  बस्त[1] करून सूदले[2] बंदीं
त्यांचा होम कवणें विधा  करूं पाहसी साग पां ! २०

हेंचि असह्य तिघां देवां  हेंचि असह्य महानुभावां
हेंचि कारण वैरभावा  आम्हां तुम्हां प्रस्तुत २१

आतां राजे करीं का मुक्त  हेंचि आमुचें मागणें येथ
नेदी म्हणसी तरी अनर्थ  येचि काळीं दिसतसे २२

राजे सोडविल्याविणें  येथोनि सहसा नाहीं जाणें
पैजे प्राण घेणें देणें  द्यूत खेळणें हें येथें ' २३

ऐसें बोलतां चक्रपाणी  उभे ठेले समरांगणीं
जरासंधें राज्यासनीं ·  अभिषेकिलें सहदेवा २४

---

१ बोकड. २ घातलें.

प्रधानातें निरोपी मुखें राज्य रक्षावें अतिविवेकें
होणार तें होतसे सुखें निर्भय सर्वीं असावें २५

सरसावुनी वीरगुंठी भीम लक्षिला दारुण दृष्टीं
जैसा मदोन्मत्त कंरटी[1] सिंहेश्वरें लक्षावा २६

भीमाआंगीं वीरश्रीचा लोटु धरितां न धरवे अति उद्भटु[2]
अगस्ती धांवे समुद्र घोटुं तैसा झगटे पुढारां २७

दोघे पिटिती पाणितळें[3] जानुमूळें बाहुमूळें
मही ताडितां पादतळें शैलमौळें[4] थरकती २८

नरनारी नागरिक लोक पाहाती दोघांचें कौतुक
विमानयानीं वृंदारक[5] जय इच्छिती भीमातें २९

मुष्टिघातांचिया ध्वनी थरथराटें थरके धरणी
वोर्थरोनि[6] पाताळफणी मार्ग पाहे पळावया ३०

कार्तिकाचिया प्रथमदिवसीं संग्राम मांडला दोघांसी
लोटलिया त्रयोदशी निशी झाली झुंजतां ३१

चतुर्दशीचिया रात्रीं मूर्च्छा पावला मागधनृपती
ते वेळीं संकेत दावी हातीं पांडवातें माधव ३२

पाय कवळोनियां करतळीं चिरोनि करावीं दोन्ही फळीं
जरेनें सांधिला तो उखळीं[7] सांधा वेगीं बळिष्ठा ३३

१ हत्ती. २ प्रबळ. ३ हाताचे तळवे. ४ पर्वतशिखरें. ५ देव. ६ घाबरून. ७ उलढून टाक.

ऐसें बोले जंव मुकुंद तंव सावध झाला जरासंध
धांवला जैसा द्विरदमदांध झगटे विशाल द्रुमासीं ३४

प्रवर्तला महामारी पतंग जैसा वैश्वानरीं[1]
झगटे तैसा मुष्टिप्रहारीं रागें ताडी भीमातें ३५

भीमें रगडोनियां दाढा मध्यभागीं कें[2]र्षिला गाढें[3]
माथा वाहोनिया भॅंवंडा[4] चक्राकार दाबिला ३६

शतवार देऊनिया फेरे भूमीं प्रे[5]हाटिला अंगभारें
चिरोनि खंडिला द्विकरें दोहींकडे देंहुडीं[6] ३७

ते न लागती एकशवा मागध निःशेष मुकला जीवा
झाला भरंवसा पांडवा आणि माधवा पार्थासी ३८

विजयी झाला भीमसेन आ[7]नंदकंदा आल्हादपूर्ण
आवडी देऊनि आलिंगन पाठी हातें थापटिली ३९

—मुक्तेश्वरकृत भारत, सभापर्व अ. ६–७

नंतर कृष्णानें त्याच्या बंदींतले राजे सोडविले. इतक्यांत जरासंधपुत्र सहदेव तिथें आला. त्यानें सद्गद होऊन कृष्णाचे चरण धरले. कृष्णानें त्याला अभय देऊन सिंहासनावर बसविलें. अमूप करभार त्यानें पांडवांना समर्पिला. तो घेऊन हे विजयी वीर इंद्रप्रस्थाला आले. जणूं भीमाचा पुनर्जन्म झाला अशा भावनेनें धर्मानें त्याला दृढ मिठी दिली. 'देवा, असाच तुझा कृपापालव नित्य आमच्यावर असूं दे,' म्हणून कृष्णाची प्रार्थना केली.

पुढें धर्माचे चौघेहि बंधु दिग्विजयार्थ निघाले. अर्जुन उत्तर दिशेला गेला.

---

१ अग्नीवर. २ धरला. ३ घट्ट. ४ फेरा. ५ आपटला. ६ राजद्वारीं. ७ श्रीकृष्णाला.

भीमानें पूर्व दिशा घेतली. दक्षिण दिशेला सहदेव आणि पश्चिमेला नकुल गेला. थोड्याच दिवसांत समुद्रवलयांकित पृथ्वी पादाक्रांत करून चौघेहि परत आले. इंद्रप्रस्थांत रत्नांच्या राशी पडल्या. सोन्याचे पर्वत उभे राहिले. सगळें जग पांडवांच्या आधीन झालें. सगळे भूपाल त्यांचे मांडलिक बनले. धर्मराजाला चक्रवर्तीपद मिळालें.

## राजसूययज्ञ

आतां राजसूययज्ञ करायला कोणतीच आडकाठी उरली नाहीं. सर्व सामग्री सिद्ध झाली. आतेष्टांना बोलावणीं गेलीं. सप्तपुरींतल्या आणि तपोवनांतल्या ब्रह्मवृंदांना पाचारण केलें. पाहुणे आणि ब्राह्मण यांची रीघ सुरू झाली. रुक्मिणीसहित कृष्ण आला. भीष्मद्रोणांसह कौरवेश्वर आला. वेदघोष करीत व्यास-वसिष्ठादि ऋषीश्वर जमा झाले. उंची नजराण्यांनीं भरून मांडलिक राजे दाखल झाले. तुपाच्या घागरी आणि तीळ-तांदूळ यांच्यासह व्यापारी आले. पडेल तें काम करायची धमक घेऊन इष्ट-मित्र आले. साजिंद्यांसह गायक-नर्तक आले. कलाकुसरी घेऊन नाना जातींचे कलावंत आले. सुग्रास भोजनाची हांव धरून भणंगभिकारी आले. मिरवायला नट्टूनथट्टून स्त्रिया आल्या. मजा करायला बालकें आलीं. सगळें चातुर्वर्ण्य गोळा झालें. चार वर्ण, चार आश्रम, विद्या आणि कला यांचें जणूं महान् सम्मेलनच भरलें.

श्रीकृष्णानें आप्तमंडळींत एकंदर कामाची वांटणी केली. विदुरानें ऋषींची परिचर्या करावी. द्रव्य पुरविण्याचें काम अश्वत्थाम्यानें करावें. कृपाचार्यानें दक्षिणा द्यावी. दुर्योधनानें राजांकडचे नजराणे घेऊन भांडारांत ठेवावे. उणें-अधिक सगळें भीष्मानें पहावें. द्रौपदीनें वाढप संभाळावें. अशी ही सर्व अधिकारविभागणी झाली. त्यावर धर्म म्हणाला, ‘ देवा, तूं कोणतें काम घेणार आहेस ? ’ तेव्हां श्रीहरि मंदस्मित करीत म्हणाला, ‘ एक फार मोठी कामगिरी मीं माझ्यासाठीं राखून ठेवली आहे. तपोधन ऋषींचे पाय धुणें आणि त्यांची उष्टीं काढणें हा अधिकार माझा ! ’

धर्मानें यज्ञदीक्षा घेतली. ब्राह्मण होम-हवन करूं लागले. सुगंधी धूर मंडपांतून वर जाऊं लागला. मंत्र-घोषानें वातावरण निनादलें. देवांना

हविर्भाग मिळाले. अग्नि तुपाच्या अखंड धारेनें तृप्त झाला. एक वर्षपर्यंत असा अव्याहत कार्यक्रम चालला होता. तिथें न्यून कोणतेंच नव्हतें. पंक्ति मागून पंक्ति षड्रसान्नें जेवीत होत्या. भीम जेवणाऱ्या मंडळीला आग्रह करीत होता.

द्रौपदी स्वहस्तें वाढीत होती. वाढतांना तिच्या दोन्ही हातांतले चुडे झळकत होते. ती विजेसारखी लवत होती आणि हरिणीसारखी चालत होती. वाढतां वाढतां ती कौरवांच्या पंक्तींत आली. अकस्मात् तिच्या चोळीचें बिरडें सुटलें. वक्षस्थल उघडें पडलें. हात खरकटे असल्यामुळें बांधतां येईना. तें पाहून मत्सरानें जळणाऱ्या कौरवांना टवाळीला विषय मिळाला. ते एक-मेकांना खुणावूं लागले. 'वहिनी, मला लाडू वाढ. वहिनी, मला पोळी वाढ' म्हणून त्यांनीं एकच गिल्ला केला. द्रौपदी बावरली. तिचें मुखकमल कोमेजलें. कौरवांच्या त्या पापी दृष्टि तलवारींच्या टोंकांसारख्या तिच्या हृदयांत घुसूं लागल्या. 'यादवेंद्रा, श्रीकृष्णा! तूंच माझी आतां लाज राख!' म्हणून तिनें देवाची करुणा भाकली. देवानें नवलपरी दाखविली. अचानक तिला आणखी दोन हात उत्पन्न झाले. द्रौपदी चतुर्भुज झाली. त्या दोन हातांनीं तिनें चोळीची गांठ बांधली आणि पदर सांवरला. दुर्जनांचीं तोंडें काळीं पडलीं.

अशा रीतीनें यज्ञकार्य पार पडलें. नंतर जमलेल्या ब्राह्मणांना आणि राजांना अहेर देऊन त्यांचा गौरव करण्यासाठीं धर्मराजानें त्यांना मयसभेंत आणलें.

## अग्रपूजा

धर्में अहेर सिद्ध केले वस्त्राभरणांचे पर्वत पडिले
मुख्य सिंहासन मध्यें घातलें अग्रपूजा करावया १

भीष्म म्हणे धर्मराया आचार्य ऋत्विज ऋषिवर्यां
यथायोग्य पाहूनियां पूजा समग्र समर्पी २

तों धर्म म्हणे कुरुनायका माझिया जनकाचिया जनका
अग्रपूजेचा अधिकारी देखा कोण मज निरोपीं ३

भीष्म म्हणे पंडुसुता    या श्रीकृष्णाहून परता
ईं ब्रह्मांड शोधितां    श्रेष्ठ नाहीं आणिक ४

जो जगदंकुरमूलकंद[1]    जो त्रिभुवनमंदिरस्तंभ अभेद
जो विश्वंभर ब्रह्मानंद    याहून थोर कोण असे ! ५

त्या श्रीकृष्णास टाकून    कोणाचें करिसी येथें पूजन
ऐसें बोलतां गंगानंदन    सहदेवें पूजा सिद्ध केली ६

अग्रोदकाचा भरून कलश    षोडशोपचार जे जे विशेष
पूजावया आदिपुरुष    धर्मराज सिद्ध जाहला ७

पुढील कार्य जाणोनि साचार    आग्रह न धरी श्रीकरधर
पूजासनीं बैसला यादवेंद्र    जयजयकार जाहला ८

वैष्णव कीर्तन करिती    हरिरंगें आनंदें नाचती
विष्णुचरित्रें अद्भुत गाती    टाळ्या वाजविती आनंदें ९

विमानीं पाहती सुरवर    वर्षती सुमनांचे[2] संभार
सनकादिकांचे नेत्र    प्रेमजळें पूर्ण भरले १०

नाना वाद्यांचा गजर होत    बंदिजन यदुवंश वर्णित
षोडशोपचारें इंदिराकांत    धर्म पूजित ते वेळे ११

हरिचरण धरूनि हातीं    प्रेमें प्रक्षाळी धर्मनृपती
जेथोनि जान्हवीची उत्पत्ति    जे सदा तळहातीं सिंधुकन्या[3] १२

---

१ सृष्ट्युत्पत्तीचें मूळ बीज. २ फुलांचे. ३ लक्ष्मी.

केवळ ब्रह्मानंद मुरोन मूर्ति ओतिली हे सगुण
श्रुतींसाहि न वर्णवे पूर्ण बुडे मन ज्यामाजीं १३

तो अलंकारमंडित पूर्ण मुकुटकुंडलें सुहास्यवदन
कृपाकटाक्षें करून निजभक्त न्याहाळीतसे १४

कपाळीं मृगमदाचा[1] तिलक अंगीं केशरउटी सुरेख
वैजयंतीचें तेज अधिक हृदयीं पदक झळकतसे १५

हेलावला सौंदर्यसमुद्र कीं आनंदाचा लोटला पूर
देखतां श्रीरंग पूर्णचंद्र भक्तचकोर वेधले १६

कोट्यानुकोटि मीनकेतनें[2] नखांवरून सांडावे ओवाळून
त्याचें आपुले हातें पूजन पंडुनंदन करीतसे १७

वस्त्रेंभूषणेंअलंकार अर्पिले सोळाहि उपचार
करणांसहित[3] मन सुकुमार सुमनें चरणीं समर्पिलीं १८

डोळे भरून हरि पाहिला तैसाचि हृदयीं मग रेखिला
जैसा निर्वातस्थानीं दीप ठेविला तो कदाकाळीं न हाले १९

—श्रीधरकृत पांडवप्रताप अ. १८

## शिशुपाल-वध

श्रीकृष्णाची अग्रपूजा झालेली पाहून कौरव आणि तत्पक्षीय दुर्जन क्षोभले. शिशुपालानें तर धर्मावर तोंडच सोडलें. 'धर्मा, तूं मूर्ख आहेस! एका गवळ्याची अग्रपूजा करून तूं अपयश पदरीं घेतलेंस. भीष्म-द्रोण आणि

१ कस्तुरीचा. २ मदन. ३ इंद्रियांसह.

वसिष्ठ-याज्ञवल्क्य यांना सोडून तूं हा चोर, जार पुजलास तो काय म्हणून? हा नाहीं वीर, नाहीं राजा, नाहीं आचार्य! खाटकाला गाय दान द्यावी, डुकराला सिंहासनावर बसवावें, यज्ञपुरोडाश कोल्ह्याला घालावा तशी तुझी ही अग्रपूजा झाली!'

असें बोलून त्यानें कृष्णाला मारण्यासाठीं तलवार उपसली. धर्म त्याचें सांत्वन करूं लागला; पण तो ऐकेना. त्याच्याबरोबर त्याचे मित्रहि उठावले. सभेंत गदारोळ माजला. सहदेव खवळला. भीम तर त्याच्या अंगावर धांवलाच! भीष्मानें जर त्याला आवरलें नसतें तर त्याची गदा शिशुपालाच्या मस्तकावर आदळली असती.

आपल्या पाठीमागें चार लोक आहेत हें समजतांच शिशुपाल कृष्णाची निर्भर्त्सना करूं लागला. 'तूं निर्लज्ज आहेस. तूं जन्मून वृष्णिकुलाला डाग लावलास. रुक्मिणीचें लग्न माझ्याशीं ठरलें होतें तिला तूं चोरून नेलीस. तूं हीन आहेस. तूं दोन बापांचा आहेस. तूं कपटी, तूं स्त्रीघातकी, तूं ......'

शिशुपालाचे शंभर अपराध भरले. ते पुरते होण्याच्या आधीं 'मी तुझ्या मुलाला मारणार नाहीं!' हें त्याच्या आईला दिलेलें वचन पुरें झालें. आतां हा दुष्ट मेलाच पाहिजे असें मानून कृष्णानें सुदर्शनचक्राचें स्मरण केलें. कल्पांतींच्या आदित्यासारखें धगधगीत तें चक्र कृष्णाच्या हातांत विराजमान झालें. त्यानें तें शिशुपालावर फेंकलें. त्याचें मस्तक तुटून गगनपंथें उडालें आणि खालीं येऊन कृष्णचरणांवर पडलें. त्याच्या शरीरांतली जीवज्योति लखलखून कृष्णाच्या शरीरांत प्रविष्ट झाली.

रक्तानें रंगून राजसूय समाप्त झाला. पाहुणेमंडळी आली तशी निघून गेली. कृष्ण कांहीं दिवस तिथें राहून मग द्वारकेला गेला. दुर्योधन, शकुनि ही मंडळी अजून तिथें राहिली होती त्याचें कारण म्हणजे दुर्योधनाच्या मनातून एकदां ती मयसभा बारकाईनें पहायची इच्छा होती. धर्मानें दूत बरोबर दिला आणि 'दुर्योधनाला सभेचा कोनाकोपरा दाखवून आण' असें त्यास सांगितलें.

ती सभा म्हणजे एक इंद्रजाल होतें. तिथें जळाच्या जागीं स्थळ आणि स्थळाच्या जागीं पाणी, तसेंच भिंत असेल तिथें दार आणि दार असेल तिथें भिंत असे अनेक दृष्टिभ्रम त्या कुशल कारागिरानें मुद्दाम निर्माण केले होते.

दुर्योधन पदोपदीं फसूं लागला. एकदां तर जमीन म्हणून पाय ठेवला तो नेमका पुष्करिणींत पडला! दुर्योधन सपशेल आडवा झाला. सगळे लोक हंसले. द्रौपदीहि हंसली. भीमानें तर 'आंधळयाचा मुलगा शोभतोस बाबा!' असे उद्‌गार काढून टाळी पिटली.

दुर्योधनाला ते उद्‌गार झोंबले. 'याचें कधीं तरी उट्टें काढीन!' असा डंख धरूनच तो हस्तिनापुराला आला. त्याला चैन पडेना. अंतरांत आगडोंब उठला. नको हे प्राण आणि नको हें जिणें असें त्याला वाटूं लागलें. तो एक दिवस शकुनीकडे गेला आणि म्हणाला—

"मामा! वैऱ्यांनीं माझा अपमान केला तो सहन होत नाहीं रे! याचा सूड घेतलाच पाहिजे. पांडव भणंगभिकारी होऊन रानोमाळ हिंडले पाहिजेत. त्यांची साम्राज्यसंपत्ति माझ्या घरीं चालून आली पाहिजे. त्यांची सत्ता माझ्या हातीं मिळाली पाहिजे. मामा, तूं मोठा हिकमती आहेस. कपटकारस्थानें खेळण्यांत तुझ्यासारखा तूंच! कांहीं तरी युक्ति शोधून काढ आणि पांडवांना भिकेला लाव!"

त्यावर शकुनि बोलला—

"पांडवांना युद्धांत जिंकणें शक्य नाहीं! त्यांना युक्तीच्या बळावरच आकळिलें पाहिजे. मी कपटद्यूतांत प्रवीण आहें. फांसे माझ्या आज्ञेंत वागतात. तूं बापाला सांगून कोणत्या तरी निमित्तानें पांडवांना इथें बोलावून घे. धर्म आहे भोळा. त्याला द्यूतांतले डावपेंच कळत नाहींत. मी त्याला चढवीन चढवीन आणि त्याची सर्व संपत्ति हिरावून घेईन!"

दुर्योधनाला परमानंद झाला. त्यानें जाऊन बापाच्या पायांशीं धरणें घेतलें. 'पांडवांनीं कष्टानें मिळविलेलें साम्राज्य आणि वैभव शकुनीमामा अनायासानें आम्हांला मिळवून देत आहे; फक्त तुम्ही आज्ञा द्या नि पांडवांना इथें बोलावून घ्या' असा त्यानें धृतराष्ट्राला आग्रह चालविला. साम्राज्याची गोष्ट ऐकतांच आंधळयाच्या तोंडालाहि पाणी सुटलें.

धृतराष्ट्रानें विदुराला त्या कामगिरीवर पाठविलें. 'आमच्या घरीं महोत्सव होणार आहे. तुम्ही कुंती–द्रौपदीसह हस्तिनापुराला या. चार दिवस आनंदांत कालक्रमणा करा आणि मग निघून जा.' असा माझा पांडवांना निरोप सांग

असें त्यानें विदुराला सांगितलें. विदूर इंद्रप्रस्थाला आला. पांडव त्याला सामोरे गेले. धर्मानें त्याची सन्मानानें पूजा केली. विदुरानें त्याला धृतराष्ट्राचा निरोप सांगितला आणि म्हटलें,

"कौरवांनीं आणखी एक कपट रचलें आहे. तुझ्याशीं द्यूत खेळून तुझ्या सर्वस्वाचा अपहार करायचा असा त्यांचा बेत आहे. सगळ्या दुर्जनांचा मेळावा तिथें जमणार आहे. मला तिथें तुला सांगतां येणार नाहीं म्हणून आतांच बजावतों. प्राण गेला तरी त्यांच्याशीं तूं द्यूत खेळूं नको!"

'जशी आपली आज्ञा!' म्हणून धर्मराज उठला. चतुरंग दळ सांगातीं घेऊन तो हस्तिनापुराकडे जायला निघाला. नगराजवळ येतांच दुर्योधनानें पुढें येऊन त्याला उतरून घेतलें. मंगलवाद्यें वाजवीत त्याला राजवाड्यांत नेलें. दुर्योधन स्वतः सेवेला सिद्ध झाला. नम्रता धरून त्यानें धर्माच्या अंतरांत विश्वास उत्पन्न केला. गोड गोड बोलून त्याला सुखविलें.

## कपटद्यूत

एक दिवस राजसभेंत सर्व मंडळी बसली असतां दुर्योधन आळस देऊन म्हणाला, 'काय करावें बुवा, वेळच जात नाहीं. जीव कसा आंबून गेला आहे!' त्यावर शकुनि म्हणतो, 'वेळ घालवायला सोपा उपाय आहे. द्यूत-प्रवीण धर्मराज तुझ्याजवळच बसला आहे. त्याच्याशीं चार डाव खेळ. त्यांतूनहि पण लावून खेळ मांडला तर साऱ्या सभेंत एकदम रंग भरेल. चुटकीसरसा वेळ निघून जाईल!'

दुर्योधन म्हणाला, 'वाः मामा! कल्पना छान काढलीस!' धर्मानेंहि संमतिदर्शक मान डोलविली. लगेच शकुनीनें आपले चकचकीत फांसे आणले. द्यूताची गोडी असलेला धर्मराज लागलींच पुढें सरसावला. दुर्योधनानें त्याला सांगितलें कीं, 'माझ्या वतीनें शकुनि खेळेल. मी जवळ बसून गम्मत पाहीन. त्याची जी हार-जीत होईल ती माझी हार-जीत असें समजायचें!' धर्मानें ती गोष्ट मान्य केली.

त्यानें फांसे हातांत घेऊन खुळखुळविले. दुर्योधन पण बोलला. 'पोऽऽ बाराऽऽ' म्हणून धर्मानें फांसे टाकतांच भीमानें गर्जना केली. धर्माला हवें

तें दान पडलें. दुर्योधन पण हरला. असें एकदां नव्हे तर पांचदा झालें. दुर्योधनाचें पाणी उतरलें. तो खिन्न झालेला पाहून शकुनीनें फांसे उचलले. धर्माकरवीं भीमाला गप्प बसायला लावलें. धर्म पण बोलला. शकुनीनें फांसे ढाळले. इष्ट दान पडून धर्माचा पण त्यानें जिंकला.

नंतर धर्मानें आपला विजयरथ पणाला लावला. तो हरतांच हत्ती पणाला लावले. ते गेल्यावर घोडे पुढें केले. धर्म चेव भरल्यासारखा पण लावीत सुटला आणि शकुनि जिंकीत सुटला. फांसे म्हणजे जणूं त्याचे आज्ञाधारक दास! तो बोलेल तें दान! पांडवांची लक्ष्मी हस्तिनापुरची वाट चालूं लागली. कौरवांना उन्माद चढला. ते हर्षानें एकमेकांना मिठ्या मारूं लागले!

विदुराला हें पहावेना. त्यानें धृतराष्ट्राला हा प्राणघातक खेळ बंद करायला सांगितलें; पण तो स्तब्ध बसला आणि हें पाहून कौरवांनीं विदुराचा हवा तसा अपमान केला. विदुर बिचारा दैवाला बोल लावीत शांत बसला. मग शकुनीनें धर्माला म्हटलें,

" धर्मा! धीर खचूं देऊं नको. हा द्यूतयज्ञ आहे. पूर्णाहुति पडल्यावांचून हा थांबला तर तुझी अपकीर्ति होईल. तूं उदारांचा राणा आहेस. वैभव तुला कःपदार्थ आहे. आतां आणखी कांहीं तरी मोठासा पण लाव. एक डाव तुला अनुकूल पडला तर हरवलेलें सगळें परत मिळवशील!"

धर्म अविचाराला पेटला. त्यानें सगळें राज्य पणाला लावलें. फांसा शकुनीच्या बाजूनें पडला. डोळ्यांचें पातें लवतें न लवतें एवढ्या अवधींत राज्य गेलें! पण धर्म तेवढ्यावरच थांबला नाहीं. त्यानें आपले चौघे बंधु पणाला लावले. नंतर स्वतःला पुढें केलें आणि त्यांतहि हरला! शेवटीं त्रिलोकसुंदरी द्रौपदी हिच्या नांवानें पण उच्चारला. शकुनीनें तिलाहि जिंकलें अन् फांसे टाकून विकट हास्य केलें!

अनर्थानें अशी परिसीमा गांठलेली पाहून सज्जनांनीं हाहाकार केला. ऋषींनीं वक्षस्थळें पिटलीं. राजांनीं कपाळें बडविलीं. भीष्म-द्रोणांच्या नेत्रांतून अश्रु ढळढळले! दुर्योधन, कर्ण, शकुनि यांचा आनंद गगनांत मावेना. आंधळाहि मनांत आल्हादला. कौरव विवेकभ्रष्ट झाले. एका अविचारांतून दुसरा अविचार जन्मला.

दुर्योधनानें द्रौपदीला सभेंत आणण्यासाठीं दुःशासनाला पाठविलें. असलें निंद्य कर्म करायला दुसरा कोण धजणार होता ? तो राणीवशांत गेला. द्रौपदी एकवस्त्रा, ऋतुमती अशी तिथें बसली होती. तिला त्यानें द्यूताचा सर्व वृत्तांत जाणविला. तो ऐकून तिला काळजांत सुरी घातल्यासारखें झालें. सुकुमार कमलिनीवर वज्रघात झाला आणि त्यांतच दुःशासनानें दुःखावर डागण्या दिल्या. तो तिला म्हणाला,

" द्रौपदी ! तूं आतां पांडवांची भार्या नसून आमची बटीक आहेस. मात्र दुर्योधनाला वरलंस तर तूं या साम्राज्याची पट्टराणी होशील. चल ऊठ ! तुला सम्राट् दुर्योधन सभेंत बोलावतो आहे ! "

" भाऊजी, मी कशी येऊं ? मी एकवस्त्रा आहे. सभेंत वृद्ध मंडळी बसली आहेत. अशा स्थितींत मी तिथें येणें उचित नव्हे. भाऊजी ! तुम्हीच माझी लाज राखा. शस्त्र घेऊन माझं शिर धडावेगळं केलंत तरी चालेल; पण ही विटंबना माझ्या कपाळीं आणूं नका. माझ्यावर कृपावंत व्हा ! "

" बस कर तुझी वटवट ! बटकुर तें बटकुर अन् वर तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगतं ! "

हा अतिप्रसंग करील हें जाणून द्रौपदी अंतरगृहांत जाऊं लागली. तत्क्षणीं दुःशासनानें पुढें होऊन तिची वेणी धरली. हिंसकाला कुठली दया ? वाटपाड्याला कुठली माया ? त्यानें वेणीला हिसडा देतांच ती धरणीवर कोसळली. ' भाऊजी, नको. तुमच्या पायां पडतें ! ' म्हणून आक्रंदूं लागली ; पण तो निर्दय दरदरां ओढीत तिला घेऊन चालला.

तिला सभेंत आणून उभी करतांच दुःशासनानें सगळ्यांकडे अभिमानानें पाहिलें. जणूं तो मेरुमांदराएवढा पराक्रम करून आला होता ! दुर्योधनानें तिला आपली मांडी उघडी करून दाखविली. ' जा, त्या माडीवर जाऊन बैस. दुर्योधन हाच तुझा आतां जीवनाधार ! ' कर्ण तिला म्हणाला. तिनें पांडवांकडे दीन दृष्टिक्षेप टाकला ; पण ते निस्तेज, भणंग होऊन बसले होते !

भीमाला मात्र क्रोध आवरला नाहीं. त्यानें आपली गदा उचलली. त्याचे डोळे संतापाची आग ओकूं लागले ; पण धर्मानें त्याला आवरलें. ' तुझा राग शमत नसला तर ती गदा माझ्या डोक्यांत घाल ! ' तो म्हणाला.

दुःशासन द्रौपदीचा बुचडा एकसारखा खेचीतच होता. 'तूं दासी, तूं जिता!' असे शब्द चहूंकडून तिच्या कानांवर आदळत होते. ती शत्रूंच्या वेढ्यांत सांपडली होती. एक नव्हे तर पांच पति जवळ जिवंत असूनहि तिचें रक्षण करूं शकत नव्हते. तिनें मग आपल्या बुद्धिबळाचा आधार घेतला. सभेंतल्या वृद्धमंडळीला, त्या जनताजनार्दनाला तिनें एक मुद्द्याचा प्रश्न टाकला.

" ज्ञानवृद्ध हो! माझा न्याय करा. धर्मानें द्यूतांत आधीं स्वतःला हरवल्यावर मग मला पणाला लावण्याचा अधिकार त्याला कसा पोंचतो? भीष्माचार्य, बोला! द्रोणाचार्य, बोला! कृपाचार्य, याचा निर्णय सांगा! मी जिता कीं अजिता? मी स्वतंत्र कीं दासी?"

तो रोकडा सवाल ऐकून सगळे मूकस्तंभ झाले. द्रोण मात्र म्हणाला,' मुली, तुझी आम्हांला दया येते; पण तुझ्या प्रश्नाचें निर्णायक उत्तर आम्हांला देतां येत नाहीं. धर्माचें तत्त्व गहन आहे. भल्याभल्यांची मति तिथें गुंग होते.' भीष्महि असेंच कांहीं तरी गुळमुळीत बोलला. त्यामुळें कौरवांना अधिकच चेव भरला. कौरवांपैकीं एकट्या विकर्णानें मात्र द्रौपदीची बाजू घेतली; पण कर्णानें त्याला वेड्यांत काढलें. तो बोलला,

" अरे, ही कसली सती! हिला तर पांच नवरे आहेत. ही जारिणी आहे आणि जारिणीला कसली आली आहे लज्जा अन् प्रतिष्ठा! दुःशासना! पहातोस काय? फेड तिचें वस्त्र आणि या पांडवांचींहि वस्त्रें हिरावून घ्या!"

दुःशासनाला पडत्या फळाची आज्ञा पुरली. माकडाच्या हातीं कोलीत मिळालें. त्यानें विनय अन् सभ्यता यांना मूठमाती देऊन त्या भरसभेंत द्रौपदीच्या निरीला हात घातला! 'आतां माझा निर्वाणीचा सखा श्रीहरिच! तोच धांवण्या धांवून आला तर माझी लाज राखील!' अशा निर्धारानें तिनें मनोमन देवाचा धांवा मांडला.

## द्रौपदीचा धांवा

हे नाथ, रमानाथ, व्रजनाथ, हरे, मुकुंद, कंसारे।
गोविंद, कृष्ण, केशव, दीनार्तिहरस्त्वमेव संसारे[1]। १

---

१ दीनांची पीडा दूर करणारा.

काळेंहि सख्या ! न तुझ्या दासीस पहावयासहि सकावें
त्वद्भगिनीवस्त्र खळें नग्न करायास काय हिसकावें ? २

भगिनी ऐसें वदल्यें परि फारचि लाजल्यें न हें लटिक
प्रभुजी ! रक्षा तुमच्या दासांची मी लहानशी बटिक ३

कीर्त्यर्थ उद्धरीं मज, उद्धरिलें जेविं सागरीं महिला
त्वद्दासांची होती त्या अमृतीं[1] आजि या गेरीं[2] महिला[3] ४

बा, ढळतां तिळहि पदर भांवि[4] व्यजनांसि[5] सागस[6] रामा[7] जी
ती खळसभेंत उघडी पडल्ये न पडोनि सागरामाजी ५

आजि असत्परपुरुषस्पर्श, न अपराध अन्य केला हो
झांका प्रसादपदरें न कुजनदृक्स्पर्श कन्यके, लाहो ६

अवतरला उतराया जो दुःसह दुष्टभार महिवरला
अहिवरलास्यपटु[8] प्रभु करुणोक्तें द्वारकेंत गहिंवरला ७

परमेश्वर रूप धरी स्वपर-जन-हितोदया[9] लुगडियांचें
निववाया सभ्यांसह नयन मन हि तो दयालु [10]गंडियांचें ८

हा अंबरावतार[11] श्रितलज्जारक्षणार्थ अकरावा
प्रभुमत असें, सदैवनीं[12] आग्रह वेषीं कदापि न करावा ९

---

१ सुखांत. २ विषांत. ३ स्त्री. ४ मानते. ५ पंख्यास. ६ अपराधी. ७ स्त्री. ८ कालियाचें मर्दन करणारा. ९ भक्तांच्या कल्याणासाठीं. १० भक्तांचें. ११ वस्त्रावतार. १२ सज्जनरक्षणीं.

शेले, शालू, साड्या, क्षीरोदकें[1] लांब रुंद पाटावें[2]
झाला अनंत वस्त्रें कीं तीस अनाथसें न वाटावें १०

— मोरोपंतकृत आर्याभारत, सभाप० अ. ५

सोन्याच्या द्वारकेंत श्रीहरि रत्नमंचकावर पहुडला होता. रुक्मिणी चरण चुरीत होती. तोंच द्रौपदीचा धांवा कानांवर आदळला. कृष्ण ताडकन् उठला. जाण्याची लगबग झाली. कौस्तुभ आणि वैजयंतीसुद्धां सांवरण्याचें भान त्याला उरलें नाहीं. मनपवनाला मागें सारून देव हस्तिनापुरांत आला. वस्त्ररूपीं नवा अवतार धरून तो द्रौपदीच्या कायेला वेढून राहिला. तिला साक्षात्कार झाला. ती निर्भय झाली.

'पहातोस काय वेंधळ्यासारखा ! ओढ वस्त्र.' म्हणतांच दुःशासनानें लुगडें फेडलें. आतां द्रौपदीची लज्जा उघडी पडलेली पहायला मिळणार म्हणून त्या दुष्ट अधाशांचे डोळे ताठ उघडले होते ; पण दृश्य दिसलें तें वेगळेंच ! एक वस्त्र फेडतांच त्याच्या आंत दुसरें तसेंच चापूनचोपून नेसलेलें. तें फेडलें तों डाळिंबी रंगाचें तिसरें. त्याच्या आंत चवथें क्षीरोदक तयारच. तें हिसकल्यावर त्याच्या आंत चौकड्यांची साडी. त्याच्या आंत रेशमी पाटाव. त्याच्या आंत चित्रवर्ण चुनडी. नाना रंगांचीं आणि नाना पेठांचीं लुगडीं. पर्वतप्राय ढीग पडला. दुःशासनाचे हात ओढतां ओढतां लुले पडले ! देह घामानें डबडबला ; पण द्रौपदीची प्रतिष्ठा अभंग राहिली !

सभा चित्रासारखी स्तब्ध झाली. इतक्यांत चहूं बाजूंनीं उत्पात उठले. भालू ओरडूं लागल्या. भरदिवसा कोल्हेकुई सुरू झाली. एकाएकीं आभाळ आलें. सूर्यानें डोळे झांकून घेतले. मेघ रक्तधारा वर्षले. भीमानें करकरां दांत खाल्ले. गदा घेऊन तो उभा राहिला. त्याचे शब्द तापल्या सळईसारखे लोकांच्या कानांत घुसले.

" दुर्योधना, कुलांगारा ! द्रौपदी तुला 'नोवरी' हवी नाहीं का ? तिच्याऐवजीं ही गदानोवरी तुझ्या मांडीवर बसेल. तिला घेऊन तूं रणभूमीवर

---

१ पांढरें पातळ. २ वस्त्रें.

शयन करशील. द्रौपदीच्या अंगाला आतळणाऱ्या दुःशासनाचें कंठरक्त मी घटघटां पिईन......... !"

भीमाचे ते जळते बोल ऐकून धृतराष्ट्र घाबरला. त्यानें द्रौपदीचें सांत्वन केलें. 'कौरवकुलतारिणी' म्हणून तिचें गौरव केलें. 'झाल्या गोष्टी विसरून जा, माझ्या पोरांकडे पाहूं नको, मजकडे पहा आणि शांत हो!' असें तिला विनविलें. तुला काय हवें तें मजकडून मागून घे असेंहि म्हटलें. त्यावर द्रौपदीनें मागितलें.

"मामंजी, माझे पति आणि पुत्र दास्यांतून मुक्त होऊं देत! त्यांचीं शस्त्रें, वस्त्रें आणि राज्यवैभव त्यांना मिळूं दे. दासी, बटीक हा कलंक मलाहि नसूं दे!"

धृतराष्ट्रानें 'तथास्तु' म्हटलें. सज्जनांचा जीव खालीं पडला. दुर्जनांचीं नाकें ठेंचलीं गेलीं. पांडव जसे आले तसेच सत्तावैभवाशीं इंद्रप्रस्थाला जाण्यासाठीं निघाले.

पांडवांची पाठ वळतांच कौरवांनीं धृतराष्ट्राभोंवतीं गराडा घातला. सगळयांनीं त्याला मूर्खांत काढलें. शकुनि म्हणाला, 'आमचा डाव तूं फुकट घालवलास. पांडव म्हणजे तक्षक. त्यांना तूं दुखवून सोडून दिलेंस. ते आतां महामारीं पेटतील. डंख धरून आमचा सूड घेतील. तुझें समूळ निसंतान होईल. मग रडत बसशील! राजा, अजून सावध हो. अजून त्यांना परत बोलावून आण. मी अवघे दोनच डाव त्यांच्याशीं खेळतों. निश्चितपणें हार लावून त्यांना राज्यभ्रष्ट करितों. तुझ्या पोरांच्या कल्याणाचा हाच एक मार्ग आहे......"

धृतराष्ट्र म्हणाला—"मुलांनो! माझं ऐका. तुटलें वैर सांधूं नका. विझलेला वाह्नि पेटवूं नका. तुमच्या बुद्धीला चळ भरला आहे. हें बऱ्या-भल्याचं लक्षण नव्हे!"

तेव्हां शकुनि पुढें झाला. "महाराज, आम्ही चुकत नाहीं. तुम्ही चुकतां आहां. माझ्या फांशांवर माझा अढळ विश्वास आहे. अवघ्या दोन डावांत मी कौरवेश्वराला सम्राट् बनवीन. राज्यलक्ष्मी केवळ तुमच्या होकाराची वाट पहात आहे."

शकुनीला सर्वांनीं दुजोरा दिला. राजाचा निरुपाय झाला. मुलांच्या दुष्ट आग्रहाला तो बळी पडला. पुनश्च पांडवांना निरोप गेला. पुनश्च धर्मराज अर्ध्या वाटेंतूनच परत आला. पुनश्च द्यूत प्रवर्तलें. शकुनीनें धर्माला म्हटलें,

"आतां फक्त दोनच डाव खेळायचे. पडेल तो फांसा. घडेल तो निकाल. पहिला पण राज्याचा. जो हरेल त्यानें दुसऱ्याला राज्य द्यायचें. दुसरा पण बारा वर्षें वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास. जो हरेल त्यानें ही शिक्षा भोगायची. अज्ञातवासांत उघडकीला आल्यास परत बारा वर्षें वनवास सोसायचा !"

धर्मानें संमति दिली. शकुनीनें फांसे ढाळले. पहिला आणि दुसरा असे दोन्ही डाव त्यानेंच जिंकले. पांडवांना हार आली. कौरवांनीं जयजयकार केला. त्यांच्या निशाणभेरी दुमदुमल्या. पांडवांनीं आपलीं वस्त्रभूषणें काढून ठेवून वल्कलें पांघरलीं. त्याच पावलीं ते वनवासाला निघाले. जातांना त्यांनीं कौरववधाच्या प्रतिज्ञा उच्चारल्या. कुंतीला विदुराच्या घरीं ठेविलें.

पांडवांचा पुरोहित धौम्यमुनि अग्नि आणि दर्भ घेऊन सर्वांच्या पुढें निघाला. वस्त्रानें तोंड झांकून धर्म गेला. भुजा उभारून भीम गेला. मुठींतली वाळू सांडीत सांडीत अर्जुन गेला. चिखलानें तोंड माखून सहदेव चालला. अंगाला माती लेपून नकुळ चालला आणि सर्वांच्या मागून केस मोकळे सोडून द्रौपदी निघाली.

पांडव कसे गेले हें विदुरानें धृतराष्ट्राला सांगितलें. त्यांनीं दाखविलेल्या चिन्हांचा अर्थहि कथन केला. धृतराष्ट्राचें काळीज भयानें दुभंगलें. त्यानें कपाळावर हात मारून घेतला !

# वनपर्व

पांडव वनवासाला निघाल्यावर हास्तिनापुरांतल्या प्रजाजनांचा लोंढा त्यांच्यामागून निघाला. नको या राज्यांत राहणें ! इथें अधर्म माजला. पापांचे पर्वत झाले. दुष्ट बुद्धि हमामा घालूं लागली. आपण आपले पांडवांच्या समागमें राहूं. ते वनांत तर आपण वनांत ! असा त्यांनीं विचार केला. व्यापारी–कोठारी, साळी–माळी, रजक–रंगारी, शिल्पकार–चर्मकार सगळ्या जातींचे आणि सगळ्या धंद्यांचे लोक नगरांतून उठले. नगर ओसाड वाटूं लागलें.

त्यांचें आपल्यावरील निःस्वार्थ प्रेम पाहून धर्म गहिंवरला. 'लोकहो ! आम्हांला घोर अरण्यांत जाणें आहे. तुम्ही आमच्याबरोबर येऊं नका. सुखानें घरीं नांदा. सुयोधन तुम्हांला प्रेमानें पाळील. भीष्म–द्रोण तुमच्या कल्याणाची चिंता वाहतील. तुम्ही आतां मागें फिरा !' अशी त्यानें सर्वांची प्रार्थना केली. धर्माचा शब्द मोडायचा नाहीं म्हणून लोक कष्टानें मागें फिरले.

लोकांना परत पाठवून ते गंगातीरावर येतात तों ऋषि–मुनींचा मेळावा त्यांच्याकडे आला. कोणी अग्निहोत्री, तर कोणी याज्ञिक ; कोणी चतुर्वेदी, तर कोणी षड्शास्त्री ; कोणी जपी, तर कोणी तपी. त्यांनीं धर्माला सांगितलें,

"राजा युधिष्ठिरा, आम्ही तुझ्या सांगातीं येऊं. तुला कथापुराणें ऐकवूं. तुझ्याशीं विशद आत्मचर्चा करूं. तुझ्यासाठीं अनुष्ठानें करून तुझें सर्वदा कल्याण चिंतूं."

धर्माला त्यांच्या इच्छेचा अनादर करवेना ; पण एवढ्या मंडळींचा योगक्षेम आपल्या हातून कसा चालणार या चिंतेनें तो खिन्न झाला. त्यावर शौनकानें त्याला सूर्याची उपासना करायला सांगितलें. धर्मानें निश्चक्र उपोषण करून तप मांडलें. सूर्य प्रसन्न होऊन त्याच्यापुढें उभा राहिला. धर्माच्या हातांत एक थाली दिली आणि सांगितलें, 'हिच्यांतून षड्रस अन्न हवें तेवढें निर्माण होईल. सर्वांना वाढून द्रौपदी जेवली कीं, मग संपेल. रात्रीच्या वेळीं ही स्थाली रिकामी राहील. सकाळीं पुनश्च अन्नानें भरेल !'

धर्मानें ती स्थाली द्रौपदीच्या हातीं दिली. तिच्यामुळें सर्वांची दुपारची वेळ उत्तम प्रकारें साजरी होऊं लागली. धर्माची काळजी दूर झाली. पुढें तो सर्व ऋषींसमवेत द्वैतवनाकडे जायला निघाला.

## किर्मीरवध

मार्ग चालतां चालतां रात्र झाली. चहूंबाजूंनीं अंधकार दाटला. वृक्ष-वेलींच्या दाटीवाटींतून वाट काढणें दुष्कर होऊं लागलें. तशांतच किर्मीर नांवाचा एक राक्षस त्यांना आडवा आला. आकार पहावा तो पर्वतासारखा, वर्ण पहावा तो काजळासारखा. दाढा शुभ्र पण भयानक. कपाळीं शेंदुराचा मळवट आणि अंतरांत माणसाच्या रक्ताची तहान !

त्यानें पांडवांना 'तुम्ही कोण?' म्हणून विचारलें. त्यांनीं आपलें नाम-गोत्र सांगितलें. 'तुमच्यांतला भीम तो कोणता?' म्हणून विचारतांच भीम त्याच्यापुढें उभा राहिला. त्याला पहातांच राक्षसाच्या दाढा करकरां वाजल्या.

"बरा सांपडलास भीमा! मी बकासुराचा भाऊ. आजवर तुलाच शोधीत होतों. भावाच्या वधाचा सूड घेण्याचा सुयोग आज आला. आतां तुझीं शंभर वर्षें भरलीं. तुला दांतांखालीं रगडतों. तुझ्या कढत रक्तानें भावाचें तर्पण करतों...!" किर्मीर बोलला.

मग दोघांचें युद्ध जुंपलें. दोघांनींहि वृक्ष उपटले. दोघांनींहि शिळा उचलल्या. भीमानें त्याला खूप खेळवलें, लोळवलें. शेवटीं पालथा घालून एका हातानें केस अन् दुसऱ्या हातानें तंगड्या धरून काडकन् मधें मोडलें. राक्षस गतप्राण झाला! द्रौपदीनें भीमाच्या पराक्रमावरून आपला जीव ओवाळून टाकला. मग ते सर्वजण द्वैतवनांत पोंचले.

तिथें आश्रम उभारले गेले. ऋषींनीं यज्ञशाळा स्थापल्या. व्रतें-हवनें सुरू झालीं. ओंकार-वषट्काराचे ध्वनि उमटूं लागले. वनवासी असतांहि रोज सहस्रभोजनें धर्माच्या हातून घडत राहिलीं.

द्वैतवनांत पांडव सुखानें काल क्रमीत आहेत हा वृत्तांत पांथस्थ ब्राह्मणांनीं येऊन सांगितल्यावर इकडे हस्तिनापुरांत दुर्योधन तळमळूं लागला. पांडवांना अत्यंत कष्ट व्हावे, त्यांनीं यातना भोगाव्या ही त्याची उत्कट इच्छा! पण

तसें कांहींच त्याच्या कानांवर येईना. त्यांच्यावर आपोआप कांहीं विघ्न कोसळत नसेल तर आपण इथून तशी काहीं तरी योजना केली पाहिजे हा विचार आतां तो करूं लागला.

## दुर्वासाचें आगमन

त्याच वेळीं दुर्वासमुनी तेथें आला. तो महाछलक आहे हें दुर्योधनाला माहीत होतें म्हणून त्यानें त्याचा राजेशाही थाटानें सत्कार केला. नाना प्रकारांच्या मिष्टान्न भोजनांनीं त्याला तोषविलें. प्रसन्न होऊन दुर्वासानें ' वर माग ! ' म्हणतांच दुर्योधनानें हात जोडून म्हटलें,

" मुनिश्रेष्ठा ! आमच्या घरीं पायधूळ झाडून आम्हांला जसें कृतार्थ केलेंत तसें द्वैतवनांत जाऊन पांडवांनाहि कृपेचें पसायदान द्यावें अशी इच्छा आहे. कारण तेहि आमचेच भाऊ आहेत. आम्हांला मिळालेला लाभ त्यांनाहि मिळावा असें मला मनापासून वाटतें.

दुर्वासानें ' तथास्तु ' म्हटलें अन् त्याची संक्रांत साठ सहस्र शिष्यांसह द्वैतवनाकडे वळली. तिथें पोंचेपर्यंत दोन प्रहर रात्र झाली. पांडव झोंपले होते ते उठून त्यांच्या स्वागतासाठीं सज्ज झाले. दुर्वास म्हणाला,

" धर्मा ! फार भूक लागली आहे. माझी शिष्यमंडळी वाटचालीनें थकून गेली आहे. तेव्हां लौकर भोजनाची सिद्धता कर. आम्ही नदीवर जाऊन स्नान करून येतों. "

दुर्वास स्नानाला गेल्यावर धर्म द्रौपदीकडे गेला. " द्रौपदी, उभी काय राहिलीस ? भोजनाच्या सिद्धतेला लाग. ब्राह्मण नव्हे ; मूर्तिमंत प्रळयरुद्र आहे तो ! खवळला तर आमची राखरांगोळी करील ! "

" पण मी काय करूं अशा वेळीं ? रात्र असल्यामुळें स्थाली काम देणार नाहीं अन् आश्रमांत तर कंदमुळेंसुद्धां शिल्लक नाहींत ! "

" ही जबाबदारी तुझी आहे. ती तुला पार पाडलीच पाहिजे. मला कांहीं विचारूं नकोस. मी शापाला भीत नाहीं ; पण सत्त्वाला भितों. सत्त्व हरपलें कीं, पांडवांचें काय उरलें मग ?—" असें बोलून धर्म दूर झाला.

द्रौपदीवर संकट पडलें. तिला कांहींच सुचेना. शेवटीं बाहेर येऊन ती

तुळशीपुढें उभी राहिली. दीनदयाळ द्वारकेच्या राण्यावांचून तिला कोणाचा आधार होता आतां ! त्यालाच तिनें साद घातली.

म्हणे श्रीरंगा इंदिरावरा     धराधर[1]शयना विश्वंभरा
भक्तमानसचकोरचंद्रा     करुणासमुद्रा गोपाळा     १

कमलोद्भवजनका कमलनयना     कमलनाभा कमलशयना
कमलनायका कमलवदना     कमलसदना कमलप्रिया     २

लाक्षासदनीं रक्षिलें श्रीहरी     उघडें करितां सभेमीतरीं
उडी घालूनि मुरारी     पूर्ण कैवारी जाहलासी     ३

तुजवांचूनि ये संसारीं     तारक कोण आहे कंसारी
या वेळीं सत्त्व राखे हरी     धांव झडकरी माउलिये     ४

भक्तवत्सला अतिउदारा     श्रीकरधरा श्यामसुंदरा
माझे विसांविया सर्वेश्वरा     करावी त्वरा ये वेळे     ५

धांवा पुकारीत याज्ञसेनी     उभी राहोनि वृंदावनीं
द्वारके[2] उजू बद्ध[3]पाणी     स्तवन करी कृष्णाचें     ६

तों इकडे द्वारावतीस वेळे     ताट रुक्मिणीनें विस्तारिलें
ग्रास घ्यावा तों घननीळें     शब्द ऐकिले भगिनीचे     ७

द्रौपदीचे शब्द कोमल     करुणारसभरित सुढाळ
हृदयीं गहिंवरला गोपाळ     ताट दूरी ढकालिलें     ८

उभा राहिला चक्रपाणी     तटस्थ पाहे रुक्मिणी
धांव घेतली ते क्षणीं     न बोलतां अतिवेगें     ९

१ शेषशयना. २ द्वारकेसमोर. ३ हात जोडून.

सत्त्वर येऊन वनमाळी उमा ठाकला द्रौपदीजवळी
प्रेमें आलिंगिली पांचाळी तये वेळीं गोपाळें १०

नेत्र उघडोनि द्रौपदी पाहे तों पुढें घनश्याम उभा आहे
दृढ धरूनियां पाये मुख पाहे श्रीहरीचें ११

श्रीरंग म्हणे द्रौपदीमाये मज़ बहु क्षुधा लागली आहे
धांवोनि आलों लवलाहें ताट दूर करोनियां १२

द्रौपदी म्हणे कमलाधवा ऋषींलागीं केला तुझा धांवा
जगज्जीवना केशवा आतां बाहूं कोणासी ? १३

कृष्ण म्हणे झडकरी कांहीं तरी पाहें गृहांतरीं
थाली मज दावीं लौकरी कांहीं तरी असेल आंत १४

द्रौपदी सद्गद बोले वचन थाली म्यां पालथी घातली धुवून
कृष्ण म्हणे कांहीं भक्षिल्याविण माझें मन तृप्त नव्हे १५

थाली मज पाहूं दे आधीं ते आणोनि दाखवी द्रौपदी
तों एक भाजीचें पान कृपानिधि दावी हात करोनियां १६

जगत्पालक जगन्नाथ द्रौपदीपुढें ओढवी[1] हात
येरीनें घातलें त्वरित म्हणे मी तृप्त इतुकेन १७

तें शाखादेल[2] लवलाहीं मुखीं घाली क्षीराब्धिचा जांवई
ढेंकर दिधला ते समयीं म्हणे धालें[3] त्रिभुवन हो १८

— श्रीधरकृत पांडवप्रताप, अ. २४

---

१ पसरला. २ भाजीचें पान. ३ तृप्त झालें.

द्रौपदीच्या स्थालीला चिकटून राहिलेलें तें भाजीचें पान खाऊन विश्वंभर परमात्मा संतुष्ट झाला. 'आतां कांहीं चिंता करूं नको!' असें द्रौपदीला आश्वासून त्यानें लगेंच माव रचली. नदीवर स्नान करणाऱ्या ऋषींचीं पोटें कांहीं न खातांच एकाएकीं भरलीं. त्यांना सुवासिक ढेंकरी येऊं लागल्या. कांहींच्या पोटांना तडस लागली. कांहीं वाळवंटांतच गडबडां लोळूं लागले. दुर्वासाचीहि घालमेल सुरू झाली.

इतक्यांत सहदेव नदीवर जाऊन 'भोजनाला चला!' म्हणून घाई करूं लागला. 'आतां काय जेवणार कपाळ!' म्हणून दुर्वास रडवेला झाला. 'दुर्योधनाची दुष्टबुद्धि ऐकून मीं भगवद्भक्तांची छळणा केली. अपरात्रीं येऊन त्यांच्याकडे भोजन मागितलें. त्यांचें सत्त्व घ्यायला उठलों. देवानें चांगलेंच प्रायश्चित्त दिलें मला!' अशा विचारांनीं तो संत्रस्त झाला.

"सहदेवा! आमची पुरती फजीति झाली. आम्ही आपलीं काळीं तोंडें दाखवायला तिकडे येत नाहीं. धर्माला अन् द्रौपदीला माझा आशीर्वाद कळवून सांग कीं, तुम्हांला श्रीहरि पाठिराखा आहे. तुमचें सर्वदा कल्याण अन् मंगल होईल!"

अशा रीतीनें आलेलें संकट निरसलें. द्रौपदीची लाज राखून कृष्ण-परमात्मा द्वारकेस परत आला.

## पाशुपतास्त्रप्राप्ति

नंतर एक दिवस अचानक येऊन व्यासानें पांडवांना दर्शन दिलें. पूजोपचार ग्रहण केल्यावर तो धर्माला म्हणाला, 'राजा, वनवास आणि अज्ञातवास संपल्यावर तुम्हांला कौरवांशीं लढूनच आपलें राज्य मिळवावें लागेल. त्यासाठीं आतांपासून तुम्हांला तयारी केली पाहिजे. ज्याचें शस्त्रबळ श्रेष्ठ, त्यालाच युद्धांत विजयश्री माळ घालते. तूं अर्जुनाला तपश्चर्येसाठीं हिमालयांत पाठव. शंकर आणि अष्ट दिक्पाळ यांना प्रसन्न करून घेऊन तो त्यांच्याकडून शस्त्रास्त्रें मिळवील.'

धर्माला व्यासाचें म्हणणें पटलें. त्यानें अर्जुनाला तशी आज्ञा केली. व्यास निघून जातांच अर्जुनहि आश्रमांतून बाहेर पडला. हिमालयाचाच एक भाग

असलेल्या इंद्रकील पर्वतावर येऊन त्यानें तप मांडलें. कधीं जलभक्षण, तर कधीं निराहार अशा प्रकारें तो शंकराची आराधना करूं लागला. होतां होतां भोंवतालच्या ऋषींनाहि त्याचें तपस्तेज असह्य होऊं लागलें. त्यांनीं कैलासावर जाऊन ही गोष्ट महादेवाच्या कानांवर घातली. शंकरानें त्याला वर देण्याच्या आधीं त्याची युद्धपरीक्षा पहायचें ठरविलें.

भिल्लाचा वेष घेऊन तो इंद्रकील पर्वतावर आला. त्याच वेळीं आणखीहि एक घटना घडली. मूक नांवाचा एक दैत्य पूर्ववैर स्मरून डुकराच्या वेषानें अर्जुनावर धांवला. त्याची मुसंडी चुकवून अर्जुन उठला. अर्जुनाचा तीक्ष्ण बाण एका बाजूनें त्याच्या पोटांत घुसतो तों दुसऱ्या बाजूनें भिल्लाचाहि बाण त्याला लागला. डुकर मरून पडला; पण त्यावरूनच दोघांत भांडण जुंपलें. भिल्ल रागानें अर्जुनाला म्हणाला,

"तूं कोण आहेस? या रानांत कां आलास? हा प्रदेश माझा आहे. या डुकराचा मी पाठलाग करीत होतों. त्याला धांवडीत मींच इथवर आणला. असें असतां माझ्या लक्ष्यावर तूं कां म्हणून बाण सोडलास? तुला शिकारीचे नियम माहीत नाहींत वाटतें?"

"मला ते पूर्ण ठाऊक आहेत. तुला मात्र ते शिकविले पाहिजेत आणि ते मी आत्तांच बाणांच्या टोंकांनीं तुला शिकविणार आहें!"

शब्दानें शब्द वाढला. दोघेहि क्रोधाला चढले. अर्जुनानें वज्रठाण मांडलें. पर्वतासारख्या निश्चल उभ्या असलेल्या भिल्लावर बाणांच्या सरी पाडल्या; पण त्यांपैकीं एकहि भिल्लाच्या अंगांत घुसला नाहीं. एकहि रक्ताचा थेंब खालीं गळला नाहीं. अर्जुनाला आश्चर्य वाटलें. कारण असा विपरीत अनुभव त्याला कधींच आला नव्हता.

शस्त्रांनीं काम भागेना तेव्हां अर्जुन अस्त्रें सोडूं लागला; पण अर्जुनानें अस्त्र फेकावें अन् भिल्लानें मुख पसरून तें गिळून टाकावें असा क्रम सुरू झाला. होतां होतां अस्त्रें संपुष्टांत आलीं. बाण संपले. अक्षय भाता रिकामा पडला. अर्जुन हताश होऊन त्याच्याकडे पाहूं लागला. शस्त्रास्त्रें खलास झाल्याच्या दुःखापेक्षांहि तो भिल्ल तुच्छतेनें खदखदां हंसला आहे हें त्याच्या जिव्हारीं झोंबलें.

" हंसतोस काय ? घे तर मग !' म्हणून धनुष्याच्या कामटीनें तो त्याला झोडपूं लागला; पण भिल्लानें तिचाहि ग्रास केला. शिला-पर्वत उपटून हाणले तेहि छिन्नभिन्न होऊन पडले. पुढें मुष्टियुद्धाला सुरुवात झाली. नंतर मल्लयुद्ध झालें. चार घटका दोघेहि झुंजले अन् शेवटीं अर्जुन मूर्च्छा येऊन धरणीवर कोसळला.

भिल्लानें अर्जुनाला सावध केलें तों आपल्यापुढें साक्षात् कैलासराणा चंद्रमौळी उभा असल्याचें त्याला दिसलें. अर्जुनानें त्याचे चरण धरले. शंकरानें त्याला उठवून हृदयाशीं लाविलें !

" अर्जुना, भिल्ल तो मीच ! त्या रूपानें मीं तुझी परीक्षा पाहिली. शाबास रे रणधुरंधरा ! तुझ्या युद्धकौशल्यानें मी खुष झालों. आतां तुला मी माझें पाशुपतास्त्र देतों. तें धारण करायला तूं सर्वथैव पात्र आहेस ! "

तें दिव्य अस्त्र अर्जुनाच्या हातीं येतांच भूमीला कंप सुटला. हस्तिनापुरांत कौरवाच्या अंगावर एकाएकीं शहारे उठले ! महादेव गुप्त झाला. अर्जुनाला कृतकृत्यता वाटली. नंतर अष्टदिक्पाल अर्जुनाला भेटायला आले. यमानें त्याला दंड दिला. वरुणानें पाश दिले. कुबेरानें मोहनास्त्र दिलें. अग्नीनें शक्ति दिली. सर्वांनीं आपपलीं आयुधें देऊन त्याचा सन्मान केला. इंद्रानें त्याला स्वर्गांत नेण्यासाठीं विमान पाठविलें. अर्जुन त्यांत बसून अमरावतीला गेला.

जाताना त्याला नंदनवन दिसलें. तिथें सरोवरें उचंबळत होतीं. कामधेनूचीं खिल्लारें चरत होतीं. कल्पवृक्षांच्या रांगा लागल्या होत्या. चिंतामणीचीं धवलारें शोभत होतीं. सूर्यकांत आणि चंद्रकांत मणि जिकडे तिकडे विखुरले होते. देव-गंधर्व तिथें सहल करीत होते. अप्सरांचे थाट हंसत-खेळत लोकांच्या नेत्रांना भुलावण घालीत होते.

इंद्राचें दर्शन होतांच अर्जुनानें दंडवत घातलें. इंद्रानें हृदयींच्या आर्तीनें त्याला कवळलें. आपल्या अर्ध्या आसनावर बसवून त्याला पूजोपचार समर्पिले. त्याच्यासाठीं अप्सरांच्या नृत्याचा खास कार्यक्रम करविला. आपल्या तोलानें त्याच्या राहण्याची आणि उपभोगांची व्यवस्था केली. तिथें राहून अर्जुन चित्रसेन गंधर्वाकडून नाना विद्या शिकला. गायन-वादनाची कलाहि त्यानें तिथें हस्तगत केली. अशा राहटींत पांच वर्षें केव्हां लोटलीं हें त्याला कळलहि नाहीं !

# अर्जुनाला उर्वशीचा शाप

एक दिवस दरबारी नृत्याच्या प्रसंगीं अर्जुन उर्वशीकडे साभिप्राय दृष्टीनें पहात असल्याचें इंद्राला समजलें. त्यानें त्याच रात्रीं उर्वशीला सेवेसाठीं अर्जुनाच्या महालांत पाठविलें. ती याच प्रसंगाची वाट पहात होती. पंचारती सजवून, अंगीचा सुगंध चोहोंकडे दरवळीत तिनें आपलें नाजूक आरक्त पाऊल अर्जुनाच्या शयनमंदिरांत ठेवलें.

ती शृंगारसरोवरांतली हंसी होती. तिनें एकाच नयनबाणानें कित्येक तपोधनांना घायाळ केलें होतें. अर्जुनावरहि तेंच कटाक्षांचें अस्त्र तिनें फेकलें; पण अर्जुनावर त्याची मात्रा चालली नाहीं. तिला पाहून तो उठून उभा राहिला.

" माते, कशासाठीं येणें घडलें ? कोणत्या निमित्तानें माझ्यावर हा अनुग्रह केलास ? "

'माते !' हे शब्द उर्वशीच्या हृदयाला विंधून गेले. त्या संबोधनाची तिनें अपेक्षा केली नव्हती. ती कोणाची माता नव्हती. कन्या नव्हती. ती भार्याहि नव्हती. ती फक्त होती कामिनी ! त्यामुळें एकदम तिचा नूर उतरला. ती काकुळतीनें म्हणाली,

" महाराज, भलत्याच नात्यानें मला काय संबोधतां ? मी तुमची भोगदासी आहे. ही पंचारती तुम्हांला ओवाळण्यासाठीं आहे. हा त्रयोदशगुणी तांबूल तुमच्या मुखरंजनासाठीं आहे. हा साजशिणगार तुमचें मन रिझविण्यासाठीं आहे आणि हें माझें अखंड रसरसतें यौवन तुमच्या चरणांवर समर्पिण्यासाठीं......"

" शिव शिव ! नको हे वोखटे बोल कानीं लावूं. तूं माझीच नव्हे माझ्या आजापणज्यांचीहि माउली आहेस ! पौरववंशाचा मूळ पुरुष जो पुरूरवा त्याची तूं पत्नी. तुझ्याविषयीं मी भलतीच कामना कशी धरूं ? अभिलाषेच्या नजरेनें मी तुझ्याकडे कसा पाहूं ? "

असें म्हणून अर्जुनानें पुढें होऊन तिच्या पायांवर मस्तक ठेविलें. उर्वशी चिडली. ती दोन हात मागें सरली. क्रोधानें तिची सडपातळ काया थरथर

कांपूं लागली. डोळ्यांतून अग्निकणांचा वर्षाव होऊं लागला. नासाग्र फुलून कढत श्वास सोडूं लागलें. ती म्हणाली,

" माझ्यासारखी त्रिलोकसुंदर ललना आपण होऊन एकांतीं आली असतां तिला झिडकारणारा तूं मुलखाचा अरसिक दिसतोस ! अरसिक कसला, षंढच ! दिव्य सौंदर्याचा असा अपमान केल्याबद्दल तुला अद्दल घडलीच पाहिजे. ऐक माझें शापवचन ! तूं एक वर्षपर्यंत ना पुरुष ना स्त्री असा कोणीतरी होशील ! अंगांत चोळी, डोक्यावर पदर अन् पाटीवर वेणी अशा लज्जास्पद अवस्थेंत तूं नाटकशाळेंतल्या नारी नाचवशील ! "

उर्वशी गर्रकन् तोंड फिरवून निघून गेली. शापभयानें अर्जुनाचा त्या रात्रीं डोळा लागला नाहीं. दुसऱ्या दिवशीं त्यानें घडलेला वृत्तांत इंद्राला सांगितला. इंद्र म्हणाला, ' होतें तें बऱ्यासाठीं होतें. हा शाप तुला अज्ञातवासांत उपयोगी पडेल ! '

पांच वर्षें लोटून गेलीं तरी अर्जुन अजून कसा येत नाहीं ही पांडवांना काळजी लागली. त्यांचा एकेक दिवस कष्टानें जाऊं लागला. वाट पाहून पाहून द्रौपदीचे डोळे शिणले. तिच्या जिवाला अस्वस्थता लागली. इतक्यांत बृहदश्वा नांवाचा ऋषि तेथें आला. स्वस्थपणें बसून गप्पागोष्टी करीत असतां धर्मराजाला आपलें जीवनचरित्र आठवलें आणि तो बृहदश्व्याला म्हणाला—

" तपोधना, माझ्यासारखा दुर्भागी राजा तूं कुठें पाहिला आहेस का ? "

" तुझ्यासारखाच कां, तुझ्याहून दुर्दैवी असा एक राजा होऊन गेला. त्यानेंहि तुझ्याचप्रमाणें द्यूतांत सर्वस्व घालविलें. जसा शूर तसाच उदार. जसा सुंदर तसाच कलावान् ! त्याचें नांव नल. तुला मी त्याचें चरित्र साद्यंत सांगतों.

## नल-दमयंती कथा

निषध देशांत नल नांवाचा एक राजा होता. तो तरुण असून सौंदर्याचा पुतळा होता. पुण्यश्लोकांच्या नामावळींत त्याचें नांव प्रथम उच्चारलें जाई. न्यायानें प्रजेचें पालन करी. प्रतापानें शत्रुकुलाचें दमन करी. देवमंडळांत सहस्रनयन, ग्रहमंडळांत सहस्रकिरण तसा राजमंडळांत चक्रवर्ती नल. तो घोड्यावर बसण्यांत पटाईत होता. त्याला घोड्यांची पारखहि चांगली होती.

एक दिवस देशावारी करणारे कांहीं ब्राह्मण त्याच्याकडे आले. नलानें त्यांचा उत्तम सत्कार केला. नलाचे गुण, सौंदर्य आणि विनयशील वर्तन पाहून त्यांना संतोष वाटला. अशा पुरुषाला पत्नी असावी तर दमयंतीसारखीच असें मनांत आणून त्यांनीं नलापुढें दमयंतीचे गुण गायला प्रारंभ केला.

" नलराजा ! तुझ्यासाठीं एक अप्रतिम वधू आम्हीं पाहिली आहे. तिचें नांव दमयंती. विदर्भाधिपति भीमराजाची ती कन्या. आंगाबांध्यानें सडपातळ, सोनकेवड्यासारखी कांति अन् अवयव जणूं रेखलेले. तिच्या डोळ्यांत जादू आहे व चालण्यांत लकब आहे. वाणींत रस आहे. परिमळांत कस्तुरी, फुलांत नवमालती तशी स्त्रियांत दमयंती! तुला ती लाभेल तर तूं सुखी होशील. तुझा राजवाडा मंगलधाम होईल ! "

अशा प्रकारें नलाच्या हृदयांत दमयंतीचा प्रवेश करून देऊन ब्राह्मण निघून गेले. नलाला तिचा ध्यास लागला. तो एकांतीं बसून कल्पनेच्या कुंचलीनें तिचीं चित्रें काढूं लागला. त्याचें राज्यकारभारावरचें लक्ष उडालें. चित्त आंत-बाहेर दमयंतीनें व्यापलें.

एक दिवस शिकारीला गेला असतांना तो दुपारच्या वेळीं एका तळ्याच्या कांठावर आला. तिथें पुष्कळसे हंसपक्षी आले होते. कोणी कमळांनीं भरलेल्या तळ्यांत तरंगत होते तर कोणी क्रीडा करून दमल्यामुळें कांठावर पोटाशीं पाय घेऊन झोंपले होते.

त्या सोनेरी हंसांना पाहून राजाचें चित्त वेधलें. असला अपूर्व पक्षी आपल्या प्राणिसंग्रहालयांत नाहीं असें त्याला वाटलें. यांतल्या एकाला तरी पकडावें म्हणून तो दबत-छपत पाय न वाजवितां त्यांच्या जवळ गेला. चटकन् झडप घालून त्यानें त्यांतील एकाला धरलें. हंसानें पंखांची फडफड करून सुटण्याचा प्रयत्न केला ; पण त्याच्या नाजूक देहाभोंवतींची नलाची पकड ढिली झाली नाहीं. तो गवसलेला पहातांच बाकीचे पक्षी भुर्रकन् अंतराळांत उडाले. आपण परतंत्र झालों, मृत्यूच्या पाशांत अडकलों म्हणून तो हंस शोकविव्हल झाला. मग मनुष्यवाणीनें तो राजाला विनवूं लागला.

" राजा, एका पांखराला मारून तूं काय पुरुषार्थ साधणार आहेस ! जागोजाग शेंकडों झुंजार पुरुष आहेत. तुझा प्रताप त्यांच्यावर गाजव ! मी

तुझी करुणा भाकतों. मला सोडून दे. तुझे उपकार मी विसरणार नाहीं. तुझें एक जिवाहून प्रिय असें कार्य मी साधून देईन!"

नलाला त्याची कणव आली. त्यानें त्याला सोडून दिलें. पंख फडफडवीत तो एका वृक्षाच्या फांदीवर जाऊन बसला.

"दयाळु नलराजा, तुझें दमयंतीवर मन जडलें आहे हें मी जाणतों. मी आतां तिच्याकडे जाईन आणि तुझें असें स्तोत्र गायीन कीं, तिनें आपले पंचप्राण तुझ्यावरून ओवाळून टाकावे! तिच्या मनांत तूं भरलास कीं तुझें काम झालेंच म्हणून समज!"

नल त्या पक्ष्याकडे कौतुकानें पहातो तों त्यानें गगनभरारी मारलीसुद्धां! तो झेंपावत झेंपावत विदर्भदेशाच्या उद्यानाच्या माथ्यावर आला. त्याच वेळीं दमयंती आपल्या सांगातिणींसह उद्यानांत क्रीडा करायला आली होती. हंसाला वाटलें कीं आयतेंच काम झालें!

तो मंडळाकृति फिरे उतरावयाला
भैमीमुखेंदुपरिवेष[1] म्हणों तयाला
तेथें महीवरि असा खग बैसताहे
कीं सुंदरी निज कुतूहल जेविं पाहे १

जो बैसतां चपल पक्षपुटीं [2]धरेला
हाणीतसे फडफडां ध्वनि हो उदेला
पाहे तया खगवरासि वरानना हे
मानी मनीं नवलही मग बोलताहे २

असा पक्षी लक्षी बहुविहगलक्षीं न मिळता
सुवर्णी जो वर्णी वद कवण वर्णी कवयिता?
अगाई हा बाई त्वरित वरि जाईल पळुनी
धरूं जातें हातें हळुहळु तयातें न कळुनी ३

---

१ दमयंतीच्या मुखचंद्राचें खळें. २ पृथ्वीला.



नलराजानें निद्रिस्त दमयंतीचा त्याग केला. —पृ. ८७

हे मंदमंद पद सुंदर कुंददंती
चाले जसा मदधुरंधर इंद्रदंती[1]
हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते
निष्कंप कंकणकरासि पुढें करीते ४

हंसें तदा चतुरसंमत युक्ति केली
ते चालवीत सुतनू बहु दूर नेली
छाया तियेशिं दुसरी तिसरी वनोळी[2]
जे सांवळी युवतितुल्य दिसे निराळी ५

तया वनांत एकली विलासिनी विलोकिली
मदें भरोनि डोलतो तियेसि हंस बोलतो ६

भूमिभागीं फिरणार तूं तुला मी
कसा सांपडेन सांग गगनगामी
बाळ बाळे, जरि होय चंद्रकामी[3]
हस्त त्याचा लागेल काय व्योमीं ? ७

चतुर नर जसा हा बोलतो हंस तैसा
तरि न वरि मृगाक्षी विस्मयीं भाव कैसा
पळुनि तिज [4]निखंदी तीस तो खेद नाहीं
शिणहि विसरली ते बोलती होय कांहीं ८

---

१ ऐरावत. २ वनपंक्ति. ३ चंद्राची इच्छा धरणारा. ४ निंदून बोलतो.

कोण तूं गा कोठील कवणियाचा
कसा झाला तव देह सोनियाचा
कशी आली हे तूज मनुजवाचा
काय भाग्योदय सांगुं या वनाचा ९

असें बोलोनी मौन धरुनि राहे
काय बोले तो हंस असें पाहे
तदा त्याचा वचनौघ असा वाहे
'राजकन्ये! तूं आयके गिरा हे' १०

ब्रह्मदेवाचे बहु विमानवाही
हंस आहेती ऐकिलें तुवांही
तया वंशीं सौवर्ण देह हाही
ज्यासमान सखि सर्वमान्य नाहीं ११

मंदाकिनीमधिल जीं कनकारविंदें
तीं जेवितों मृदुलनाल मृणालकंदें[1]
आम्ही असों नृपसुते तरि कांचनाचे
जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचे १२

मी गुंतलों नळमहींद्र गुणौघपाशीं
सेवेसही मग करोनि तयाचपाशीं
आलोकुनी कवण या चतुरा न नाचे
लोकेशता विभवही चतुराननाचें १३

---

१ कमळाचे कोवळे देठ.

एकांत लेखन वाचनही करीतो
माझी तनुद्युति समीप तदा धरीतो
या कारणें नळ मला बहु आप्त मानी
तो सांगता निजमनोरथ होय कानीं १४

नळ म्हणाला मज सहज धरुनि बाहीं
तुला कोठेंही बंद अटक नाहीं
सकळ भुवनें तरि फिरुनि राजगेहीं
एक नवरी मज योग्य बरी पाहीं १५

एकांत हाच वदला मज जाण बाळे
तूं सांग तो वर तुला रुचला रसाळे
ऐणे[1]परी परिसतांच तया अनन्या
ते बोलते चतुर सुंदर राजकन्या १६

मी जाण दे[2]वनळही स्वकरीं धराया
सांगेन काय चतुरा मज लाज जाया
काळें करूनि सुख जोंवरि होय लेखीं
हें बोलणें खग मनीं उभयार्थ लेखी * १७

परिसुनि वच ऐसें जें इणें बोलिजेलें
पतगकु[3]लवतंसें अंतरीं ध्यायिजेलें
परवश हृदया हें नैषधें राजहंसें
म्हणुनि समजतां हें बोलिजे राजहंसें १८

---

१ हरिणीप्रमाणें. २ बोरू. * लज्जेमुळें मला स्पष्ट सांगवत नाहीं; पण मला मनांतून नळच आवडला आहे असा श्लोकाचा भावार्थ. ३ पक्षिकुलांतल्या श्रेष्ठानें.

जशी रंजलि आहेस निषधभूपीं
तसा तोही रंजला तुझ्या रूपीं
दैवघटनीं अन्योन्य व्हाल सोपीं
तुम्ही नांदालहि सत्य हें निरोपीं १९

— रघुनाथपंडितकृत नलदमयंतीस्वयंवराख्यान

दमयंतीच्या मनांत नलाविषयीं प्रेमांकुर निर्माण करून हंस निघून गेला. दमयंती आपल्या महालांत आली. नल कधीं भेटेल असा तिला ध्यास लागला. विरहज्वरानें तिची नाजूक काया तापली. अन्नपानाची रुचि गेली. मृदुमवाळ शय्या खुपूं लागली. नयनीं कपाटमुद्रा आणि मुखीं महामौन्य अशी तिची अवस्था झाली. तिच्या आईनें तिची ही अवस्था राजाला निवेदिली.

राजानें तिचें स्वयंवर मांडलें. राजमंडळाला पत्रे रवाना झालीं. छप्पन्न देशींचे भूपाल विदर्भाच्या रोखानें निघाले. नलराजानेंहि रथ हांकारला. दमयंतीच्या स्वयंवराची मात स्वर्गापर्यंत पोंचली. इंद्र, अग्नि, यम आणि वरुण हे लोकपालहि दमयंतीच्या आशेनें खालीं आले. वाटेंत नलाची आणि त्यांची गांठ पडली. तो स्वयंवराला निघाला आहे हें समजतांच त्यांना दमयंतीविषयीं निराशा वाटूं लागली. अशा सर्वांगसुंदर पुरुषाला सोडून दमयंती खचित आपल्याला वरणार नाहीं अशी त्यांची खात्री झाली. त्यांनीं मग एक कपटी डाव मांडला. ते नलाला म्हणाले,

" हे उदारधी नलराजा, तूं आमचें एक कार्य केलें पाहिजेस ! "

" हातून होण्यासारखें असल्यास अवश्य करीन ! " नल म्हणाला.

" तसें वचन दे ! " देवांनीं आग्रह धरला.

नलानें वचन देतांच त्यांनीं त्याला आज्ञा केली कीं, ' तूं दमयंतीच्या महालांत जाऊन आमच्यापैकीं कोणाला तरी तिनें वरावें अशी तिला गळ घाल ! '

वचनानें बांधला गेल्यामुळें त्याचा निरुपाय झाला. देवांच्या प्रसादामुळें दमयंतीच्या महालांत शिरण्यास त्याला कोणतीच अडचण आली नाहीं. तिथें

---

४ सांगतों.

दमयंती आपल्या सख्यांसह लीलाविनोद करीत बसली होती. तिचा मुखचंद्र पहातांच नलाचे नयन चकोर बनले. तिचीहि तशीच अवस्था झाली. नलानें आपण कोण अन् कशाकरितां आलों आहों तें तिला सविस्तर सांगितलें.

देवांचा दूत होऊन नल आपणांकडे आला हें तिला आवडलें नाहीं. ती डोळयांत आंसवें आणून त्याला म्हणाली, 'मी मनानें तुम्हांला वरिलें आहे. माझा निश्चय मेरूसारखा अढळ आहे. स्वयंवरमंडपांत मी तुम्हांलाच माळ घालीन! माझा हा निर्धार तुम्ही लोकपालांना कळवा!' नल परत आला. तिचा निरोप त्यानें लोकपालांना कळविला. ते नाखूष झाले; पण करतात काय!

दुसऱ्या दिवशीं स्वयंवराच्या मंडपांत दमयंती प्रवेश करते तर एकाच्याऐवजीं पांच नळ हारीनें बसलेले! हें देवांचें कपट आहे हें त्या चतुरेनें ओळखलें. आतां नेमका नल कसा हुडकून काढावा याची तिला पंचाईत पडली. तिनें हात जोडले, मस्तक नमविलें आणि देवांचीच प्रार्थना केली.

"जर माझ्या गांठीं कांहीं पुण्याचें भांडवल असेल, जर माझें मन नलाच्या ठिकाणीं एकनिष्ठ असेल तर त्या सत्याच्या बळावर देवांनीं उघड व्हावें आणि खरा नलराजा मला मिळवून द्यावा. या लाडक्या कन्येचें त्यांनीं प्रिय करावें!"

ही प्रार्थना लोकपालांच्या कानांतच नव्हे तर हृदयांतहि शिरली. आपल्या देवपणाचीं चिन्हें त्यांनीं प्रगट केलीं. दमयंतीला नलाची ओळख पटली. तिनें सर्वांसमक्ष त्याच्या गळयांत माळ घातली. इतर राजपुत्र निराश झाले. देव प्रसन्न झाले. त्यांनीं वधूवरांना अनेक आशीर्वाद दिले आणि तिथून प्रयाण केलें.

देव स्वर्गाच्या वाटेला लागले असतां त्यांना द्वापरासह कलि भेटला. 'कुठें जातोस?' असें विचारतांच 'दमयंतीच्या स्वयंवराला!' असें त्यानें सांगितलें.

देव हंसले आणि त्यांनीं सगळा वृत्तांत त्याला सांगितला. देवांना सोडून दमयंतीनें एका माणसाला वरलें याची त्याला चीड आली. 'नल-दमयंतीला राज्यभ्रष्ट करून रानोमाळ हिंडवलें नाहीं तर नांवाचा कलि नव्हे!' अशी प्रतिज्ञा करून तो निषधदेशांत आला.

बारा वर्षें तो नलाच्या आगें-मागें हिंडत होता ; पण त्याच्या शरीरांत प्रवेश करायला त्याला संधि मिळाली नाहीं. कारण नलाचें आचरण पवित्र होतें. एक दिवस लघुशंका झाल्यावर त्यानें हातपाय धुतले नाहींत, एवढें निमित्त कलीला मिळालें. तो त्याच्या अंगांत संचरला. त्याच वेळीं पुष्कर नांवाचा नलाचा एक दूरचा भाऊ होता त्याच्या शरीरांत द्वापर शिरला.

कलीच्या सांगण्यावरून द्वापरानें पुष्कराला नलाशीं द्यूत खेळण्यास प्रवृत्त केलें. पुष्करानें दरबारांत येऊन नलाला तसें आव्हान दिलें. नल-पुष्करांचें द्यूत सुरू झालें. नल जी जी वस्तु पणाला लावी ती ती पुष्कर जिंकूं लागला. नगरांत ही वार्ता वणव्यासारखी पसरली. नागरिक आणि प्रधान यांनीं येऊन राजद्वारीं टाहो फोडला.

" राजा, द्यूत थांबव. सर्वस्व गमावूं नको ! "

पण त्यानें कोणाचेंच ऐकलें नाहीं. दमयंतीच्या विनवण्या-आळवण्यासुद्धां फुकट गेल्या ! राजा अगदीं पुरता हांवे भरला होता.

काळचक्राचा फेरा आला हें दमयंतीनें हेरलें. तिला आपला भविष्यकाळ भयाण दिसूं लागला. आपल्या सोन्यासारख्या मुलांना तरी दैन्यदुःखाची झळ लागूं नये म्हणून तिनें इंद्रसेन आणि इंद्रसेना या दोघां अपत्यांना वार्ष्णेय नांवाच्या सारथ्याबरोबर माहेरीं धाडून दिलें. मुलें दृष्टीआड होतांच बाणानें घायाळ झालेल्या हरिणीप्रमाणें तिनें अंग टाकलें.

इतक्यांत दरबारांतून पुष्कराची धुंद गर्जना तिच्या कानांवर आदळली. तो ओरडत होता.

" नल हरला ! त्याचें राज्य मला मिळालें. त्याच्या अंगावरचीं वस्त्र-भूषणें हिसकावून घ्या. त्याला राज्याबाहेर हांकलून द्या ! नगरांत दौंडी पिटवा कीं, जर कोणी नलाला आश्रय देईल तर त्याचें मुंडकें तोडलें जाईल ! "

एका वस्त्रानिशीं नल राज्याबाहेर पडला. धर्मपत्नी दमयंतीनें त्याचा मागोवा घेतला. दोघें एका रानांत शिरलीं. वणवण हिंडलीं. तीन दिवसांत त्यांना अन्नाचा कण मिळाला नाहीं. शेवटीं त्याला एका ठिकाणीं दोन पक्षी बसलेले दिसले. यांना पकडतां आलें तर एका वेळची क्षुधा शमेल असा नलाच्या मनांत विचार आला. आपल्या नेसत्या धोतराचा सोगा सोडून ते

पाऊल न वाजवितां त्यांच्याजवळ गेला. त्यानें चटकन् त्यांना धोतर वर घालून पकडलें; पण दुर्दैव नलाचें! ते पक्षी धोतरच फेडून घेऊन वर उडाले. ते पक्षी नसून पुष्कराचे फांसे, पक्ष्यांच्या रूपानें वस्त्रहरण करण्यासाठीं आले होते.

त्यांचें कार्य झालें. नल उघडा पडला. दमयंतीच्याजवळ जायला त्याला लाज वाटूं लागली. ती सती सगळ्या आपत्तींना तोंड द्यायला उभी होतीच! तिनें आपलें अर्धे वस्त्र त्याला गुंडाळण्यासाठीं मोकळें सोडलें. दोघेंहि एकाच वस्त्रांत कशीबशी लज्जा झांकून हिंडूं लागलीं.

पुढें त्यांना एक धर्मशाळा दिसली. रात्रीच्या मुक्कामाला ही जागा बरी आहे असें समजून दोघांनीं तिथें थकलेले देह आडवे केले. अतिश्रमानें दमयंतीला झोंप लागली. नल मात्र जागा होता. त्याच्या डोक्यांत विचारांचें काहूर माजलें होतें. स्वतःच्या दुःखाबद्दल तो तितकासा हळहळत नव्हता. आपल्याबरोबर एक निष्पाप जीव यातना भोगतो ही गोष्ट त्याच्या हृदयाला डागण्या देत होती. दमयंतीचा त्याग करून निघून जावें असाहि विचार त्याच्या मनांत उठूं लागला होता. मी हिला सोडून गेलों तर ही आपल्या माहेरीं जाईल अन् सुखांत राहील असें त्याचें मन त्याला सांगत होतें; पण जायचें कसें? दोघांत मिळून एक वस्त्र अन् तेंहि अखंड! पण कलीनें त्याची ही अडचण तत्काळ दूर केली. अचानक एक सुरी येऊन त्याच्याजवळ पडली. त्याला तशाहि स्थितींत आनंद वाटला. वेळ न लावतां त्यानें तें वस्त्र मधें फाडलें आणि गाढ झोंपलेल्या दमयंतीला पंचमहाभूतांच्या स्वाधीन करून तो रात्रीच्या त्या घनदाट अरण्यांत अदृश्य झाला.

थोड्या वेळानें दमयंतीला जाग आली. हातांनीं चांचपडून पहाते तों नल जवळ नाहीं. तिनें एकदम हंबरडाच फोडला! त्या भयाण रात्रींहि ती सैरावैरा हिंडूं लागली. 'नाथ...नाऽऽऽथ!' म्हणून हाकारूं लागली. तिचा तो आकांत पाहून वृक्ष-पक्षी गहिंवरले; पण तिच्या नाथाला मात्र तिची दया आली नाहीं!

पुढें जातां जातां आणखी एक अरिष्ट ओढवलें. दमयंती एका अजगराच्या तोंडांत सांपडली. तो तिला गिळूं लागला. 'कोणी तरी धांवा होऽ' म्हणून

तिनें आर्तनाद केला. एका व्याधाच्या कानीं ते शब्द पडले. तो धावत आला अन् अजगराचें तोंड विळयानें चिरून त्यानें त्या लावण्यगंगेला सोडविलें; पण एवढ्यानें ती सुटली का? मुळींच नाहीं! तिचें सौंदर्य पाहून तो व्याध कामासक्त झाला आणि तिचा हात धरायला धांवला; पण दमयंतीचें पातिव्रत्य धगधगीत होतें. तिनें त्याला शाप देतांच तो मरून भस्म झाला.

दमयंती तशीच पुढें निघाली. झाडांपेडांना नलाची वार्ता विचारूं लागली. तीं जेव्हां बोलेनात तेव्हां हिंस्र श्वापदांना विनवूं लागली. 'वाघ-सिंहांनो, कोणी तरी पुढें या. मला खा. माझे पंचप्राण या देहाच्या पिंजऱ्यांतून मोकळे करा!—'

कांहीं वेळानें एक लमाणांचा तांडा तिला भेटला. त्याच्या सोबतीनें ती मार्ग क्रमूं लागली; पण त्याच दिवशीं रात्रीं रानटी हत्तींनीं त्या तांड्याची धूळधाण केली. त्यांच्या तडाख्यांतून जे वांचले ते दमयंतीलाच मारायला धांवले. हीच पांढऱ्या पायांची अवदसा आम्हांला भोंवली, अशी त्यांची समजूत झाली होती. एका दाट झुडपांत शिरून तिनें आपला जीव वांचविला आणि पहांट होतांच तिथून पळ काढला.

प्रहर दिवसाच्या सुमारास ती सुबाहूच्या राजधानींत आली. अर्ध्या वस्त्रानें कशीबशी काया झांकलेली, केस मानेवर सुटलेले, मुद्रा मलिन अन् डोळे जाग्रणानें लाल गढूळ झालेले. कोणी तरी वेडी आहे म्हणून पोरेंसोरें तिच्या पाठीस लागलीं. सुबाहुराजाच्या आईनें गच्चीवरून तो प्रकार पाहिला. तिचें स्त्रीहृदय द्रवलें. आपल्या दासीकरवीं तिनें दमयंतीला वर बोलावून घेतलें. कां कोण जाणे; दमयंतीची करुण पण सत्त्वगंभीर मूर्ति पाहून तिच्या अंतरांत मायाममतेचे पाझर निर्माण झाले. 'तूं माझ्याकडे माझ्या मुलीची सखी म्हणून रहा!' असें तिनें तिला म्हटलें.

"राहीन; पण एक अट आहे. मी पतिव्रता आहें. पातिव्रत्य हें माझें काळीज आहे. त्याला तुमच्याकडून धक्का लागतां कामा नये. मी कोणाचें उष्टें खाणार नाहीं. कोणाचे पाय धुणार नाहीं. कोण्या पुरुषाची सेवाही करणार नाहीं!" दमयंती म्हणाली.

राजमातेनें तें मान्य केलें. दमयंतीचें तिथलें वास्तव्य सुखाचें गेलें. पुढें राजमातेला कळलें कीं, ही आपल्या बहिणीची मुलगी आहे. मग काय, स्नेहा-

मृताचा वर्षाव झाला तिच्यावर! नंतर मावशीला गळ घालून ती आपल्या माहेरीं गेली आणि मग तिच्या बापानें नळाचा शोध जारीनें सुरू केला.

दमयंतीचा त्याग करून नळ जो निघाला तो मन मानेल तिकडे भटकूं लागला. जातां जातां त्याला एका रानाला चहूंबाजूंनीं वणवा लागल्याचें दिसलें. 'नला धांव, नला धांव!' अशी आर्त हांकहि ऐकूं आली. दीनजनांचा त्राता नलराज ती हांक ऐकून काय स्वस्थ बसेल? त्यानें भडकत्या अग्नि-ज्वाळांतून रानाच्या मध्यभागीं प्रवेश केला. पहातो तों एक नाग आपल्या देहाचें वेटाळें करून बसला आहे अन् तोंडानें नलाचा धांवा करतो आहे.

नलानें त्या अजस्र धुडाला खांद्यावर घेतलें अन् वणव्याच्या बाहेर आणलें. संकटमुक्त झाल्यावर तो म्हणाला, 'नलराजा, माझें नांव कर्कोटक. नारदाच्या शापामुळें मी असा धरणीला खिळून पडलों होतों. नलाच्या स्पर्शानें तूं शाप-मुक्त होशील असा त्यानें मला उश्शाप दिला होता. तो आज खरा झाला. तुझे किती उपकार मानूं! राजा, तुझ्यावरचा प्रसंग मी जाणतों. यांतून तूं सुखरूपपणें पार पडावास म्हणून मी एक युक्ति करणार आहें. मला उचल आणि दहा पावलें मोजून टाक!'

नलानें तसें केलें. दहाव्या पावलाला तो नाग त्याच्या हाताला चावला. 'चांगले उपकार फेडलेस!' नल म्हणाला. त्या दंशानें नलाचें रूप पालटलें. सर्वांगसुंदर नलराजा काळा, ठेंगू, राकट अन् कुरूपतेचा मूर्तिमंत अवतार बनला. आपली अशी अवदशा पाहून त्याला वाईट वाटलें. त्याचा दुःखी चेहरा पाहून कर्कोटक बोलला,

"राजा, अजून कांहीं काळ तुला अज्ञातवासांत घालवला पाहिजे. तूं कोणाला ओळखूं येऊं नयेस म्हणून मीं तुझें रूप पार बदलून टाकलें. आतां दुसऱ्या कोणाच्या विषाची तुला बाधा होणार नाहीं. माझ्या विषानें तुझ्या अंगांतला कलि मात्र जळत कढत राहील! हीं दोन वस्त्रें मी तुला देतों. ज्या वेळीं तुला प्रगट व्हायचें असेल त्या वेळीं हीं परिधान कर!"

एवढें काम करून तो नाग गुप्त झाला. नलानें मग तडक अयोध्या गांठली. तिथल्या ऋतुपर्ण राजाच्या वाड्यांत मुख्य अश्वपाल म्हणून त्याला नोकरी मिळाली. विदर्भाधिपतीचे लोक नलाला धुंडण्यासाठीं रानें-वनें अन्

पुरें-पट्टणें हिंडत होते. त्यांपैकीं पर्णाद नांवाचा एक ब्राह्मण अयोध्येंत आला. नलाची अन् त्याची गांठ पडली. त्याच्या कांहीं उद्गारांवरून तो नल असावा अशी त्या ब्राह्मणाला पुसट शंका आली. त्यानें परत जाऊन भीम राजाला ती बातमी सांगितली. दमयंतीलाहि वाटलें कीं, पर्णादाच्या सांगण्यांत कांहीं तथ्य असावें. तिनें मग एक डाव योजला. बापाला न सांगतां तिनें सुदेव नांवाच्या दुसऱ्या ब्राह्मणाला तांतडीनें अयोध्येस पाठविलें. जातांना त्याच्या कानांत कसला तरी मंत्र सांगितला.

सुदेव येऊन ऋतुपर्ण राजाला भेटला. त्यानें राजाला सांगितलें कीं, 'उद्यां सकाळीं दमयंती दुसरें स्वयंवर करणार आहे. नल बेपत्ता झाल्यामुळें निराश होऊन ती आतां दुसऱ्या कोणाची तरी भार्या होऊं इच्छिते!'

ब्राह्मणाचें काम झालें. ऋतुपर्णाच्या मनांत स्वयंवराला जाण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली; पण प्रश्न होता तो एका दिवसांत इतक्या दूरच्या विदर्भ देशांत कसें पोंचतां येईल हा. इतक्यांत त्याला बाहुक सारथ्याची आठवण झाली. त्यानें बाहुकाला बोलावून आणून आपला मनोदय निवेदिला. दमयंतीच्या स्वयंवराची वार्ता तापल्या तेलासारखी त्याच्या कर्णरंध्रांत शिरली. त्याचें काळीज दुभंगलें. दमयंतीविषयीं त्याच्या मनांत घृणा उत्पन्न झाली. कदाचित् माझ्या शोधासाठीं हें नाटकहि असेल असेंहि एकवार त्याला वाटलें. खरा प्रकार तिथें गेल्यावांचून कळणार नाहीं असें मानून त्यानें ऋतुपर्णाला विदर्भांत जाण्याबद्दल होकार भरला.

दोन कृश पण चपळ घोडे जोडून त्यानें रथ सज्ज केला. ऋतुपर्ण आंत बसतांच रथ वाऱ्याच्या वेगानें उधळला. त्याचें तें अश्वविद्येतलें नैपुण्य पाहून ऋतुपर्ण खुष झाला. स्वयंवराच्या वेळीं आपण तिथें पोंहोचूं असा त्याला विश्वास वाटूं लागला. इतक्यांत त्याचा शेला खालीं पडला. 'रथ थांबवून शेला वर घे!' असें जेव्हां त्यानें नलाला सांगितलें तेव्हां नल म्हणाला कीं, 'महाराज, रथ बारा योजनें पुढें आला आहे!' तें ऐकून ऋतुपर्ण आश्चर्याच्या सागरांत बुडाला.

सारथ्यानें ज्याप्रमाणें आपलें कसब दाखविलें त्याप्रमाणें आपली सूक्ष्म दृष्टीची गणितविद्या त्याला दाखवून चकित करावें असें ऋतुपर्णाला वाटलें. ते

जिथें उभे होते तिथेंच एक बिब्याचें झाड होतें. त्या झाडाला अमुक पानें अन् अमुक फळें आहेत असें तो नलाला बोलला. 'प्रचीतीच पाहूं या!' म्हणून नलानें तें झाड तोडून त्याचीं पानें-फळें मोजलीं आणि नवल असें कीं, तीं ऋतुपर्णानें सांगितल्याप्रमाणें भरलीं. नलाला परमाश्चर्य वाटलें. आपल्या अश्वविद्येचें रहस्य ऋतुपर्णाला शिकवून त्यानें ऋतुपर्णाची गणितविद्या शिकून घेतली. ऋतुपर्णाला फाशांची विद्या अवगत होती तीहि त्यानें नलाला दिली.

ती विद्या हस्तगत होतांच कलि त्याच्या हृदयांतून बाहेर पडून नलाला शरण आला. त्यानें त्याला जीवदान दिलें. 'तुझें स्मरण करतील त्यांना मी छळणार नाहीं' असा वर देऊन कलि त्या बिब्याच्या तोडलेल्या खोडांत शिरला.

पुनश्च ते रथारूढ झाले. सूर्यास्ताच्या समयीं त्यांनीं विदर्भदेशांत प्रवेश केला. ऋतुपर्ण आल्याची वार्ता कळतांच भीमराजा त्याला सामोरा आला. दरबारांत आणून त्यानें त्याचें राजशाही गौरव केलें. त्याला रहाण्यासाठीं सुंदर महाल दिला. बाहुकाची व्यवस्था अश्वशाळेंत करण्यांत आली.

दोघांच्याहि मनांत तिथें पोंचल्यावर विचार आला तो हा कीं, उद्यां जर स्वयंवर तर इथें कसलीच गडबड किंवा तयारी दिसत नाहीं हें कसें? दारांत मांडव नाहीं. घरांत पाहुणे नाहींत. इथें एकहि राजपुत्र आलेला दिसत नाहीं. ही स्वयंवराची केवळ अफवाच आहे का?

इकडे त्याच वेळीं दमयंती आपल्या महालांत विचार करीत बसली होती कीं, या राकट सारथ्याला नलराजा-आपला प्राणेश्वर-कसें समजायचें? माझा हा खटाटोप व्यर्थच झाला का? पण तरीहि तिनें त्याची परीक्षा करायचें ठरविलें. तिनें दासींना बजाविलें कीं, 'त्याला कोरडा शिधा देऊन स्वैंपाक करायला लावा. विस्तव मागितला तर देऊं नका. पाणी मागितलें तर कोरडी घागर पुढें ठेवा!'

दासींनीं त्याप्रमाणें केलें आणि त्या पुढें काय होतें तें पाहण्यासाठीं दडून बसल्या. नळानें वाळल्या गवताची मूठ वर धरतांच तिनें पेट घेतला. नुसत्या त्याच्या दृष्टिक्षेपानें रिता कुंभ पाण्यानें भरला. धांवत जाऊन दासींनीं

ही नवलकथा दमयंतीला सांगितली. दमयंतीला एक खूण पटली. कारण या गोष्टी देवांच्या वरानें त्याला साध्य होत्या.

तिनें मग दासींच्या हातीं आपल्या दोन्ही मुलांना त्याच्याकडे पाठविलें. त्यांना पाहून त्याचा स्नेहभाव उचंबळला. दोघांनाहि हृदयाशीं धरून त्यानें त्यांच्यावर अश्रुजलाचा अभिषेक केला. परोपरीनें त्यांना कुरवाळलें. हीहि वार्ता तिला समजली. 'आगीवांचून कढ अन् मायेवांचून रड' येणार नाहीं हें ध्यानीं आणून तिचा उत्साह वाढला. एकेक लक्षणें जमूं लागली; पण त्याचें तें हेंगाडें रूप! जाणिवेची मुख्य खूण तर तीच होती अन् तीच तर पटत नव्हती!

शेवटीं शहानिशा करण्यासाठीं त्याला तिनें आपल्या महालांत बोलावून घेतलें. त्याला अगदीं सरळच प्रश्न केला; पण त्याचें उत्तर देण्याच्या-ऐवजीं तिनें दुसरें स्वयंवर मांडलें त्याचा जाब त्यानें विचारला. तिचें स्पष्टी-करण त्याला पटलें; पण मनांतलें किल्मिष जाईना. शेवटीं आकाशवाणीनें तिचा निर्दोषपणा बोलून दाखविला तेव्हां त्याचें समाधान झालें. मग त्यानें कर्कोटकानें दिलेलीं वस्त्रें परिधान केलीं.

त्या वस्त्रांच्या आवरणांत पूर्वीचा मदनसुंदर नल उभा राहिला. दमयंतीचें भान हरपलें. तिनें धांवत जाऊन त्याच्या गळां मिठी घातली! सगळीकडे आनंदीआनंद पसरला. आपल्याकडचा बाहुक सारथी हा साक्षात् नल होता हें समजतांच ऋतुपर्णानें येऊन त्याची क्षमा मागितली.

कांहीं दिवस सासुरवाडीस राहून नल मुलांमाणसांसह आपल्या राजधानीस आला. त्यानें पुष्कराला द्यूताचें आव्हान दिलें. या वेळीं फांशांच्या विद्येंत नल प्रवीण होता. त्यानें पुष्कराला हां हां म्हणतां हरविलें. त्याचें राज्य त्याला मिळालें. प्रजेला तिचा आवडता राजा परत मिळाला.

बृहदश्वामुनीनें नलाची ही कथा सांगितल्यावर धर्मराजाला एक प्रकारचें समाधान लाभलें. मोठमोठ्या पुण्यश्लोकांवर आपत्प्रसंग ओढावले तिथें माझी कथा काय, असें त्याला वाटलें. बृहदश्वा निघून गेला अन् लोमशमुनि त्याच्या भेटीला आला. त्याच्याशीं निरनिराळ्या विषयांवर चर्चा करीत असतां सहज द्रौपदीचा विषय निघाला. द्रौपदी पांडवांच्या समागमें जे कष्ट

सहन करीत होती, हंसतमुखानें जीं वनवासाचीं दुःखें गिळीत होती, त्याबद्दल धर्मराजाला तिचें अपार कौतुक वाटे. त्याला अनुसरून त्यानें लोमशाला विचारलें कीं, 'आमच्या द्रौपदीसारखी एखादी पतिव्रता तुमच्या ऐकिवांत आहे काय?'

लोमश म्हणाला, "आहे. तिचें नांव सावित्री. महापतिव्रता. अतुल सत्त्वधीर आणि त्यागी. मी तुला तिचें आख्यानच सांगतों तें ऐक."

## सावित्रीचें आख्यान

मद्रदेशांत अश्वपति नांवाचा राजा राज्य करीत होता. विवाह होऊन बराच काळ लोटला तरी संतान होईना म्हणून त्यानें गायत्रीची आराधना आरंभिली. अठरा वर्षांनीं ती त्याला प्रसन्न झाली. राजानें तिच्यापाशीं पुत्र मागितला. ती त्याला म्हणाली, 'तुझ्या नशिबांत पुत्र नाहीं. एक कन्या तुला होईल आणि ती मात्र भूमंडळांत विख्यात होईल!'

त्यानंतर नवमास पूर्ण होतांच त्याच्या पट्टराणीनें एका मुलीला जन्म दिला. राजानें तिचें नांव सावित्री ठेविलें. ती दिसीं-मासीं वाढूं लागली. बाल्य संपून तारुण्य आलें. तिचीं कोमलांगें विकास पावलीं. तिच्या वाढत्या वयाबरोबर राजाच्या मनांतली चिंताहि वाढूं लागली. हिला आतां योग्य वर कोण मिळेल याची तो दिवसरात्र विवंचना करूं लागला. अनेक राजपुत्र त्याच्या डोळ्यांपुढें आले. अनेकांनीं तिला मागण्याहि घातल्या; पण राजाच्या मनांत त्यांतला एकहि भरेना. शेवटीं त्यानें सावित्रीलाच योग्य वराची निवड करण्याचें स्वातंत्र्य दिलें.

संगें दळभार घेऊन सावित्री वरशोधनाच्या दौऱ्यावर निघाली. अनेक देश तिनें पायांखालीं घातले. अनेकांच्या गांठीभेठी घेतल्या. अखेर तिला मनाजोगता वर एका रानांत सांपडला. घरीं परत येऊन तिनें बापाला सांगितलें,

"बाबा, द्युमत्सेन नांवाचा एक अंध राजा आहे. तो तूर्त राज्यभ्रष्ट होऊन वनवासांत दिवस कंठीत आहे. त्याला सत्यवान् नांवाचा एक पुत्र आहे. मदनाला लाजवील असें त्याचें रूप आहे. बोलणें गोड. वर्तन विनय-

शील. सिंहाचा पराक्रम. वृद्ध मातापित्यांची सेवा मन लावून करतो. त्याचा एकेक गुण पृथ्वीमोलानें मोजावा असा आहे. मला तो आवडला. मी त्याला मनानें वरूनच परत आलें आहे."

बापाला तिची निवड मानवली; पण त्याच वेळीं तिथें नारद बसला होता. त्यानें मात्र 'हें ठीक नाहीं' असें म्हटलें. 'सत्यवान् एरव्हीं चांगला असला तरी तो अल्पायुषी आहे. आजपासून एका वर्षानें तो यमाचा पाहुणा होणार आहे. तेव्हां तुझ्या कन्येनें दुसरा वर पहावा हें चांगलें!' असा नारदानें अभिप्राय दिला. अश्वपतीचें मन विलचित झालें. आपली सोन्यासारखी मुलगी सौभाग्याला वंचित व्हावी असें कोणत्या बापाला वाटेल! पण सावित्रीचा निजनिर्धार अढळ होता. नारदानें अशुभ भविष्य सांगितलें म्हणून ती डगमगली नाहीं. तिनें बापाला स्पष्ट शब्दांत सांगितलें,

"बाबा, माझा निश्चय कालत्रयीं फिरायचा नाहीं. मनाचें दान फक्त एकदांच अन् एकालाच देतां येतें. सत्यवान् अल्पायु असला तरी असूं दे. तो गेला तर मीहि त्याच्यामागून जाईन. तो जगला तर मीहि जगेन! माझ्या पदरीं कांहीं पुण्यसंचय असेल तर विष तेंच अमृत होईल. माती खणतांना निधान हातीं लागेल. माझें एकदां ठरलें तें अभंग!"

अश्वपति मग तिच्या इच्छेच्या आड आला नाहीं. सावित्रीला घेऊन तो वनांत गेला. द्युमत्सेनाला भेटून त्यानें आपण सत्यवानाला कन्यादान करायला आल्याचें सांगितलें. आपल्या दुःस्थितीकडे लक्ष देऊन द्युमत्सेन नको म्हणत होता; पण अश्वपतीनें तें ऐकलें नाहीं. यथाविधि लग्नसंस्कार झाला. सावित्रीला तिथें ठेवून अश्वपति आपल्या नगराला आला.

सावित्रीनें सेवेची दीक्षा घेतली. तिनें आश्रमाभोंवतीं केळी, सिताफळी लावल्या. फुलझाडें वाढविलीं. सुंदर बागशाही निर्माण केली. झाडण्या-सारवण्याचें अन् कंदमुळें शिजविण्याचें काम स्वतःकडे घेऊन तिनें सासूला विश्रांति दिली. सासू म्हणे, 'मुली, किती कष्टशील, किती धांवाधांव करशील!' सासऱ्याला डोळ्यांनीं तिचें रूप, तिची हालचाल दिसत नव्हती; पण तो तिच्या साखरेच्या बोलांनींच संतुष्ट होई. अभाग्याच्या घरीं कामधेनु आली म्हणून तो तिला गौरवी. सत्यवानाला तर ती जिव कीं प्राण झाली!

आपण हंसतमुख राहून तिनें सर्वांचीं मुखें प्रफुल्ल ठेवलीं. स्वतः श्रमून तिनें सर्वांना सुख दिलें. सर्वांच्या अंतरांत तिनें आपलें प्रेम ओतलें. तिच्या आगमनानें त्यांच्या आश्रमांतलें दैन्य-दुःखाचें आंधारें फिटून गेलें.

होतां होतां कालचक्राचा बारा महिन्यांचा एक फेरा संपत आला. सत्यवानाच्या मृत्यूचा काळ चार दिवसांवर येऊन ठेपला. सावित्री सावध होती. ती मुळुमळु रडत बसणारी नव्हती. आपल्या पुण्यसंपदेच्या बळावर तिनें मृत्यूशीं झगडायचें ठरविलें होतें. त्यासाठीं तिनें आधीं तीन दिवस उपोषण आरंभिलें. घोटभर पाणीसुद्धा वर्ज्य केलें.

सासूला अन्न जाईना. सासऱ्याला घांस गिळेना. तीं म्हणत, 'कशासाठीं असा निश्चक्र उपवास करतेस मुली? असें निर्वाण कां मांडलें आहेस?' पण आपल्यावर कोणता दुर्धर प्रसंग गुदरणार आहे हें ती वृद्ध सासू-सासऱ्यांना सांगूं शकली नाहीं. तिनें तें गौप्य कोणालाच कळूं दिलें नाहीं.

अखेर सत्यवानाच्या मृत्यूचा तो दुष्ट दिवस उजाडला. सावित्री अंतर्यामीं गंभीर झाली. डोळ्यांत तेल घालून सत्यवानावर नजर ठेवूं लागली. सकाळ गेली. दुपार टळली. तिसरा प्रहर लागला. काळ कुठून येतो अन् कोणत्या रूपानें येतो तें पहाण्यासाठीं तिनें आपल्या प्राणज्योति पाजळून ठेविल्या.

इतक्यांत सत्यवान् खांद्यावर कुऱ्हाड घेऊन लांकडें आणण्यासाठीं रानांत निघाला. सावित्रीहि त्याच्याबरोबर गेली.

## यम आणि सावित्री

पर्यटन करितां तये वेळीं अस्ताचला गेला चंडमौळी
निशा गोर प्राप्त जाहली झगमगती उडुगणें १

पतीस विनवी राजसबाळा आश्रमाप्रती स्वामी चला
तो वटवृक्षी उभा ठेला शुष्क काष्ठें मोडित २

एक काष्ठ बळें मोडित ते कपाळीं आदळलें अकस्मात
पाषाण जेवीं वर्मी बैसत पडिला मूर्छित सत्यवान ३

देखोनि पतिव्रता धांवली मुखीं मस्तकीं उदक घाली
मांडी आपुली उसां दिधली वारा घाली निजपल्लवें ४

रात्र एक प्रहर पूर्ण तेव्हां गेला पतीचा प्राण
लावण्यसागरींचें निधान शोकार्णवीं पडियेलें ५

म्हणे उठाजी प्राणनाथा आश्रमीं वाट पाहती मातापिता
मज सांडूनि तत्त्वतां दूर पंथा सेविलें ६

मज टाकूनि कांतारीं सांगातिया गेलां दुरी
शोक करितां सुंदरी यम तेथें पातला ७

त्याचा लिंगदेह काढून यम चालिला दक्षिणपंथे घेऊन
सावित्रीनें प्रत्यक्ष देखोन पाठीं धांवे तयाचे ८

मुखें करीत स्तवन क्षणक्षणा घाली लोटांगण
म्हणे महाराज तूं कोण नाम खूण सांगें पां ९

येरू म्हणे मी यम जाण तूं पतिव्रता थोर म्हणोन
दूत न दिले धाडून मीच आलों न्यावयातें १०

ऋणानुबंध सरला पूर्ण जाईं भ्रताराचें करी दहन
येरी म्हणे गेलिया प्राण तुझे चरण न सोडीं मी ११

तुझी कन्या वेल्हाळा तीस वैधव्य शब्द नको दयाळा
यावरी प्रेतनाथ बोलता सहसा न घडे गोष्टी हे १२

एक पतिप्राण वेगळा करून माग तुज जाहलों प्रसन्न
मागसी तें देईन बोल वचन सुकुमारे १३

येरी म्हणे द्युमत्सेन श्वशुर    देईं त्यास महाराजा नेत्र
यम म्हणे तुझा लागतां कर    येईल दृष्टि निर्धारें    १४

यावरी माघारीं जाईं आतां    म्हणे सोडून तुज ऐसा पिता
कोणीकडे जावें ताता    मज माहेरा न्यावें समागमें    १५

मग बोले विश्वहंता    पति वेगळा करून माग आतां
पतिव्रता म्हणोनि तत्त्वतां    प्रसन्न जाहलों दुसऱ्यानें    १६

यावरी बोले सुंदरी    श्वशुराचें राज्य दे झडकरी
तथास्तु म्हणे भास्करी[1]    आतां माघारीं जाई कां    १७

येरी म्हणे दयाळा वैवस्वता    पतिसमागमें मज ने आतां
आम्हां चक्रवाकांस तत्त्वतां    आदित्यात्मजा[2] एक करीं    १८

व्रत तप आणि दान    जरी घडलें असेल पूर्वींहून
मातापिता लक्षूनि नारायण    मानून पूजिलीं असतील    १९

तरी तुज दया उपजेल मनीं    मग तो बोले यम वाणी
सत्यवान् वेगळा करूनी    माग साजणी अभीष्ट    २०

माझ्या पित्यास शतपुत्र    देईं अर्कजा ! तूं सत्वर
धर्मराज देत उत्तर    तथास्तु ऐसें त्रिवाचा    २१

बोले पतिव्रताशिरोरत्न    दुष्काळामाजी अन्नदान
तृषार्तांसि जलपान    करविलें असेल उष्णकाळीं    २२

---

१ यम.  २ हे यमा !

तरीच मज देखोन दयालु होय भानुनंदन
मग यम बोले हांसोन चतुर्थ वर मागें कां २३

व्यर्थ शब्द तत्त्वतां मज नको दयाळा आतां
शतपुत्रीं सफल ताता उदरलतिका करीं माझी २४

श्राद्धदेव होऊनि दयाळ म्हणे कन्ये तुज दिधलें सकळ
तुझे गुण देखोनि निर्मळ संतुष्ट जाहलों सर्वस्वें २५

सावित्री म्हणे सर्वज्ञमूर्ति बोलें सत्यवानास आयुष्य किती
येरू म्हणे तूं मम कन्या सुमती महासती विख्यात २६

चार शत वर्षेंपर्यंत सत्यवान् आयुष्यवंत
तुज होतील शंभर सुत पौत्रही बहुत देखसी २७

वैरी नासती सर्वथा सकळ राज्य येईल हाता
तूं पतीपाशीं जाईं आतां स्पर्शतां प्राण येईल पैं २८

— श्रीधरकृत पांडवप्रताप, अ. २८

सत्यवानाचा प्राण परत देऊन यम स्वस्थानीं निघून गेला. सावित्रीचें निधडें पातिव्रत्य विजयी ठरलें ! सत्यवान् उठून बसतांच तिने त्याला हळू-हळू चालवीत आश्रमांत आणलें. सर्वांची काळजी दूर झाली. द्युमत्सेनाला डोळे आले. राज्य परत मिळालें. सावित्री शंभर पुत्रांची माता झाली !

हें सावित्रीचें आख्यान द्रौपदीनें एकचित्तानें ऐकलें.

त्यानंतर पांडव लोमशमुनींसह तीर्थयात्रेला निघाले. प्रयागला जाऊन त्यांनीं त्रिवेणीसंगमावर स्नान केलें. वाराणशीला जाऊन विश्वेश्वराचें दर्शन घेतलें. गयेला जाऊन विष्णुपदीं पिंडप्रदान केलें. प्रभासक्षेत्रीं समुद्रस्नान झालें. त्यानंतर ते गंधमादन पर्वतावर आले. पुढें बदरिकाश्रम लागला.

पांडवांनीं कांहीं काळ तिथें वस्ती केली. एक दिवस द्रौपदी भीमासह पर्वतावर हिंडत असतां कुठून तरी कमळाचा परिमळ आला. द्रौपदीला तो आवडला. ती भीमाला म्हणाली, ‘ महाराज, हीं मधुर सुवासाचीं कमळें जेथें असतील तिथून मला आणून द्या. मी त्यांनीं धर्मराजाची पूजा करणार आहे!’

द्रौपदीची कोणतीहि लडिवाळी पुरविण्याच्या कामीं भीम सदैव तत्पर असे. तिच्या शब्दासरशीं तो सुगंध ज्या दिशेनें येत होता तिकडे वनें, पर्वत उल्लंघीत चालला. एक कर्दळीवन लागलें. तेंहि ओलांडून तो पुढें गेला. त्याच्या पुढच्या डोंगरावर चढत असतांना वाटेत मारुति बसलेला त्याला दिसला. त्याचें भव्य शेपूट लांबवर पसरलें होतें.

“ ए थेरड्या माकडा! तुझें शेपूट उचल! मला पुढें जायचें आहे! ” असें तो म्हणाला.

“ बाबा रे! मी झालों आहें आतां म्हातारा. त्यामुळें माझा देह माझ्या स्वाधीन उरला नाहीं. तूं तेवढें बाजूला उचलून ठेव अन् जा पुढें! ” मारुतीनें सांगितलें.

दहा हजार हत्तींचें बळ भीमाला होतें. तो धांवूं लागला कीं, नुसत्या वाऱ्यानें आसपासचे वृक्ष उन्मळून पडत; पण दोन्ही हातांनीं सगळें बळ एकवटून त्यानें प्रयत्न केला तरी मारुतीचें शेपूट त्याला उचलेना. तो खट्टू झाला. त्याचा बलदर्प उतरला. ‘ तूं कोण? शिव, विष्णु का ब्रह्मदेव?’ म्हणून भीमानें मारुतीस विचारलें.

अंजनीपुत्र म्हणाला, ‘ मी रामाचा दास आहें. माझें नांव मारुति!’ तें ऐकून भीमानें त्याला दृढ आलिंगन दिलें. तो मारुतीला म्हणाला,‘ ज्येष्ठ बंधो, तुझा लंकेतला पराक्रम माझ्या कानांवर आला आहे. तुझें जर माझ्यावर प्रेम असेल तर लंकादहनाच्या वेळीं तूं घेतलेलें रौद्र रूप मला दाखव. तें पहाण्याची मला आतुरता लागली आहे.’

मारुतीनें त्याला तें रूप दाखविलें. त्याची उग्रता पाहून भीमासारखा बळाचा पर्वतहि हादरला. त्याच्या पसरलेल्या जबड्यांत ब्रह्मांड गडप होईल असें त्याला वाटलें. त्याचे डोळे दिपले ते बराच वेळ उघडतच ना! मारुतीनें पुनश्च सौम्यरूप होऊन भीमाला आश्वासिलें. ‘ सर्वत्र तुझा जय

होईल!' असा त्याला आशीर्वाद देऊन तो तत्क्षणीं गुप्त झाला. भीमाला आणखी थोडें पुढें गेल्यावर तीं सौगंधिक कमळें असलेलें भव्य तळें दिसलें. तें कुबेराचें सरोवर होतें. मोठमोठे राक्षस तिथें संरक्षक खडे होते. त्यांचें कंदन करून भीम आंत उतरला. भाराभर कमळें तोडलीं. रक्षकांनीं जाऊन कुबेराला वर्दी दिली. कुबेर त्यांना म्हणाला कीं, 'तुम्ही त्याच्या वाटे जाऊं नका!'

भीम कमळांचें ओझें घेऊन मुक्कामाला आला. द्रौपदीचें हृदय हर्षानें नाचूं लागलें. तिनें त्यांचा हार गुंफून धर्मराजाच्या गळ्यांत घातला.

पांडव गंधमादनपर्वतावर असतांना त्यांच्यावर आणखी एक संकट आलें. जटासुर नांवाचा एक राक्षस ब्राह्मणवेष घेऊन त्यांच्याकडे आला. संगतीला राहून पंगतीला जेवूं लागला. त्याच्या मनांत कपट होतें आणि तें सिद्धीला नेण्याची संधि केव्हां सांपडते म्हणून तो बोकयासारखा टपून बसला होता. थोड्याच दिवसांत त्याला मोका मिळाला.

भीम रानांत शिकारीला गेला होता. धौम्य आणि लोमशमुनि नदीवर अनुष्ठानाला गेले होते. तें पाहून त्यानें आपलें राक्षसरूप धारण केलें आणि धर्म, नकुल, सहदेव आणि द्रौपदी या चौघांनाहि उचललें. त्यांना घेऊन तो उत्तुंग पर्वताच्या रोखानें पळत सुटला. त्या तिघांहि भावांना मारून नर-मांसाची लयलूट करावी अन् द्रौपदीला पत्नी म्हणून गुहेंत सांभाळावी असा त्याचा अघोरी विचार होता. धर्मादिकांच्या हातांत शस्त्रें नसल्यामुळें ते तेजोहीन झाले होते; पण भक्तांचा पाठीराखा भगवान्! द्रौपदी भीमाच्या नांवानें टाहो फोडीत होती तो त्याच्या कानांवर गेला आणि भीम धांवत पुढें आला.

खांद्यावरचें ओझें खालीं ठेवून जटासुराला भीमाशीं दोन हात करणें भाग पडलें. दहा घटका त्यांचें तुंबळ युद्ध झालें. वालि-सुग्रीवांसारखे ते एकमेकांना रगडूं लागले. सुंदोपसुंदांसारखे विभांडूं लागले. शेवटीं भीमानें त्याचें मुंडकें तोडून गगनमंडळांत भिरकावून दिलें आणि द्रौपदीची लाज राखली. सर्व मंडळी परत आश्रमाला आली.

त्यानंतर थोड्याच दिवसांनीं स्वर्गांतून अर्जुन खालीं उतरला. इंद्राचे सागरवासी शत्रु निवातकवच दैत्य यांना निर्दाळून, देवांच्याकडून जयघोष

करून घेऊन तो परत आपल्या मंडळींत आला होता. त्याला पाहून धर्माच्या नेत्रांतून आनंदाश्रु लोटले. त्यानें त्याला हृदयाशीं कवळिलें. द्रौपदीनें आनंद-निर्भर होऊन त्याच्या चरणीं मस्तक नमविलें. इंद्रानें दिलेला दिव्य नजराणा त्यानें धर्माच्या पायांशीं सादर केला. पाठोपाठ इंद्रानेंहि तिथें येऊन सर्वांना दर्शन दिलें. अर्जुनाच्या रणनैपुण्याचे पवाडे गाइले. 'तुम्हांला पुनश्च साम्राज्यवैभव लाभेल!' असा धर्माला आशीर्वाद देऊन तो परत स्वर्गाला गेला.

पुढें तिथून निघाल्यावर वाटेंत त्यांना अजगराच्या रूपानें पडलेला नहुष भेटला. त्यानें भीमाला पकडलें. 'माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देशील तर भीमाला सोडीन!' असें तो धर्माला बोलला. त्यानें चातुर्वर्ण्याचीं लक्षणें विचारलीं. धर्मानें त्याला यथानिगुती उत्तरें दिलीं. नहुष भीमाला सोडून एकाएकीं दिव्यरूप झाला. 'अगस्तीच्या शापानें मी अजगर होऊन कैक वर्षें इथें पडलों होतों. तो आज भीमाच्या स्पर्शानें शापमुक्त झालों.' असें त्यानें धर्माला सांगितलें. लगेच नहुषासाठीं विमान आलें त्यांत बसून तो स्वर्गारूढ झाला. अशा प्रकारें सगळीं तीर्थें करून पांडव परत द्वैतवनांत आले.

## घोषयात्रा

इकडे हस्तिनापुरांत कौरवांतल्या चाडाळांची चौकडी एकत्र बसली. 'पांडवांच्या वनवासाचीं बारा वर्षें भरत आलीं. अज्ञातवासाचें एक वर्षहि चुटकीसरसें संपेल. पुढें युद्धाचा प्रसंग ठेवलेलाच! पण पांडवांशीं युद्ध करणें ही गोष्ट आतां सोपी नाहीं. भीम तर अतुर्बळी आहेच. शिवाय अर्जुनहि लोकपाळांकडचीं अस्त्रें मिळवून अजिंक्य झाला आहे. या बारा वर्षांत आपल्याला कांहीं करतां आलें नाहीं. आतां मात्र चंग बांधून कामाला लागलें पाहिजे. पांडव गैरसावध असतांना अंधाऱ्या रात्रीं त्यांच्यावर छापा घालून यमलोकीं त्यांची रवानगी केली पाहिजे; पण प्रश्न आहे तो हा कीं, द्वैतवनांत जायचें कोणत्या निमित्तानें?' दुर्योधनानें असा प्रस्ताव मांडला.

त्यावर शकुनि म्हणाला कीं, "युक्ति सोपी आहे. द्वैतवनांतले गवळी गायींचीं खिलारें पहाण्यासाठीं आपल्याला वेळोवेळीं बोलावीत आहेत. तें

निमित्त आपण पुढें करूं. मनांतला हेतु आंधळयाला कळूं दिला नाहीं कीं तो आपल्याला परवानगी देईल!"

शकुनीचें बोलणें म्हणजे कौरवांना वेदवाक्य! 'नामी युक्ति!' म्हणून त्यांनीं टाळी दिली. दुर्योधन सर्वांना बरोबर घेऊन धृतराष्ट्राकडे गेला. घोषयात्रेची त्याच्याकडे परवानगी मागूं लागला. हल्लीं धृतराष्ट्राच्या मनांत पांडवांची चांगलीच दहशत बसली होती. त्यांच्या अतुल पराक्रमाच्या गोष्टी गेल्या बारा वर्षांत अनेक वेळां त्याच्या कानांवर आदळल्या होत्या. आपल्या पोरांचें पुढें कसें होणार या चिंतानळांत तो पिचत होता. 'एरव्हीं काय करायचें तें करा; पण पांडवांकडे मात्र जाऊं नका!' असें निक्षून बजावून त्यानें सशर्त अनुज्ञा दिली.

"छे छे महाराज! तसलें आमच्या स्वप्नांत सुद्धां यायचें नाहीं. वनवास दुःखानें पीडलेले बिचारे पांडव! त्यांच्याकडे आम्ही कशाला जाऊं? मेलेल्यांना आणखी मारण्यांत काय पुरुषार्थ!" शकुनीनें साळसूदपणें धृतराष्ट्राला ग्वाही दिली:

होतां रायाचें उत्तर चालिले कौरवांचे भार
जैसा उलथे जळसागर बुडवावया युगांतीं १

नगरवासी सहकामिनी राजदारा शिबिकासनीं[1]
दासदासी वस्त्राभरणीं शृंगारूनि चालिले २

ऐसे हर्षे पातले घोषस्थाना[2] दुरूनि देखती द्वैतवना
गोप गोपी दुर्योधना दंडवतें घालिती ३

गोपकन्या गोपस्त्रिया कनकताटीं आरतीया
ओवाळूनि कौरवराया पैं कुरवंडी सांडिती ४

---

१ पालखींत. २ गोळवाड्यात.

तयां वोपूनि वस्त्राभरणें वल्लव[1] तोषविले मानें
ते म्हणती ' जी आपुल्या नयनें धेनु खिल्लारें पाहिजे[2] ५

असह्य वृषभांच्या दावणी तरुण धेनूंच्या अपार श्रेणी
पोळ माजले नाना वर्णी गोत्रपुरुष[3] नंदीचे ६

कोमळ तृण चरोनि वनीं गोठणीं येती धेनूंच्या श्रेणी
वोहीं[4] दाटल्या चहूं स्तनीं दुग्धधारा वर्षती ७

तृप्त जालिया मार्गधरणी लोटल्या पयरसाच्या तटिनी[5]
अश्व कुंजर दुग्धपानीं स्वानंदें माजले ८

क्षीरपान करिती बहुतें एक भक्षिती नवनीतें
दधिशर्करा उभय हस्तें स्वेच्छ एक भाक्षिती ९

हस्त रोविल्या न फुटे ऐशीं दुग्धें सरसें दाटें
सुवर्णपात्रीं अतिचोखटें रायापुढें ठेविलीं १०

मृग वधूनि बहुवसें आणूनि भक्षिती विचित्र मांसें
मद्यपानीं सुखसंतोषें एक माजले डुलती ११

संगियां[6] सांगे दुर्योधन स्त्रियांसहित वनक्रीडन
तें जें जया आवडे वन तेणें तेथें रमावें १२

चित्रसेन गंधर्वनाथ संगीं गंधर्व अप्सरा असंख्यात
सहस्र कामिनींसमवेत अरण्यक्रीडे पातला १३

---

१ गवळी. २ पहावीं. ३ वंशज. ४ कांसा. ५ नद्या. ६ सोबत्यांना.

| | |
|---|---|
| द्वैतवनींची वृक्षदाटी | रम्य कासारें देखिलीं दृष्टीं |
| कमळवनामाजी संतुष्टी | हस्तयुग्में क्रीडती १४ |
| चहूं दिशां ठेवूनि दूत | जळक्रीडे स्त्रियांसहित |
| कौरवसेना निघाली तेथ | उद्धटपणें नेणतां १५ |
| गंधर्वदूत प्रबळ प्रचंड | आडवे केले सुवर्णदंड |
| म्हणती " मानव अवघे मूढ | चतुर एकही न देखों १६ |
| गंधर्वराज सहकामिनी | क्रीडा करी सरोवरजीवनीं[1] |
| अवसर विलोकूनी | यावें जावें विचारें " १७ |
| येरू वाहूनि धनुष्यबाणा | विंधिते झाले गंधर्वगणा |
| जाणवलें[3] चित्रसेना | सेवकजनीं सकोपें १८ |
| राजा बोलिला कठिणोत्तरीं | ' ताडण करा तीक्ष्ण शरीं |
| सहज पांडवांचे वैरी | शत्रु असती आमुचे १९ |
| धरिती संग्रामाची पैज | तरी आतांचि करा त्यांचें काँज[4] |
| कौरव मारूनि वोपूं राज्य | खंडूं व्याज वैरियांचें ' २० |
| आज्ञापितां गंधर्वपती | आयतीं शस्त्रें प्रयोजिलीं हातीं |
| ताडण करितां निर्घातीं | प्राण बहुतीं त्यागिले २१ |
| घायाळ झाले असंख्यात | कौरवराया सांगती दूत |
| राजा कोपला अत्यद्भुत | मुखें प्रेरी सैनिकां २२ |

१ तळीं. २ पाण्यांत. ३ सांगितलें. ४ त्यांना ठार मारा.

खळबळिलें कौरवांचें कटक जेवीं युगांतीं पावकमुख[1]
गंधर्व म्हणती प्रलयोदक बाणधारा मोकलूं २३

रथ लोटूनि घडघडाट बाण सोडिती सणसणाट
अग्नियंत्राचे कडकडाट उभयदळीं माजले २४

धैर्य धरितां दुर्योधन पुढें लोटला चित्रसेन
संधी संधी भेदले बाण म्हणे ' निर्वाण मांडलें ! ' २५

चत्वार[2] बाण सोडोनि पुढती चारी वारू पाडिले क्षितीं
सर्वेचि मारूनि सारथी गतप्राण तो केला २६

दुर्योधन उतरोनि क्षितीं आरूढला विकर्णरथीं
तया वेष्टित बंधुपंक्ती[3] प्राण धाकें मीनल्या २७

हें देखोनी गंधर्वनाथ संगियांशीं धांवला त्वरित
दुर्योधन बंधूंसहित धरूनि रथीं घातला २८

दुर्योधनाच्या कामिनी धरूनि वाहिल्या रथयानीं
जयजयकाराचे ध्वनी खेंचरलोकां निघाले २९

सेना घेऊनि सेनापति पळत पातला पांडवांप्रती
धर्मराज देखोनि क्षितीं दंडवतें घातलीं ३०

म्हणे ' तुझे बंधु सगुण घोषयात्रे पातले जाण
गंधर्वी करूनि कदन धरूनि नेती स्वर्गलोका ' ३१

---

१ अग्नीचें मुख. २ चार. ३ कौरवांचा समुदाय.

भीम म्हणे ' बहुत बरवें आम्हीं यत्नें जें करावें
तें सिद्धी पावविलें देवें अनायासें करूनियां ३२

शकुनीलागीं सांगा निरुतें कपटपाश धरूनि हातें
पुढें होईं संग्रामातें राजयातें सोडवीं ३३

दुःशासना ! हीनशक्ती वस्त्रें फेडिलीं जया हातीं
ते हस्त तुटोनि पडले क्षितीं कां काजा न येती संग्रामा ?' ३४

धर्म म्हणे ' बापा भीमा ! हें बोलणें श्लाघ्य नव्हे आम्हां
क्लेशकाळीं नरेंद्रोत्तमा वर्मशब्द न वदावे ३५

वोखटें गोमटें स्वभावें मनुष्यापासूनि घडे आघवें
समयीं वर्मीं जरी खोंचावें तरी पुरुषार्थ कायसा ? ३६

आपणामाजी हो आपण आचरावें न्यूनपूर्ण[1]
पारखीं[2] गांजिलिया अभिमान सर्वे मिळोनी रक्षावा ३७

अपमान जाला दुर्योधना तो मज धर्मा कुरुनंदना
ऐसा खेद मानूनि मना धांवा वेगीं सुहृद हो ' ३८

कौरवांचिये कनकरथीं वळघले चौघेही पुरुषार्थी
सवेग गरुडाचिये गती पाठीलागीं पावले ३९

धनुष्यें सज्ज करूनि मुष्टी तूणीर[3] आवळिले पृष्ठीं
खड्ग बांधोनियां कटितटीं पाठोपाठीं निघाले ४०

१ उणें-अधिक. २ परक्यांनीं. ३ भाते.

म्हणती ' उमा राहें रे चित्रसेना  व्यर्थ श्लाघ्यता मानिसी मना
मुक्त करीं गा दुर्योधना  बंधु आमुचा म्हणोनी '  ४१

गंधर्व म्हणे ' कदा न घडे '  म्हणवूनि युद्धीं मिसळले गाढे
माद्रीपुत्रांसी बळीपाडें  भीम अर्जुन क्षोभला  ४२

गंधर्वांच्या शरसंधानीं  कोंदलें आकाश आणी धरणी
पार्थाचिये तीक्ष्ण बाणीं  खंड विखंड पाडिले  ४३

मत्स्यजीवी[1] पसरूनि जाळें  मत्स्य कवळी एकेची काळें
तेवीं अर्जुनें संधानबळें  रथ पाडिले भूतळीं  ४४

धरा[2] सुवासिनी बाळी  रक्तकुंकुम चार्चिलें भाळीं
खेचरांच्या शीसकमळीं[3]  माथे पुष्पीं तुरंबिले  ४५

अर्जुन हस्तीं सुटतां बाण  कांपिन्नला चित्रसेन
म्हणे ब्रह्मांडाचें दहन  करूं शके निर्वाण  ४६

अंतरा[4] थोकूनि[5] रहंवरा[6]  विनीत बोले ज़ोडूनि करा
' प्रवर्तलों मित्राचारा  सुख द्यावया तुम्हांतें  ४७

ते तुम्हीं विसरोनि सकळ  युद्धा प्रवर्तलेती उतावेळ
उपकार जाणावया कुशल  तुम्हीच एक चतुर हो '  ४८

पांडव म्हणती ' अगा मित्रा  रहस्य कळलें अतिपवित्रा
परी दृष्टी देखतां कुंतीपुत्रा  श्लाघ्य नव्हे लौकिकीं  ४९

---

१ कोळी. २ पृथ्वी. ३ मस्तकांनीं. ४ मध्यें. ५ थांबवून. ६ रथाला.

उपकार ठेवूनि आमुच्या माथां मुक्त करावें कौरवनाथा
देखोनि तुझिया पुरुषार्था परम संतोष धर्मातें ' ५०

पातले धर्माच्या दर्शना खेचरीं नमस्कारिलें चरणा
धर्में देऊनि आलिंगना स्नेहभावें बोलत ५१

' माझे सुहृद् बंधपाशीं पाडिले भोगविशेषीं
ते सोडूनि कीर्तिघोषीं यश जोडीं सुमित्रा ' ५२

दुर्योधन बंदीं पडला तो धर्मवाक्यें मुक्त केला
याहूनि पुरुषार्थ आगळा कोणता सांग त्रिलोकीं ५३

आज्ञा मागूनि कुरुनंदना गंधर्व गेले इंद्रभुवना
वृत्तान्त ऐकोनि शचीरमणा[1] परम कौतुक वाटलें ५४

धर्मासन्मुख दुर्योधन मुख न दावी अधोवदन
धर्म म्हणे ' बापा मन व्याकुळ कांहीं न करावें ५५

खेळतां जीत अथवा हारी वांचूनि नाहीं तिसरी पैरी[2]
तेहि पुरुषाचेच शिरीं काळें कर्में होतसे ५६

जेणें अनर्थीं पडिजे ताता ! ऐसा सायास न कीजे आतां
घेऊनि सुहृदां समस्तां निज नगरासी जाइजे ५७

कष्टलासी येऊनि वना विश्रांतीसी जाऊनि सदना
कांहीं खेद मानिसी मना तरी आण तुज माझी ' ५८

---

१ इंद्राला. २ प्रकार.

कांहीं नेदितां प्रत्युत्तर घेऊनि शकुनि सहोदर
मौन्यें चालिला हस्तिनापुर खेद बहुत मानसीं ५९

—मुक्तेश्वरकृत भारत, वनपर्व अ. १७

दुर्योधनाला वाटलें कीं, आलों कशाला अन् झालें काय? पांडवांनीं बंधमुक्त केलें त्यापेक्षां मेलों असतों तरी बरें झालें असतें! पांडवांचे उपकार मानायच्याऐवजीं त्यानें मनांत आणखी वैराची गांठ मारली. कर्ण युद्धांत पळून गेला होता तो त्याला वाटेंत येऊन भेटला. त्याला पहातांच दुर्योधनाला भडभडून आलें.

"मित्रा कर्णा! आतां हें काळें तोंड भीष्म-द्रोणांना कसें रे दाखवूं? ते उपहासानें माझें काळीज चिरतील!" असा त्यानें विलाप मांडला. कर्ण, शकुनि त्याला संबोखीत पुढें नेऊं लागले. रात्रीं त्यांनीं एका तळ्याच्या कांठीं मुक्काम केला. सर्वांना झोंप लागली; पण दुर्योधनाला ती प्रसन्न होईना!

हें वर्तमान पाताळांतल्या दैत्यांना कळलें. त्यांनीं एक काळीकभिन्न कृत्या पाठवून दुर्योधनाला पाताळांत आणलें. दैत्य त्याला म्हणाले, "पांडव तुझे तसेच आमचेहि शत्रु आहेत. तुझा त्यांचा युद्धप्रसंग घडेल तेव्हां आम्ही तुला गुप्तपणें साह्य करूं. तूं मुळींच शोक करूं नको. आनंदानें राजधानीला जा!"

दुर्योधन मान खालीं घालून चोरासारखा राजवाड्यांत शिरला. भीष्म-द्रोणांनीं त्याची निर्भर्त्सना करून म्हटलें कीं, 'इच्छी परा तें येई घरा!'

## जयद्रथविडंबन

त्यानंतर एका दिवसाची गोष्ट. पांडव सगळे शिकारीसाठीं रानांत गेले होते. धौम्यमुनीहि जवळ नव्हते. द्रौपदी एकटीच आश्रमद्वारीं उभी होती. इतक्यांत तिकडून जयद्रथ रथांत बसून आला. तो शाल्वदेशांत लग्नासाठीं निघाला होता. कोटिक नांवाचा एक मित्र त्याच्या समागमें होता. दुरून त्याला द्रौपदी दिसली आणि मग—

तीतें पाहुनि झाला तो रावणसाचि पात्र अन्याया
मित्रासि म्हणे, चित्ता हेचि बहुमता नकोचि अन्या[1]या   १

जा कोटिका सख्या ! तूं पूस तिचें वृत्त, होय मत्करगा
ऐसें आधीं चतुरा ! सामचि निजकार्यसिद्धिमत् कर गा   २

कळलें कोटिकवदनें ती कृष्णा स्वभगिनी असें नातें
तरि भय न धरी लज्जेसह, पळ कामातुरीं असेना तें   ३

कृष्णेसि म्हणे ‘ माझी राणी हो लाजतीस कां बस ये
अंकावरि घेऊं दे आइक सुखकर मदुक्त थांब सये ’   ४

कृष्णा म्हणे ‘ कुबुद्धे ! खद्योतीं कीटकाधमीं मलिनीं
द्यु[2]मणिप्रति सोडूनि प्रियभाव वरील काय रे न[3]लिनी ?’   ५

कामांध खळ करीना अन्य करी लेशही विवेक पिसा
धांवोनि बलात्कारें हां हां म्हणतांहि तो शिवे क[4]पिसा   ६

बसतां स्वरथीं हर्षे तो, जेविं दशास्य जानकीलाभें
धरि पररथासि ती कीं, स्पर्शाया अंत्यजा न की[5]ळा भें   ७

अपशकुनज्ञ युधिष्ठिर समजोनि अनिष्ट सानुज परतला
जो मृगयेंत न चित्तें त्यजुनि दया रामनाम जप रतला   ८

तों मार्गीं भृत्याची भार्या धात्रेयि[6]कांची आढळली
धांवे पडेहि असकृन्न[7]गशिखराहुनि जशी शिला ढळली   ९

---

१ या मला. २ सूर्याला. ३ कमलिनी. ४ वानरासारखा. ५ अग्निज्वालेला. ६ दासी. ७ वारंवार पर्वताच्या शिखरावरून.

वृत्त कथुनि कोपानळ दीप्त करायास पांडु योधमनीं
सरळी[1] सुवंशजा[2] ती झाली धात्रेयिकाचि हो धमनी[3] १०

रिपुला गांठाया ते पांडव देती भरों न घटिकेतें
खळबळ[4] बहु भी, जाणों न पळहि साधूपुढें अंध टिके तें ११

स्वरथावरूनि भूवरि उतरुनि देवीस, जरिहि नाकद[5] न
वरिलें पलायन खळें कीं न पहावेंचि लोचना कदन[6] १२

कृष्णा म्हणे ‘ अहो ! जरि मत्प्रिय करणें वधाचि तरि त्यातें
मरावेंचि नयज्ञें श्रीतें स्त्रीतें बळेंचि हरित्यातें ’ १३

धांवोनि त्यासि सार्जुन भीम महाबळ पळांत आटोपी
ज्याचें चित्त म्हणे स्वक्रोधा, और्वा[7] ! खळाब्धि आटो, पी १४

बुकली भीम, बुकलिती जैसें यज्ञांत बोकडाला हो !
कीं तो साध्वीधर्षणदोषफळानुभव रोकडा लाहो १५

देऊं दे प्राणांत प्रायश्चित्त स्वकीय हा नर कीं
मूर्खा ! सुहृद् वसावा स्वर्गी चिरकाल कीं महानरकीं ? १६

वधसम विडंबन, असें समर्थीच स्मरण शास्त्रपाटव[8] दे
अर्धेंदुशरें त्याच्या माथां काढूनि पांच पाट वदे १७

‘ मी पांडवदास असें स्वमुखें सर्वत्र बोलशील तरी
देईन जीवित तुला, तारी विपदब्धिमाजि शीलतरी[9] ’ १८

१ निष्कपट; पक्षीं सरळ. २ चांगल्या वंशांत उत्पन्न झालेली; पक्षीं वेळूपासून बनलेली. ३ फुंकणी. ४ शत्रुसैन्य. ५ स्वर्ग देणारें. ६ संहार. ७ वडवानळा ! ८ शास्त्रशल्य. ९ शीलरूपी नौका.

वंदुनि म्हणे जयद्रथ ' ऐसेंच म्हणेन मी सदा साचें
मारूं नका बुक्यांनीं रक्षावें जीवित स्वदासाचें. ' १९

## यक्षप्रश्न

त्यानंतर कांहीं दिवसांनीं एक ऋषि धांवत-पळत धर्माच्या आश्रमांत आला अन् म्हणाला, ' राजा धर्मा, माझीं यज्ञपात्रें शिंगावर घेऊन तो पहा एक हरिण पळून जात आहे. त्याचा पाठलाग करा नि माझीं पात्रें मला आणून द्या ! ' ब्राह्मणाची आज्ञा ऐकून पांडव त्या हरिणाच्या मागें धांवले; पण तो एकाएकीं गुप्त झाला. सगळे पांडव चिंताक्रांत होऊन एका वडाखालीं बसले. इतक्यांत धर्माला तहान लागली. जवळपास कुठें पाणी आहे का पहावें म्हणून नकुल झाडावर चढला. थोड्याच अंतरावर त्याला एक लहरतें सरोवर दिसलें. बाणांचा भाता रिकामा करून तो पाणी आणण्यासाठीं धांवला. तो तळ्यांत उतरणार तोंच गुप्त रूपानें तिथें बसलेल्या यक्षानें त्याला बजावलें,

" थांब ! माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दिल्यावांचून पाण्याला स्पर्श करूं नको. फुकट मरशील ! "

पण नकुलानें त्याला जुमानलें नाहीं. तो पाणी प्याला अन् तिथेंच मरून पडला. नकुलाला उशीर झाला म्हणून सहदेव आला. त्याचीहि गत तीच झाली. त्यानंतर भीमार्जुन आले. तेहि त्यांच्याच शेजारीं मरून पडले. शेवटीं धर्म आला. यक्षानें त्यालाहि तेंच सांगितलें. धर्म म्हणाला, ' विचार तुझे प्रश्न ! ' यक्षानें प्रारंभ केला. त्यानें चार प्रश्न विचारावे अन् धर्मानें त्यांचीं उत्तरें सांगावीं असा क्रम सुरू झाला. यक्षानें त्याला असे शंभर प्रश्न विचारले. धर्माचीं उत्तरें त्याला पटलीं. यक्ष म्हणाला,

" मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें. तुझ्या चार बंधूंपैकीं एकाला मी जीवदान देईन. कोणाला उठवूं तें सांग. "

" नकुलाला उठव ! " धर्म म्हणाला.

" भीमाला किंवा अर्जुनाला सोडून नकुलाला जीवदान मागणारा तूं मला वेडाच दिसतोस ! पुढच्या आयुष्यांत भीमार्जुनच तुझ्या कामीं येतील ! "



भीमसेनानें कीचकाला बुकलून ठार मारलें. —पृ. १२१

"तें ठीक आहे; पण मी केवळ व्यावहारिक नफातोटा पहात नाहीं. कुंतीचा एक पुत्र मी जिवंत आहें तसाच माद्रीचाहि एक रहावा अशी माझी इच्छा आहे!"

"धन्य आहे धर्मराजा तुझी!" असें म्हणून साक्षात् यम त्याच्यापुढें उभा राहिला. त्यानें चौघांहि बंधूंना उठविलें. 'यक्ष तो मीच अन् मृगरूपानें ब्राह्मणाचीं यज्ञपात्रें हरण केलीं तींहि मीच! तुझें सत्त्व पहाण्यासाठीं मीं ही माव रचली. पुढें येणाऱ्या अज्ञातवासांत तुम्हांला कोणी ओळखणार नाहीं असा मी तुला वर देतों!'

यम असें बोलला व यज्ञपात्रें धर्माच्या स्वाधीन करून तो गुप्त झाला. पांडव हृष्ट चित्तानें आश्रमांत परत आले. ब्राह्मणाचीं यज्ञपात्रें देऊन त्यांनीं त्याला गौरविलें. एवढ्यांत वनवासाचीं बारा वर्षें भरत आलीं. त्यांनीं ऋषि-जनांचा निरोप घेतला आणि त्यांनीं तें आश्रमस्थान सोडलें.

---

# विराटपर्व

आश्रम सोडून थोडे दूर आल्यावर पांडव एका ठिकाणीं बसले नि अज्ञातवास पुरा करण्यासाठीं कुठल्या देशांत जावें त्याचा विचार करूं लागले. सर्वानुमतें विराटाच्या राजधानींत जावें असें ठरलें. ते त्या रोखानें निघाले. नगराच्या जवळ आल्यावर एका ठिकाणीं थांबले. पहिल्याप्रथम त्यांनीं आपलीं वस्त्रें एका शमीवृक्षाच्या शेंड्यांत लपवून ठेविलीं. कोणीं तिथें येऊं नये म्हणून एक प्रेत झाडाच्या बुंध्याला बांधून टाकलें.

नंतर कोणीं कसला वेष घ्यायचा, नांव काय सांगायचें इत्यादि मसलती ठरल्या. धर्म ब्राह्मण झाला आणि 'कंक' असें नांव घेऊन विराटाकडे गेला. त्याला द्यूतविद्या अवगत आहे हें समजतांच विराटानें त्याला आपल्याबरोबर खेळण्यासाठीं म्हणून ठेवून घेतलें. भीम बल्लव नांवानें स्वयंपाकी म्हणून गेला. द्रौपदी 'सैरंध्री' म्हणून सुदेष्णा राणीच्या सेवेला राहिली. 'मी कोणाचें उच्छिष्ट खाणार नाहीं, कोणाचे पाय धुणार नाहीं !' या अटीवर तिनें तिथलें काम पत्करलें. पांच गंधर्व माझे पति असून ते गुप्त रूपानें आसपास वावरतात आणि माझें रक्षण करतात असेंहि तिनें सुदेष्णेला सांगून ठेवलें.

तिच्या पाठोपाठ अर्जुन क्लीबवेष धारण करून आला. बृहन्नडा असें त्यानें नांव घेतलें. विराटानें आपल्या मुलीला नाच-गाणें शिकविण्यासाठीं नृत्यशाळेंत त्याची नेमणूक केली. सहदेव तंतिपाल नांव घेऊन आला. विराटानें त्याला गोशाळेवरचा मुख्य खिल्लारी नेमलें. ग्रंथिक असें नांव घेऊन नकुल आला. आपल्याला अश्वविद्या उत्तम अवगत असून आपण धर्मराजाच्या पदरीं मुख्य अश्वपाळ होतों असें त्यानें सांगतांच विराटानें त्यालाहि आश्रय दिला. अशा रीतीनें द्रौपदीसह पांचहि पांडव विराटाच्या राजवाड्यांत नामरूपें पालटून अज्ञातवास कंठूं लागले. कोणींहि त्यांना ओळखलें नाहीं. कोणालाहि शंका आली नाहीं.

चार महिने असे गेले आणि एक दिवस जीमूत नांवाचा एक मल्ल विराटाच्या राज्यांत आला. तो महामस्त होता. मल्लविद्येंत तो अजिंक्य ठरला होता. विराटाच्या पदरीं जे मल्ल होते त्यांना त्यानें बोल बोल म्हणतां

लोळविलें. विराटाची अब्रू जाण्याची वेळ आली. त्यानें मग बल्लवाला बोलावून आणून ' तूं जीमूताशीं कुस्ती खेळशील का ? ' असें विचारलें. त्यानें तावडतोब ' होय ! ' म्हटलें. कुस्तीचा दिवस ठरला. त्यासाठीं मोठा रंगमंडप उभारला गेला. हजारों प्रेक्षकगण जमा झाले. सगळें राजमंडळ तो सामना पहाण्यासाठीं उत्सुकतेनें आलें.

जीमूत आखाड्यांत उतरतांच बल्लवानें दंड थोपटून त्याच्यावर झडप घातली. बरेच दिवसांत त्याच्या पराक्रमाला भक्ष्य मिळालें नव्हतें म्हणून तो उतावळा झाला होता. क्षणांत ते दोघे एकमेकांना भिडले अन् पेंच घालूं लागले. चार घटका तुंबळ झुंज झाली. त्यांच्या दणदणाटानें प्रेक्षकांचीं हृदयें हादरलीं. हांकांनीं नभोमंडळ दुमदुमलें. थोडा वेळ त्याला असा खेळवून आपलें मल्लविद्येंतलें लाघव प्रेक्षकांना दाखवून बल्लवानें जीमूताला निकालांत काढायचें ठरविलें. चटकन् त्याची तंगडी धरून त्यानें त्याला शंभर वेळां ' गिरगिरगाऱ्या ' केलें अन् दाणदिशीं जमिनीवर आदळलें. जीमूताचा देह धरणीवर पडला आणि प्राण अंतराळांत पसार झाले !

विराटानें हर्षनिर्भर होऊन टाळी पिटली. बल्लवावर देणग्यांचा वर्षाव केला. नंतर त्याला बल्लवाची झुंज पहाण्याची चटकच लागली. कोणी कुस्तीगीर त्याच्यापुढें उभा राहीना म्हणून तो वाघ, सिंह अन् हत्ती यांच्याशींच बल्लवाला झुंजवूं लागला. सैरंध्री बिचारी तो प्रकार पाहून मनांत कष्टी होई आणि ' कर्म बाळिवंत ' म्हणून अदृष्टाला हात लावी.

येणेंप्रमाणें दहा महिने सुखरूपपणें पार पडले. आणखी दोन महिन्यांनीं पांडव अज्ञातवासाच्या दिव्यांतून उजळमाथ्यानें बाहेर येणार होते. प्रतिज्ञेचा पैलपार गांठणार होते ; पण तेवढ्या अवधींत त्यांच्यावर अरिष्टांचा महापूर घोंघावला. पहिलें अरिष्ट आलें तें कीचकाच्या रूपानें ! कीचक हा सुदेष्णेचा भाऊ. विराटानें त्याला सेनापति केलें होतें. स्वतःच्या आणि शंभर अनुकीचकांच्या बळावर तो राज्यांत मन मानेल तसा धुडगूस घालीत होता. बळाचा सागर, उन्मत्तांचा राजा, चावटांचा शिरोमणि आणि वृत्तीचा डंखी भुजंग असा तो होता.

एक दिवस सैरंध्री संध्याकाळीं सुदेष्णेची वेणीफणी करीत असतांना त्याच्या नजरेस पडली. तिची रूपसंपदा पाहून तो बेहोष झाला. तो आपल्या

बहिणीजवळ तिच्या लावण्याचें निर्लज्जपणें वर्णन करूं लागला. अशा सौंदर्यसम्राज्ञीला आपल्या दृष्टीस पडूं न देतां तूं सेवेंत राबविलेंस म्हणून राणीला दोष देऊं लागला. सैरंध्रीला तें सहन न होऊन ती आपल्या महालांत निघून गेली. 'हें नारीरत्न आपल्याला मिळालेंच पाहिजे!' असें सुदेष्णेला बजावून तो तिथून उठला. वाड्यांतून बाहेर पडायच्या आधीं तो सैरंध्रीच्या महालांत जायला कचरला नाहीं. त्या धटिंगणाचें महालांत पाऊल पडतांच सैरंध्रीच्या कपाळावर आंठ्या चढल्या.

"सैरंध्री! हीं दासीपणाचीं हलकीं कामें करण्यासाठीं तुझा जन्म नाहीं. तूं माझी हो! मी तुला दास्यांतून मोकळी करीन. सत्तेच्या अन् वैभवाच्या शिखरावर चढवीन. माझ्या हृदयांत कामाचा वणवा पेटला आहे. तूं आपल्या प्रेमजलानें तो विझव कीं हा कीचक तुझा दासानुदास आहे!......"

कीचकाचे हे ओंगळवाणे बोल ऐकून सैरंध्रीचें सर्वांग शहारलें. तिनें त्याला खणखणीत बजावलें.

"माझ्या वाटेला जाऊं नको. तसें केलेंस तर प्राणांनीं उत्तीर्ण व्हावें लागेल! मी तुला वाटतें तशी अनाथ नाहीं. माझे पांच गंधर्वपति अष्टौप्रहर माझा सांभाळ करीत आहेत. वनराजाच्या वीरभागाकडे कोल्ह्यानें आशाळभूतपणें पाहूं नये. गगनींचें तेजाळ सूर्यबिंब मानवाच्या हातीं चढत नसतें हें लक्षांत ठेव! जा; अतिप्रसंग करून फुकट मरूं नको!"

कीचक निघून गेला; पण तेवढ्यावर तें प्रकरण संपलें नाहीं. सुदेष्णा राणी आतां भावाला सामील झाली होती. तिनें सूर्यास्त झाल्यावर सैरंध्रीला आज्ञा केली कीं, 'आत्तांच्या आत्तां कीचकाच्या घरीं जाऊन मद्य घेऊन ये!'

अशा भलत्या वेळीं एकटीला कीचकाच्या घरीं न पाठविण्याबद्दल तिनें सुदेष्णेची डोळ्यांत पाणी आणून विनवणी केली; पण राणीनें आपला हेका सोडला नाहीं. 'नसता कांगावा करूं नको. मला मद्याची तहान लागली आहे. ताबडतोब तूं तें आणलें पाहिजेस. कीचक म्हणजे कोणी वाघ नाहीं कीं, तूं दृष्टीस पडतांच झडप घालून तुला गट्ट करील!'

निरुपाय होऊन सैरंध्री मद्यपात्र घेऊन निघाली. पारतंत्र्यापेक्षां नरक बरा, असें तिला वाटलें. तिनें आपल्या रक्षणाचा भार द्वारकेच्या दीनबंधूवर टाकला. मार्गी चालत असतांना ती सूर्याचें स्तोत्र म्हणूं लागली. बांका प्रसंग जाणून

सूर्यानें एक राक्षस गुप्तरूपानें तिच्या पाठीशीं धाडला. कीचकाच्या घरीं पोंचल्यावर दारांत उभी राहून तिनें सुदेष्णेसाठीं मद्य मागितलें. कीचक पुढें होऊन म्हणाला, 'सुदेष्णेजवळ शेंकडों दासी पडलेल्या आहेत. त्यांच्यापैकीं कोणी तरी हें काम करील. तूं आंत ये अन् माझी गृहस्वामिनी होऊन मला धन्य कर!'

## कीचकाची प्रेमयाचना

देखे दुरूनी खळ भव्य रामा
आली म्हणे दिव्य मनोभिरामा
उठोनियां कुश्चळ अंगनाहो
म्हणे 'प्रिये तूं मम अंगना हो १

पाहावया नेत्र तुला भिकारी
मी दास आतां मज अंगिकारीं
घालीं निजांगीं नग फार शाला
नेसें चिरा टाकिं असें कशाला ! २

समग्रही वैभव मद्गृहींचें
भोगीं सुखें ; वाक्य दुराग्रहीचें
टाकोनियां ये मम आसनाशीं
होऊं नको हो मम आसनाशी ३

जोडा तुझा योग्य मला विधीनें
निर्माण केला गुणवारिधीनें
आतां मनीं संशय व्यर्थ सांगे
धरूं नको हेतु यथार्थ सांगे ४

तुझ्या प्राप्त होतांचि दंतच्छदासी
गृहींच्या वधू सर्वही तुच्छ दासी
मला तेधवां टाक गे ! संगये तूं
पती मीच जाणोनि सारांश ये तूं ' ५

संपूर्ण चंद्र काळिंसा चमके नभीं ते
तैशी सती द्रुपदि देखुनियां उभी ते
' ये मंचकीं ' म्हणुनि सन्निध हात नेला
तेव्हां वदे द्रुपदि ' भोगिसि यातनेला ६

जरि असे हरिची वधु एकटी
परम सुंदर दिव्य कृशा कटी
वरिल जंबुक चावट काय रे ?
वदसि धिक् प्रसवे तुझि माय रे ! ७

सत्त्वानिमित्त जरि या महिं मान गेली
माझी तथापि सहसा महिमा न गेली
या व्यापिलें मज असे खळ दुर्गतीनें
ऐसें वदोनि धरिला पण मार्ग तीनें ८

मृगी जशी डाबलि पारधीतें
पळे त्वरें तेविं अपारधी ते
धरी त्वरें तो खळ अंचळातें
निष्टोनि गेली सति चंचळा तें ९

जावें पतींसमिप ते तंव गुप्त भेषी
याकारणें त्वरित ये नृपतीसभेसी
जेथें स्वधर्म बसला नर विक्रमी रे
वेगें करूनि सति तें स्थळ आक्रमी रे १०

तों धांवला खळ जवेंकरुनी धराया
राया ! पितामहि तुझी जग उद्धराया
जे जन्मली महितळीं, तिजला कसा रे
सारे जनीं निरखिलाच कृतांतसा रे ! ११

कच धरुनि सतीतें लोळवीलें धरा या
तरिहि नृपति कोणी हात त्याचा धराया
सहजहि उठला ना ; मत्स्य ही स्तब्ध मानें
म्हणति ' कठिण केलें कर्म या आधमानें ' १२

कच धरुनि कुचा जों स्पर्शणारा कुचाळी
रविदुत तंव वेगें हस्तघातें कुचाळी
अदळुनि घडला त्या या महीपात कीं रे
वमित रगत सारें या मही पातकी रे ! १३

पाहूनी बहु लाजला नृपतिची सारी सभामंडळी
झाली सावध तो खळी मदबळी जो भ्रष्ट भूमंडळी
तेव्हां सर्व तटस्थ हस्तकमळें जोडोनि रायाकडे
मंत्रीआदि समग्रही निरखिती कोणी नये याकडे १४

— वामनपंडितकृत विराटपर्व, अ. ३

सैरंध्री तिथून पळाली ती राजसभेकडे आली. पाठोपाठ कीचकहि धांवला. राजसभेच्या दारांत कीचकानें तिला पकडलें. तो अधम तिचा पदर ओढणार एवढ्यांत सूर्याच्या दूतानें त्याला तडाखा मारला. वृक्ष उन्मळून पडावा तसा कीचक उताणा आदळला. बल्लव तिथें होता. त्याला वाटलें कीं, आत्तांच याच्या छाताडावर बसून याचा गळा दाबावा. करकरां दांत खाऊन तो उठलाहि; पण धर्मानें नेत्रसंकेत करून त्याला आंवरलें. बल्लवाला आपला क्रोध जिरवणें भाग पडलें.

सैरंध्रीनें विराटाला सवाल टाकला कीं, 'राजा, तुझ्या राज्यांत न्याय आणि धर्म शिल्लक आहे का?' पण विराटानें तोंड उघडलें नाहीं. कंकरूपी धर्मानें मग तिची समजूत काढली अन् तिला सुदेष्णेकडे पाठवून दिलें.

## कीचकवध

सैरंध्री आपल्या मंदिरांत आली. चांडाळाचा स्पर्श झाला म्हणून तिनें सचैल स्नान केलें. रात्रीं अंथरुणावर अंग टाकलें तरी तिला झोंप येईना. अपमानाच्या सहस्र इंगळ्या तिला डंखूं लागल्या. मध्यरात्र उलटल्यावर ती उठली अन् तशा काळोखांत पाकगृहाकडे निघाली. बल्लव तिथें झोंपला होता. त्याला उठवून तिनें म्हटलें,

"डोळ्यांदेखत बायकोची दुर्दशा झाली असतां तुम्हांला गाढ झोंप कशी लागते? मला वाटलें होतें कीं, माझी सासू वीरपुत्रांना प्रसवली आहे; पण अनुभवानें तें खोटें ठरलें. तुम्ही नुसतेच दिखाऊ ढब्बू! धिक्कार असो तुमच्या पुरुषपणाला!—"

अन् मग ती स्फुंदस्फुंदून रडूं लागली. अश्रूंनीं तिनें आपला पदर भिजाविला. भीमाचें हृदय द्रवलें. त्यानें तिला जवळ घेतली आणि 'कीचकाला ठार करण्याचें तिला वचन दिलें. 'उद्यां सूर्यास्त झाल्यावर नृत्यशाळेंत भेटण्याचा तूं त्याच्याशीं संकेत कर; पुढचें मी पाहून घेतों!' असें सांगून बल्लवानें तिला परत पाठाविलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो लोचट पुनश्च तिच्याकडे आलाच. सैरंध्रीनें रात्रीं ठरल्याप्रमाणें त्याला नृत्यशाळेंत बोलाविलें. तो हरखून आपल्या घरीं आला. दिवस कधीं संपतो अन् रात्र कधीं पडते असें त्याला झालें. लवकर अस्ताला

जात नाहीं म्हणून तो सूर्याला शिव्या मोजूं लागला. अखेर त्याची काळरात्र आली. सैरंध्रीला आपली भुलावण पडली पाहिजे म्हणून त्यानें अलंकारांचें ओझें अंगावर चढवलें. नृत्यशाळेंत पाय ठेवतांना त्याचा जीव नुसता फुलून गेला होता.

नृत्यशाळा रिकामी होती. आजूबाजूलाहि शुकशुकाट होता. अंधारांत डोळे ताणून पाहिल्यावर कीचकाला अस्पष्टसें दिसलें कीं, मंचकावर कोणी तरी झोंपलें आहे. ती सैरंध्रीच असावी असें त्याला वाटलें. वाघानें आमिषावर झडप घालावी तसें त्यानें त्या निजलेल्या व्यक्तीला कवळिलें. त्याच क्षणीं बल्लवानें मानगुटी पकडली तेव्हां त्याचा भ्रमनिरास झाला. त्याचे शृंगारिक मधुर शब्द आंतल्या आंत दबले. तो स्वतःला सोडवून घेण्याचा प्रयत्न करूं लागला; पण भीमाचे करपाश अधिकच आवळले गेले. भीमानें त्याला धबाधब आदळलें. वज्रमुष्टींचे ठोसे लगावून लगावून त्याचें सर्वांग काळें-निळें केलें. थोड्याच वेळांत भीमाच्या पाशांतून सुटून तो यमाच्या पाशात अडकला. आपल्या शत्रूचा असा निःपात करून भीम गुपचूपपणें तिथून बाहेर पडला अन् आपल्या नोकरीवर रुजू झाला.

सैरंध्री तिथें लपून राहिलेली होतीच. भीम निघून गेल्यावर तिनें 'कीचक मेला!... गंधर्वांनीं त्याला मारलं!' असा ओरडा केला. चित्रशाळेचे रक्षक जमा झाले. पाठोपाठ अनुकीचकहि तिकडे धांवले. चुडण्या पेटवून त्यांनीं ती कीचकाच्या मांसाची मोट पाहिली. आपला नायक गेला म्हणून त्यांना फार दुःख झालें. ते त्याला दहनभूमीकडे घेऊन निघाले, एवढ्यांत सैरंध्री त्यांच्या नजरेस पडली.

"पकडा रे हिला! हिच्यासाठींच आपला नायक मेला. त्याच्याबरोबर हिलाहि जाळूं या. इहलोकीं नाहीं तर स्वर्गांत तरी हिचा उपभोग त्याला मिळूं दे!" एकजण म्हणाला. बाकीच्या आडमुठ्यांना त्याचें बोलणें पसंत पडलें. त्यांनीं सैरंध्रीला बांधून प्रेताबरोबर चालविलें. 'द्वारकेच्या दीनबंधो, धांव! गंधर्वपतींनो, त्वरा करा अन् मला सोडवा!' असा तिनें आक्रोश मांडला.

भीमाच्या काना ती हांक आदळली. क्षणाचीहि उसंत न घेतां तो स्मशानाकडे धांवला. अनुकीचक दृष्टीला पडतांच त्यानें एक वृक्ष उपटून हातांत घेतला. एक प्रळय हांक फोडली. अनुकीचकांचें धाबें दणाणलें. 'आला

रे आला ! सैरंध्रीचा गंधर्व आला !' म्हणून ते पळवाटा शोधूं लागले. भीम त्यांना झोडपीत सुटला. मातीचे घडे फुटावे तसे ते सर्व अनुकीचक फुटून तुटून भुईसपाट झाले. सैरंध्रीला सोडवून घेऊन भीम राजवाड्यांत आला.

विराटावर घनचक्र कोसळलें. कीचक–अनुकीचक मेल्यामुळें त्याचें सैन्यबळच खची झालें. तो अंतःपुरांत येऊन राणीला म्हणाला, ' तूं सैरंध्रीला वाड्यांतून काढून लाव ! तिच्यामुळें हा अनर्थ घडला. ती आपल्या राज्यांत राहिली तर आणखी काय काय उत्पात होतील तें सांगवत नाहीं. '

सुदेष्णेनें तिला तसें सांगितलें. सैरंध्रीपुढें आणखी एक संकट उभें ठाकलें. तिनें सुदेष्णेची विनवणी केली, ' महादेवि ! आणखी तेरा दिवस मी इथें राहतें. त्याउपर माझे गंधर्वपति मला इथून घेऊन जातील. केल्या उपकारां-बद्दल तुमचे ऋणी राहातील आणि अडल्यापडल्या वेळीं ते तुम्हांला साहाय्य करतील. ' सुदेष्णेनें ही तिची विनंति मान्य केली.

## गोग्रहण

पांडव अज्ञातवासांत गेल्यापासून कौरवांनीं देशोदेशीं हेर पाठवून त्यांना उघडकीस आणण्याचा उद्योग चालविला होता. कारण, वर्ष भरण्याच्या आंत पांडव उघड झाले असते तर आणखी बारा वर्षे वनवास त्यांच्या कपाळीं येणार होता आणि कौरवांना तेवढा काळ निर्वेध राज्यभोग मिळणार होता. कौरवांचे हेर अनेक पुरेंपट्टणें हिंडले ; पण त्यांना पांडवांचा तपास लागला नाहीं. शेवटीं एक हेर हस्तिनापुरांत आला. त्यानें मात्र विराटनगरींतल्या ताज्या घडामोडींची वार्ता कौरवेश्वराला निवेदन केली.

त्या बातमीनें कौरवांच्या विचाराला चालना मिळाली. कीचक आणि जीमूत यांना लोळविणारी व्यक्ति भीमच असली पाहिजे अन् भीम जर विराटाच्या राज्यांत असला तर बाकीचे पांडवहि तिथेंच असले पाहिजेत असें त्यांनीं अनुमान बांधिलें.

पुढें काय करावें हें ठरविण्यासाठीं त्यांची बैठक भरली. त्या बैठकींत त्रिगर्ता-धिपति सुशर्माहि होता. विराटानें कीचकांच्या बळावर त्याला जेरीस आणलें होतें, त्यामुळें तो विराटाची डूग धरून राहिला होता. ' या वेळीं विराटावर

हल्ला चढवून त्याचीं गायींचीं खिल्लारें पळवावीं म्हणजे तो युद्धाला उभा राहील. अर्थात् पांडव तिथें असले तर तेहि अशा वेळीं स्वस्थ बसणार नाहींत. ते एकदां रणभूमीवर आले कीं त्यांना सहज ओळखतां येईल.' अशी त्यानें कौरवांना सल्ला दिली. त्यांना ती एकदम पटली. सैन्याचे दोन भाग करून दक्षिण आणि उत्तर अशा दोन्ही दिशांनीं हल्ला चढवावा असें ठरलें. सुशर्म्यानें अर्धे सैन्य घेऊन आदल्या दिवशीं दक्षिणेला धडक मारावी अन् दुसऱ्या दिवशीं कौरवांनीं उत्तरेकडून दणका द्यावा अशी योजना आंखली गेली.

सुशर्म्यानें ठरल्याप्रमाणें केलें. दक्षिणेकडचे खिल्लारी त्रिगर्तांनीं गायी पळविल्या म्हणून आक्रोश करीतच विराटाकडे आले. विराटाला तें सहन झालें नाहींच. त्यानें दळभार सज्ज केला. बृहन्नडा वगळून कंक, बल्लव वगैरे गुप्त पांडवांना बरोबर घेतलें. एका घटकेंत विराटसैन्य त्रिगर्तांच्या पाठीला भिडलें. उभयदळीं संकुल रण माजलें. सुशर्म्यानें खुद्द विराटाशीं गांठ घातली. इतक्यांत सूर्यानें पश्चिमसागरांत बुडी मारली. सृष्टीनें काळी कांबळ पांघरली. तशा त्या अंधारांत सुशर्म्यानें विराटाला पकडलें. त्याला आपल्या रथांत घालून 'चला रे माघारे!' म्हणून त्यानें सैन्याला फर्माविलें.

राजा पकडला गेल्यामुळें विराटसैन्याचा धीर खचला. शिस्त मोडली. पायदळ परागंदा होऊं लागलें. कंकाला तें पहावेना. 'आपल्या अन्नदात्याला सोडव!' म्हणून त्यानें बल्लवाला आज्ञा केली. बल्लवानें गदा झेलली. थोड्याच वेळांत देखावा पालटला. विराट बद्ध होता तो मोकळा होऊन सुशर्मा बांधला गेला. विराटाला जयश्रीनें माळ घातली. त्यानें कंक-बल्लवांचें गौरव केलें. सुशर्म्याला नाकदुऱ्या काढायला लावून सोडून दिलें.

विराटाला जय मिळाला; पण तो रणांगणावरून परतण्यापूर्वीच इकडे उत्तरेच्या बाजूनें भीष्मद्रोणांसह कौरवांची चढाई झाली. ते तिकडच्या गायींचे कळप नेऊं लागले. गोपाध्यक्ष वर्तमान कळवायला येतो तों विराट राजा राज्यांत नाहीं! त्याचा मुलगा उत्तर नांवाचा होता त्यालाच त्यानें वस्तुस्थिति सांगितली.

उत्तर म्हणजे एक बायक्या तरुण होता. सदैव अंतःपुरांत असायचा अन बायकांत वावरायचा. हातून कांहीं व्हायचें नाहीं; पण बडबड मात्र

फार ! तो त्या गोपाध्यक्षाला म्हणाला, 'काय करूं रे, मला कोणी सारथी नाहीं. नाहीं तर त्या कौरवांचा कांटाच काढला असता ! आमच्या गायी पळवतात म्हणजे काय ? चोर लेकाचे !' हें बोलत असतांना तो जाग्यावरून तसूंभरसुद्धां हालला नाहीं.

सैरंध्रीला त्याची ती वल्गना ऐकवली नाहीं. ती म्हणाली कीं, 'बृहन्नडा उत्तम सारथी आहे. तिला घे अन् कौरवांवर झेप घाल !' लाजेकाजेसाठीं तरी त्याला तसें करणें भाग पडलें. बृहन्नडेनें रथ हांकारला. कौरवसैन्य दृष्टीच्या टप्प्यांत आलें. तो अचाट उचंबळलेला दळभार पाहून उत्तराची छाती दडपली. तो म्हणाला,

'बृहन्नडे, माझा बसल्याजागींच प्राण जाईलसा वाटतो. तूं रथ माघारा वळव ! मला एकदां अंतःपुरांत नेऊन घाल ! कौरव नेऊन नेऊन गायीच नेतील ना ? सगळ्या नेऊं देत. खुशाल नेऊं देत. जगलों-वांचलों तर हव्या तेवढ्या गायी मिळवीन !'

बृहन्नडा म्हणाली, "तूं क्षत्रिय आहेस का कोण आहेस ? शरम वाटत नाहीं असें बोलायला !"

पण तिचें वाक्य पुरें होण्याच्या आंतच त्यानें रथाखालीं उडी घेऊन धूम ठोकली. बृहन्नडेनें पाठलाग करून त्याचा बुचडा पकडला. तो तिच्या गयावया करूं लागला. तिनें त्याला म्हटलें, 'तुझ्या हातून जर युद्ध होत नसेल तर तूं माझा सारथी हो. मी लढतें या कौरवांशीं !' निरुपायानें त्यानें तें कबूल केलें. दोघे जागा पालटून रथांत बसले. बृहन्नडेनें रथ शमीच्या झाडाकडे वळवायला सांगितलें. तिथें आल्यावर तिनें उत्तराला शमीवर चढवून वरचीं शस्त्रें आणि धनुष्यबाण खालीं काढायला लावलें. गांडीव हातांत मिळतांच आपण अर्जुन असल्याचें त्यानें उत्तराला कळविलें.

लगेच त्याचा रथ कौरवसेनेवर वळंघला. अर्जुनाची धडाडी पाहून कौरव घाबरले. 'अरे हा अर्जुन !' द्रोण म्हणाला. दुर्योधनानें हर्षानें टाळी पिटली ! 'अज्ञातवास पुरा होण्याच्या आंत अर्जुन प्रगट झाला. आतां पुन्हां बारा वर्षें वनवास भोगायला पाठवितों सगळ्या पांडवांना !' तो गरजला ; पण भीष्मानें दिवसांचें गणित करून सांगितलें कीं, 'पांडवांचा अज्ञातवास

पुरा होऊन बारा दिवस अधिक झाले आहेत !' तें ऐकतांच दुर्योधनाच्या आनंदावर विजरण पडलें.

पण त्या गोष्टीवर भवति न भवति करायला अर्जुनानें त्यांना सवड दिली नाहीं. अर्जुनाच्या शरवर्षावाला तोंड देणें त्यांना भाग पडलें. थोड्याच वेळांत युद्धाला रंग भरला. अर्जुन एकटा; पण त्यानें त्या दिवशीं ख्याति केली. कौरवांचें अतोनात नुकसान झालें आणि त्यांना पराजय घेऊन पळून जावें लागलें.

परत राजधानीला येतांना अर्जुनानें पुनश्च बृहन्नडेचा वेष धारण केला. उत्तराला रथीच्या जागीं बसविलें आणि मगच रथ नगरांत आणला.

पण त्याच्या आधींच विराट नगरांत आला होता. उत्तर कौरवांवर चालून गेला आहे हें समजतांच त्याला मुलाविषयीं अभिमान वाटला होता. ती बृहन्नडा त्याला कसलें साह्य करणार म्हणून त्याला काळजीहि वाटली होती. ही सगळी परिस्थिति लक्षांत घेऊन त्यानें आपल्या सैन्याला 'उत्तरेकडे ताबडतोब कूच करा !' असा हुकूम दिला होता. त्यावर कंकानें म्हटलें होतें,

"राजा, तूं मुळींच चिंता करूं नको. बृहन्नडा सारथी आहे म्हणजे उत्तराला जय मिळायचाच !"

तें बोलणें विराटाला मानवलें नव्हतें. आपल्या पुत्राचा पुरुषार्थ वाखाणायचा सोडून हा कंकभट त्या नपुंसकाची प्रशंसा करतो हा त्याला अपमान वाटला होता. त्यानें पुनश्च असे शब्द तोंडावाटें न उच्चारण्याबद्दल त्याला बजावलें होतें; पण कंकानें आपला आग्रह सोडला नव्हता आणि त्यामुळें क्रोधाचा आवेश येऊन विराटानें हातांतला फांसा कंकाच्या डोक्यावर मारला होता. त्यामुळें कंकाच्या डोक्यांतून रक्ताची धार सुरू झाली होती. सैरंध्री तिथें होती. तिनें चटकन् पुढें होऊन तें रक्त जमिनीवर पडूं न देतां एका भांड्यांत धरलें होतें.

हा दारुण प्रसंग चालू असतांनाच उत्तरानें सभागृहांत पाय ठेवला. कंकाचें रक्तरंजित तोंड पाहून उत्तर घाबरला. त्यानें 'काय प्रकार आहे ?' म्हणून बापाला विचारलें. त्यानें सगळी हकीकत सांगितली. त्यावर उत्तर म्हणाला,

" महाराज ! कंकभटजींचें बोलणें सर्वथैव योग्य आहे. कौरवांना खडे चारले ते एकट्या बृहन्नडेनेंच ! माझा त्यांत तसूंभरहि पराक्रम नाहीं. बृहन्नडा होती म्हणून बाबा, तुम्हांला उत्तर जिवंत दिसला ! कंकभटजींची तुम्ही क्षमा मागा ! त्यांना प्रसन्न करा ! ! "

मुलाचें हृदय पिळवटून निघालेले ते उद्गार ऐकून विराटाला पश्चात्ताप झाला. त्यानें कंकाची मनोभावें क्षमा मागितली. अशा रीतीनें तो प्रसंग पार पडला. विराटाला दोन्ही बाजूंनीं विजय मिळाला. नगरांत विजयोत्सव साजरा झाला.

त्यानंतर तीन दिवसांनीं पांडव निजरूपानें प्रगट झाले. त्यांना पाहून विराटाला अत्यानंद झाला. ' अजाणतां मी वर्षभर तुमच्याकडून हलकीं-सलकीं कामें करून घेतलीं ' म्हणून त्यानें पांडवांजवळ अनुताप व्यक्त केला. ' तुझ्या राज्यांत आम्हांला सुरक्षित आसरा मिळाला ' म्हणून धर्मानें त्याचे आभार मानले !

नंतर विराटानें आपली कन्या उत्तरा अर्जुनाला देण्याचा मनोदय व्यक्त केला. अर्जुन म्हणाला कीं, ' एक वर्षभर मीं कन्येप्रमाणें अंतःपुरांत तिला सांभाळली आहे. गुरु या भावनेनें ती माझ्याकडे पहाते. तेव्हां तिचें मीं पाणिग्रहण करणें योग्य नव्हे. माझा अभिमन्यु तिला साजेसा वर आहे. उत्तरा त्याची भार्या होऊं दे ! '

विराटाला ती गोष्ट मानवली. त्यानें द्वारकेंत श्रीकृष्णाला तसें पत्र लिहिलें. तो सुभद्रा आणि अभिमन्यु यांना घेऊन मत्स्य देशांत आला. विराट आणि धर्म त्याला सामोरे गेले. सुमुहूर्त पाहून उभयतांचें लग्न लागलें. चार दिवस सोहोळयांचा थाटमाट झाला. सुभद्रा, द्रौपदी अन् रुक्मिणी मुख्य वऱ्हाडिणी म्हणून मिरवल्या. सुदेष्णेनें विहिणींचे यथासांग उपचार केले. विराटानें अपार धन आणि आंदण जांवयाला दिलें. नंतर पांडव तिथून जवळच असलेल्या उपप्लव्य नगरांत मुक्काम करून राहिले.

---

# उद्योगपर्व

उपप्लव्य नगरात पांडव आणि त्यांचे पक्षपाती यांची एक मोठी सभा भरली. पांडवांनीं पुढें काय करावें याची चर्चा सुरू झाली. कोणी म्हणाले, पांडवांनीं सरळ रणशिंग फुंकावें. कोणी म्हणाले, कौरवांशीं सामोपचाराचा तह करून पुढील अनर्थ टाळावा. कोणाचें मत पडलें कीं, राज्याचे दोन भाग करून ते कौरव-पांडवांनीं वांटून घ्यावे आणि मैत्रीनें रहावें. द्रौपदीनें मात्र साफ सांगितलें कीं, ' कौरवांशीं प्राणांतींहि साम करणें नाहीं ! ' भीमहि तिच्याच मतावर गेला.

सरतेशेवटीं त्या सभेंत ठरलें तें असें :—

पांडवांनीं युद्धाची तयारी करावी. देशोदेशींच्या राजांना पत्रें पाठवून युद्धांत आपल्याला साह्य करण्याबद्दल विनंति करावी. पांचाळांच्या पुरोहितानें हस्तिनापुरांत जाऊन कौरवांचें मनोगत काय आहे तें जाणून घ्यावें. कौरव अजूनहि कारस्थानेंच करणार असतील तर त्यांचा रणभूमीवर पुरता समाचार घेणेंच वाजवी ठरेल ; पण त्यांचें मन निवळलें असलें तर उभयतांच्या सद्विचारानें राज्याचा प्रश्न मिटवावा.

धर्माचीं आमंत्रणपत्रें घेऊन राजदूत देशोदेशीं रवाना झाले. इकडे दुर्योधनानेंहि तोच उद्योग आरंभिला. त्या काळीं यादवसैन्य हें अतुर्बळी म्हणून गणलें जात होतें. तें ज्याच्या पक्षाला जाईल त्याला हमखास विजय मिळायचा. दुर्योधनानें विचार केला कीं, पांडवांच्या आधीं आपण द्वारकेंत जाऊन तें हस्तगत करावें.

तो सत्वर द्वारकेंत आला. त्या वेळीं श्रीहरि सुखशयनावर निद्रा करीत होता. दुर्योधन महालांत गेला अन् कृष्णाला जाग येईपर्यंत आपण कुठें बसावें याचा विचार करूं लागला. या गवळ्याच्या पायगतीं बसणें हें आपल्यासारख्या सम्राटाला शोभणार नाहीं असें ठरवून तो त्याच्या उशागतीं बसला. पाठोपाठ अर्जुनहि त्याच कामासाठीं तिथें आला. दुर्योधनानें देवाच्या पायांकडची जागा आपल्याला रिकामी ठेवली म्हणून त्यानें मनोमन त्याचे उपकार मानले. तिथें बसून भगवंताचीं रातोत्पलांसारखीं तीं कोंवळीं आरक्त पावलें तो हळूहळू चेपूं लागला.

त्यासरशीं तो करुणासागर जागा झाला. त्यानें अर्जुनाकडे पाहून विचारलें, ' मित्रा केव्हां रे आलास ? '

अर्जुन बोलला, ' आत्तांच आलों देवा ! तुला युद्धाचें आमंत्रण द्यायला आलों आहें ! '

त्यासरशीं दुर्योधन पुढें होऊन म्हणाला, ' कृष्णा ! अर्जुनाच्या आधीं मी त्याच कामासाठीं आलों आहें. माझा मान पहिला आहे ! ' त्यावर देवानें तोड काढली.

" हें पहा, तूं आधीं आलास अन् मीं अर्जुनाला आधीं पाहिलें. तेव्हां तुम्हां दोघांचीहि इच्छा पूर्ण करणें मला भाग आहे. या युद्धांत मी लढणार नाहीं. फक्त ' गोष्टी सांगेन युक्तिच्या चार ! ' तेव्हां मी हा एक भाग अन् माझें सगळें यादवसैन्य हा दुसरा भाग. या दोहोंपैकीं जो हवा असेल तो त्यानें मागावा. अर्जुनाचा मान मात्र आधीं ! "

" भक्तकामकल्पद्रुमा ! मला तूं हवास ! " अर्जुनानें क्षणाचाहि विलंब न लावतां मागितलें.

दुर्योधन मनांत म्हणाला, ' बरी पीडा गेली. शस्त्र हातीं न धरणाऱ्या कृष्णाला घेऊन जायला माझ्या घरीं कांहीं लग्नाची जेवणावळ नाहीं ! मला हवें होतें तें यादवसैन्य अन् तें अर्जुनाच्या मूर्खपणामुळें अनायासें माझ्या पदरांत पडलें ! '

यादवसैन्य संगें घेऊन दुर्योधन हस्तिनापुरांत आला. श्रीकृष्ण अर्जुनाच्या रथांत बसून पांडवांकडे गेला. मद्रदेशाधिपति शल्य हा माद्रीचा भाऊ म्हणजे पांडवांचा मामा. त्यालाहि पांडवांकडून युद्धाचें आमंत्रण गेलें होतें आणि तो अपार दळ घेऊन उपप्लव्य नगराकडे निघाला होता. दुर्योधनाला ही बातमी कळली. शल्यासारखा धुरेचा मोहरा शक्य तर आपल्या बाजूला ओढला पाहिजे म्हणून त्यानें एक कपट रचलें. वाटेंत जिथें जिथें त्याच्या सैन्याचा मुक्काम होईल तिथें तिथें त्यानें आपल्या नोकरांकरवीं त्याची उत्तम व्यवस्था ठेविली. दुर्योधन गुप्तपणें पण जातीनें उपस्थित राहून हें सगळें करीत होता. पांडवांच्याकडूनच ही सगळी सरबराई होत आहे अशी शल्याची समजूत होती. शेवटच्या मुक्कामावर त्यानें आपल्या प्रधानाला

सांगितलें की, ' आमचा प्रवास सुखावह करणारा हा कोण व्यवस्थापक असेल त्याला माझ्यापुढें घेऊन या. मी त्याला बक्षीस देणार आहें ! '

या राजाज्ञेप्रमाणें त्याच्यापुढें उभा राहिला तो दुर्योधन ! शल्यानें त्याला ' काय हवें तें माग ! ' असें म्हटलें.

दुर्योधन नम्रवाणीनें म्हणाला, ' महाराज, तुम्ही ससैन्य माझ्या पक्षाला येऊन मिळावें ! ' शल्याला तें कबूल करणें भाग पडलें. दुर्योधनानें हा डाव जिंकला. शल्यानें धर्माला तसें कळविलें. धर्मानें त्याला भेटून एवढेंच सांगितलें की, ' झाल्या गोष्टीला उपाय नाहीं. तुम्ही आपलें वचन मोडूं नका. माझें मागणें फक्त एवढेंच आहे कीं, पुढें कर्णार्जुनांचें समर होईल त्या वेळीं तुम्ही त्याचें सारथ्य स्वीकारून त्याचा तेजोभंग करा आणि कुठेंहि असलात तरी कूर्मदृष्टि आमच्यावर राहूं दे ! " शल्यानें ' तथास्तु ' म्हणून हस्तिनापूर गांठलें.

अशा प्रकारें उभय पक्षांनीं सैन्याची जमवाजमव केली. एकंदर अठरा अक्षौहिणी सैन्य उभें राहिलें. कौरवांकडे अकरा अक्षौहिणी अन् पांडवांकडे सात अक्षौहिणी. नंतर पूर्वीं ठरल्याप्रमाणें द्रुपदाचा पुरोहित कौरवांकडे गेला. त्यानें पांडवांच्या बलपराक्रमाची प्रशंसा करून ते तुमच्या मैत्रीची इच्छा करीत आहेत असें सांगितलें; पण ' त्यांच्या मैत्रीला आम्ही कःपदार्थ समजतों. ' असें उत्तर देऊन कौरवांनीं त्याची बोळवण केली. बिचारा द्रुपदपुरोहित वाट वावरून परत आला.

नंतर धृतराष्ट्रानेंहि पांडवांचा अंतस्थ हेतु समजून घेण्यासाठीं संजयाला उपप्लव्यांत धाडलें. धर्मानें त्याचें उत्तम स्वागत केलें. हस्तिनापूरच्या सगळ्या प्रजाजनांचा साद्यंत वृत्तांत त्याला विचारला. राजकारणाचीं सूत्रें हालविणाऱ्या बड्या धेंडांचे विचार समजून घेण्याचीहि इच्छा प्रदर्शित केली. संजयानें त्याला थोडक्यांत मथितार्थ सांगितला.

" भीष्म-द्रोण तुम्हांला अनुकूल आहेत. अर्धें राज्य तुम्हांला देऊन अंतःकलहाचें बीज नष्ट करावें असा त्यांचा विचार आहे; पण त्यांच्या मताला मुळींच किंमत उरलेली नाहीं. आंधळा पुत्रमोहानें पुरता भ्रमला आहे आणि

दुर्योधन तर उतत-मातत चालला आहे. त्याच्या गर्वापुढें मेरु–मांदार ठेंगणे झाले आहेत!"

त्यावर वैकुंठींचा वेल्हाळ म्हणाला,

"संजया, धृतराष्ट्राला माझा निरोप सांग. म्हणावें कीं, सगळें साम्राज्य धर्माच्या पायीं अर्पण कर. मग ते बंधु म्हणून तुम्हांला हस्तिनापूर देतील आणि हें न घडेल तर तुझ्या शतपुत्रांचें मरण जवळ आलें असें समज! पांच पांडव प्रलयानलासारखे पेटतील अन् दुर्योधन, शकुनि, कर्ण यांच्या रक्तानें भूलिंगाला स्नान घडेल!"

संजयानें परत येऊन धृतराष्ट्राला तें निवेदिलें. धृतराष्ट्र भ्याला. तो अस्वस्थ होऊन येरझाऱ्या घालूं लागला. या वेळीं विदुराची सल्ला घेणें योग्य होईल असा विचार करून त्यानें त्याला बोलावणें पाठविलें. निरोपासरसा विदुर आला आणि त्यानें धृतराष्ट्राला चार नीतिधर्माच्या गोष्टी सांगितल्या.

## विदुरनीति

परिस रायां सावधान मृत्युलोका जो आला स्वर्गाहून
कर्मभूमीस पावला जनन ऐक लक्षणें चार त्याचीं १

सात्त्विक ज्ञानी अत्यंत भर सुधारसाहून वाचा मधुर
सेवी कां वैष्णवी दीक्षा मनोहर काया वाचा मनें धरी २

त्रैलोकींचा मदमत्सर सर्वही करून एकत्र
धृतराष्ट्रा तुझा पुत्र दुर्योधन घडिलासे ३

पडिला आहे काळ कोण मज मित्र तरी किती जाण
कोण देश काय वर्तमान नेणे तो मूर्ख जाणावा ४

ज्याचें मन नसे धर्मास तो अति मलिन अविश्वास
त्याचा कोंडे श्वासोच्छ्वास अधर्मी परम रत जो ५

थोर हेंच जाण साधन परललना परधन
येथें ज्याचें उदास मन तोचि धन्य शास्त्र म्हणे ६

आपण न करावें पापाचरण दुसऱ्याचे दोष टाकावे आच्छादून
हें सज्जनांचें लक्षण बहुभाषण कासया ७

सुहृदांसी निष्ठुर देख जाणावा तो आत्मघातक
श्वशुरगृहीं राहे तो शतमूर्ख आपुला पुरुषार्थ वर्णी मुखें ८

विष भक्षून प्रचीत पहावया उरेल कोण सांग राया
आत्महत्या केली शस्त्र खोंचोनियां त्याचें प्रायश्चित कोणीं घ्यावें ९

आपण आचरे सत्कर्म राहटी दुसऱ्याचे गुणदोष नाणी दृष्टि
आत्मरूप पाहे सर्व सृष्टी तरी तो ईश्वर जाणावा १०

घ्यावें वृक्षाचें सुमन परी वृक्ष न उपडावा मुळींहून
नख आगळें काढावें छेदून परी तें बोट रक्षावें ११

दुर्जनसंग तोचि नरक जाण प्रतिपाळावें गुरूचें वचन
करोनि वृद्धांचें सेवन अकार्य पूर्ण त्यागावें १२

दिवसा ऐसें वर्तावें पाहें जेणें रात्री सुखरूप जाये
संसारी ऐसें वर्तावें स्वयें जेणें इहपरत्र सुखरूप १३

कार्य त्वरित हेंच करणें जन्ममरणाचें मूळ छेदणें
क्रियेसमवेत ज्ञान बोलणें मोक्षतरूचें बीज हेंचि १४

धर्म तोच शुद्धपंथ मन शुद्ध तोच शुचिष्मंत
विवेकी तोचि पंडित सर्वभूतीं समदर्शन १५

—श्रीधरकृत पांडवप्रताप, अ. ३७

विदुर असा उपदेश करतो तोंच ब्रह्मपुत्र सनत्सुजात तिथें आला आणि त्यानेंहि धृतराष्ट्राला ज्ञानगोष्टी सांगितल्या. धृतराष्ट्राला उपदेश पटला; पण वठला नाहीं. मनांत ठसलें तें कृतींत उतरविण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं नव्हतें. धृतराष्ट्राची ही दुर्बलता पाहून भीष्मानें दुर्योधनाला चार पथ्यकर शब्द सांगितले:

" दुर्योधना, कृष्णार्जुन हे नरनारायण आहेत. ते भूभार हलका करण्यासाठीं अवतरले आहेत. त्यांच्याशीं वैर बांधूं नको. वंशवन जाळायला कारणीभूत होऊं नको. वेळींच सावध हो! आतां आमचा उपदेश तुला कडू वाटतो; पण अंतकाल ओढवला कीं मग तुला त्याची आठवण होईल!"

कर्णाला भीष्माच्या या बोलण्याचा राग आला. तो मुठी आवळून म्हणाला, ' दुर्योधना, तूं यांच्या बाष्कळ बोलण्याकडे लक्ष देऊं नको! हा म्हातारा कचदिल आहे. क्षात्रधर्म यानें सोडला आहे. पांडवांचें भय तें कसलें! त्यांना रणभूमीवर निजवण्याची कामगिरी माझ्याकडे लागली!'

त्यानंतर भीष्म आणि कर्ण यांच्यामध्यें थोडा वेळ दुश्शब्दांची भालेफेक झाली. कर्णानें भीष्माचें अंतर दुखविलें अन् शेवटीं सांगितलें कीं, 'जोंवर हा म्हातारा जिवंत आहे तोंवर मी शस्त्र धरणार नाहीं!' अशी प्रतिज्ञा करून आणि हातांतलें शस्त्र टाकून कर्ण सभेतून उठून गेला.

## कृष्णशिष्टाई

इकडे उपप्लव्यांत श्रीहरि धर्माला म्हणाला, "मी हस्तिनापुरांत जाऊन सामाचा शेवटचा प्रयत्न करून पहातों. सर्व संदेह फेडून घेतों म्हणजे आपल्यावर बोल येणार नाहीं." धर्मानें 'जशी तुझी इच्छा!' असें म्हटलें. पांचाहि पांडवांनीं कोणत्या अटीवर सलोखा करावा त्यासंबंधीं आपापलीं मतें सांगितलीं. कृष्ण जायला निघाला तशी द्रौपदी पुढें येऊन बोलली,

"भाऊराया! शिष्टाईसाठीं निघालास? जा; पण या माझ्या केसांची अब्रू राख! आज तेरा वर्षें मी त्यांची वेणी घातली नाहीं!" बोलतां बोलतां तिच्या डोळ्यांतून अश्रूंचा अभिषेक होऊं लागला. तिचें हृदयशल्य भगवंतानें जाणलें. तो तिला संबोधून एवढेंच म्हणाला कीं, 'पांचाळी! तुझ्या मनासारखें होईल!'

द्वारकाधीश हस्तिनापुरात येतो आहे ही वार्ता कौरवाना समजली. दुर्योधनानें त्याच्या स्वागताची टोलेजंग तयारी आरंभिली. त्याच्या वाटेंत ठायीं ठायीं शिबिरें उघडलीं. गुढ्या-तोरणांनीं नगर शृंगारिलें. राजमार्गावर चंदन-कस्तूरींचे सडे घातले. राजवाड्यांत डोळे दिपतील अशी रोषणाई केली; पण दुर्योधनाचें हें सगळें औदार्य वरवरचें होतें. हा समारंभ केवळ दिखाऊ होता. त्याचें अंतर कपटी भावनेनें काळवंडलें होतें. कृष्ण राजवाड्यांत आल्यावर त्याला चतुर्भुज करून बंदींत टाकायचा असा त्या चांडाळचौकडीनें गुप्त बेत केला होता.

श्रीरंग हस्तिनापुरांत आला. नगरांतल्या नरनारींनीं त्याचें दर्शन घेऊन डोळ्यांचें पारणें फेडलें. कौरवदळ त्याला सामोरें गेलें. भीष्म-द्रोणांनीं त्याला क्षेमालिंगन दिलें. भगवंतानें थोरांचे आशीर्वाद घेतले आणि लहानांना ते दिले. दुर्योधनानें आपल्या मुद्रेवर हर्षाचे उमाळे दाखविले. 'तुझ्या दर्शनानें धन्य झालों!' असा अभिनय उत्तम वठविला.

सभेंत आणून सुवर्णासनावर त्याला बसविलें. सर्व राजोपचारहि समर्पिले. स्वस्तिक्षेमाच्या गोष्टी झाल्या. स्वागताची सभा विसर्जन पावली. त्याच पावलीं भगवान् विदुराच्या घरीं गेला. तो आलेला पहातांच विदुर सुखाच्या उर्मींनीं उचंबळला. त्यानें श्रीहरीस लोटांगण घातलें. अश्रुजलानें देवाचे पाय धुतले. 'धन्य माझे नयन! धन्य सुदिन!!' म्हणून तो देहभान विसरला. विदुर म्हणजे भगवंताचा एकांत भक्त आणि देवाला अशा भक्तांचें जिवावेगळें कोडकौतुक! ती देवभक्तांची मिठी म्हणजे जिवा-शिवांचें सामरस्य! भक्तिभावाची पूजा घेऊन भगवंतानें विदुराशीं बराच वेळ एकांत केला. तिथेंच त्याला कुंतीहि भेटली. कृष्णाला पहातांच तिच्या हृदयानें ठाव सोडला. अश्रु अनावर झाले. कृष्णानें तिला पांडवांचें कुशल सांगितलें. पुढचे बेतहि कानांवर घातले. तिनें आपल्या मुलांना देवाजवळ निरोप सांगितला, 'तुम्ही माझे पुत्र असाल तर कौरवांशीं विभांडून राज्य घ्या! असला गुळमुळीतपणा नको. जातीच्या क्षत्रियांना तो लज्जास्पद आहे!'

भोजनाची सिद्धता झाल्यावर दुर्योधन कृष्णाला बोलवायला आला. देव म्हणाला कीं, 'मी आज विदुराच्या घरीं जेवणार! पांडव माझे पंचप्राण

आहेत. तुम्ही त्यांचा अहर्निश दुष्टावा करतां. तुमच्या घरीं मला भोजन रुचणार नाहीं! पंचपक्वान्नांचा स्वाद कळणार नाहीं. म्हणून मी येत नाहीं!'

देवाचें हें उत्तर दुर्योधनाला चांगलेंच झोंबलें; पण करतो काय? प्रेमादराचा उसना मुखवटा त्यानें चढविला होता तो अजून काहीं वेळ काढावयाचा नव्हता. त्यामुळें तो मुकाट्यानें निघून गेला. विदुराच्या घरचें साधें अन्न; पण त्याच्यावर अमृताची धार ओतलेली होती. देव भुरके मारून मिटक्या देऊं लागला. सगळ्यांचीं जेवणें आटोपलीं; पण देव आपला ताटच निरपीत राहिला!

पुनश्च धृतराष्ट्राच्या वाड्यांत सभा भरली. भगवंताचें भाषण ऐकण्यासाठीं नारदादि मुनीश्वर सभास्थानीं आले. सगळ्यांनीं आपल्या जिवाचे कान केले. श्रीहरि धृतराष्ट्राला उद्देशून बोलूं लागला,

"राजा, मी इथें शिष्टाईसाठीं आलों आहें. कौरव-पांडवांतला विरोध दूर व्हावा अशी माझी इच्छा आहे. तुझे पुत्र आगींत तेल ओतीत आहेत त्यांना तूं आंवर! पांडवांची समजूत मी घालतों. राजा, कुरुकुळाचें रक्षण कर. निर्दोष यश पदरीं बांध!"

कृष्णाच्या मुखांतून निघालेलीं हीं शब्दरत्नें सर्वांनीं अभिनंदिलीं; पण दुर्योधनाला तीं आवडलीं नाहींत. तो म्हणाला,' कृष्णा! मला उपदेश करण्याचा अव्यापारेषु व्यापार सोडून दे! तूं आपमतलबी आहेस. तुला पांडवांचें कल्याण साधायचें आहे. तुझे कावे न ओळखण्याइतका मी भोळसट नाहीं! द्यूत खेळून पांडवांनीं राज्य गमावलें आहे. आम्हीं तें कमावलें आहे! मी त्यांना त्यांतला भाग काय म्हणून देईन? राज्य हवें तर युद्ध करा म्हणावें. रणावांचून सुईच्या अग्राएवढी मातीसुद्धां मिळायची नाहीं! पांडव बलहीन आहेत. भेकड आहेत. आम्हांला दममाटी करून तूं त्या रडतराउतांना राज्यपदीं बसवूं पहातोस; पण ती गोष्ट हा दुर्योधन साधूं देणार नाहीं!"

दुर्योधनाचें तें उद्दाम भाषण ऐकून श्रीहरि क्षोभला. त्यानें त्याचीं सगळीं पापें त्याच्या पदरांत घातलीं आणि शेवटीं सांगितलें कीं, 'अर्जुनाच्या अनिवार बाणांनीं आणि भीमाच्या गदाघातांनीं जेव्हां तुम्ही धरणीवर देह ठेवाल तेव्हां माझी वाणी तुम्हांला आठवेल!'

दुर्योधन आणि त्याचे सांगाती सभेतून उठले. आजूबाजूला चुळबूळ सुरू झाली. श्रीकृष्णाला बंदिवान् करण्याचा त्यांचा बेत सात्यकीला कळला. त्यानें तो श्रीकृष्णाच्या कानांत सांगितला. कृष्ण उभा राहून दुर्योधनाला म्हणाला,

" मला पकडण्याचा बेत आहे काय तुझा ? मशका, तुझें काय तोंड लागलें आहे ? माझ्या सामर्थ्याची तुला कल्पना नाहीं म्हणून तूं हे चाळे करतोस ! तुझ्यासह तुझें सगळें सैन्य एकाच क्रुद्ध दृष्टिपातानें मी जाळून राख करीन ! "

पहातां पहातां श्रीकृष्णाचें रूप बदललें. व्यक्तिरूप जाऊन विश्वरूपाचा आविष्कार झाला. ती भयानक उग्रता दुर्योधनाला पहावेना. ते उफाळणारे तेजाचे लोट त्याच्या डोळयांना सहन होईनात. दुर्योधन मूर्च्छित पडला. इतरांचे नेत्र झांकोळले. भीष्म, द्रोण, कृप आणि विदुर यांनाच तें विश्वरूप पहातां आलें. धृतराष्ट्रानें तें पहाण्याची इच्छा दर्शवितांच देवानें त्या अंधाला दिव्य चक्षु दिले. चंद्र-सूर्य ज्या तेजाच्या सागरांत बुचकळया खातात तें तेज पाहून धृतराष्ट्राच्या नेत्रांची धणी पुरली.

थोडाच वेळ हा चमत्कार झाला; पण तेवढ्यांतच ती कौरवसभा हादरली. देवानें मग तें विश्वरूप आंवरलें. तो परत कृष्णरूपानें दिसूं लागला. नंतर सात्यकीसह श्रीकृष्ण त्या राजसभेतून बाहेर पडला. त्याची शिष्टाई विफल झाली होती. युद्ध अपरिहार्य ठरलें होतें.

रथारूढ झाल्यावर श्रीकृष्णानें खूण करून कर्णाला आपल्या शेजारीं बसवून घेतलें. सर्व मंडळी निरोप देऊन परतल्यावर भगवान् कर्णाला म्हणाला, " कर्णा ! तूं उदारात्मा आहेस. प्रतापशूर आहेस. तूं मला फार आवडतोस. तुझा स्वतःविषयीं थोडासा गैरसमज झालेला आहे तो दूर करण्यासाठीं मी तुला एकट्याला वेगळें काढलें. तूं स्वतःला सूतपुत्र समजतोस ; पण वस्तु-स्थिति तशी नाहीं. तूं सूर्यापासून झालेला कुंतीचा थोरला मुलगा आहेस. धर्मापेक्षांहि तूं वडील आहेस. यासाठीं तुला माझें सांगणें असें आहे कीं, तूं पांडवांकडे चल. मी तुझ्यावर साम्राज्यछत्र धरीन. धर्म-भीमादि पांडवांना तुझ्या सेवेला लावीन. यादवदळासह मी जगजेठी तुझी सदैव पाठी राखीन. कौरव हे जसे पांडवांचे तसेच तुझेहि शत्रु आहेत असें तूं समज ! "

देवाचें हें भाषण ऐकून कर्ण बोलला,

" श्रीरंगा ! मी कौरवपक्षाला मिळालों हा दोष माझा नसून माझ्या आईचा आहे ! तिनें माझा त्याग केला आणि म्हणूनच मी सूतपुत्र ठरलों. आतां ती गोष्ट मी विपरीत कशी करूं ? ज्यांनीं माझा प्राणांपलीकडे सांभाळ केला त्या अधिरथाला, त्या राधेला मी अंतर कसें देऊं ? दुर्योधन माझा मित्र आहे. अंगदेशाचें राज्य मला अर्पून त्यानें मला आपल्या पंचप्राणांशीं जखडून टाकलें आहे. माझ्या भरंशावर त्यानें लढाईची हिम्मत बांधिली आहे. आतां मीं त्याला सोडलें तर जग माझी छीः थूः करील ! मी कृतघ्न ठरेन अन् आचंद्रार्क नरकाचा धनी होईन ! तेव्हां तुझ्या वचनाप्रमाणें पांडवांचा पक्ष स्वीकारणें मला कालत्रयीं शक्य नाहीं ! तूं ही गोष्ट धर्माला सांगूं नको. तूं पांडवांचा सारथी आहेस. त्यांचें कल्याण होवो ! मला साम्राज्याधिपति होण्याची हांव नाहीं. माझें प्राक्तन असेंच आहे ! "

" पुढील भविष्य मीं हेरलें आहे. आतां रणयज्ञ सुरू होईल. मोठमोठ्या वीरांच्या त्यांत आहुति पडतील. दुर्योधनाची पूर्णाहुति पडली कीं हा यज्ञ समाप्त होईल ! पांडवांचें निमित्त करून तूं सगळा भूभार उतरशील ! "

असें म्हणून कर्ण रथाखालीं उतरला. कृष्णाला नम्रपणें अभिवादन करून त्यानें म्हटलें, " तुमची आमची इहलोकींची हीच शेवटची भेट ! भक्तकाज-कल्पद्रुमा ! लढाईंत माझें कांहींहि होवो ; अंतीं तुझें परम धाम मला मिळूं दे हीच तुझ्या चरणापाशीं प्रार्थना ! "

इकडे विदुरगृहीं असलेल्या कुंतीलाहि वाटलें कीं, आपण कर्णाला भेटून अंतरींचें रहस्य सांगावें अन् त्याला पांडवांकडे ओढावें. भागीरथीतीरीं एकांतांत सूर्योपासना करीत असतां ती त्याला भेटली. " तूं इकडे कशाला आलीस ? ' असें विचारतांच तिनें म्हटलें,

" कर्णा ! तूं राधेय नाहींस ; कौंतेय आहेस. माझ्या उदरीं तुझा धर्माच्याहि आधीं जन्म झाला आहे ! "

" मग मला तूं गंगेंत का सोडलेंस ? मी तुझा पुत्र ना ? मग माझ्या जिवावर अशी उदार कां झालीस ? "

" माझ्या लाडक्या, त्या वेळीं मी कुमारी होतें रे ! लोकापवादाला, अप-कीर्तीला भ्यालें मी ! या सर्व गोष्टी अजाणतां माझ्या हातून झाल्या ! "

" तूं स्वतः सुरक्षित झालीस ; पण माझ्या जन्माचा फजितवाडा केलास ! मी क्षत्रकुमार असून संस्कारांना मुकलों. हलक्या जातीचा एक सूतपुत्र ठरलों ! मला दुर्दैवाच्या फेऱ्यांत तूं टाकलेंस. माझ्या तोंडाला हीनतेचें काळें तूं फांसलेंस ! मी वीराग्रणी रणपंडित ठरलों तो केवळ माझ्या कर्तृत्वशक्तीच्या बळावर ! पांडवांनीं माझा धाक घेतला आहे. तुलाहि तो वाटतो आहे. तेव्हां माझ्यापासून आपल्या पोरांना इजा पोंचूं नये म्हणून केवळ स्वार्थी हेतूनें तूं आज मला गोंजारायला आली आहेस ; पण तुझा हा आईपणाचा हक मी गाजवून घ्यायला तयार नाहीं ! तूं आलीस तशी निघून जा ! "

कर्णाचे ते मर्मभेदक शब्द कुंतीच्या हृदयाला विंधून गेले. ती मूक अश्रुपात करूं लागली. दुःखाचे घोट गिळूं लागली. कर्णालाहि कसेंसेंच झालें. आवेशाच्या भरांत तो कठोर बोलून गेला ; पण कुंतीची ती दीनमुद्रा त्यालाहि पहावेना. थोडा वेळ असाच स्तब्धतेंत गेल्यावर कुंती म्हणाली,

" कर्णा ! तूं दानशूर आहेस. याचकाला नकार देत नाहींस. विन्मुख पाठवीत नाहींस. तुझीं जन्मजात कवचकुंडलेंसुद्धां तूं ब्राह्मणवेषधारी इंद्राला काढून दिलींस. मीहि आज तुझ्या दारींची भिकारीण आहें असें समज अन् एक गोष्ट मागतें ती मला दे ! "

" काय हवें तुला आई ? "

" रणांगणांत माझ्या पांच पुत्रांपैकीं चौघांना तूं राख ! "

" ठीक आहे. तुझें मागणें पूर्ण केलें. मी फक्त अर्जुनाशींच लढेन ! त्याला तरी मारीन अथवा त्याच्या हातून मी तरी मरेन ! मी मेलों तर तुझे पांच आहेतच. अर्जुन मेला तर मी पांचवा होईन !

कुंतीचें कार्य झालें. ती प्रसन्न मनानें घरीं आली. कृष्णहि सात्यकीसह उपप्लव्याला आला. शिष्टाई विफल झाल्याचें वृत्त त्यानें पांडवांना सांगितलें. द्रौपदी मनांत हरखली. भीमार्जुनांनीं भुजा त्रहाटल्या. पुढील युद्धासाठीं सेनापति कोणाला नेमावा म्हणून धर्मानें कृष्णाला विचारलें. कृष्णानें द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नानें नांव सुचाविलें. धर्मानें त्याप्रमाणें त्याला सेनापतिपदाचा अभिषेक केला आणि वस्त्राभरणें दिलीं. दळभार सिद्ध होऊन कुरुक्षेत्राची वाट चालू लागला. तिथें गेल्यावर शिबिरांची उभारणी झाली. लोहार, शस्त्रकार, चर्मकार,

वैद्य वगैरे जातींचे लोक नेटानें आपापल्या उद्योगाला लागले. कोशागारें निर्मिलीं गेलीं. गजशाळा, अश्वशाळा तयार झाल्या. पाकगृहें उघडण्यांत आलीं.

कौरवांच्या बाजूनेंहि गाडे भरून युद्धसामुग्री येऊं लागली. दुर्योधनानें रणपट्ट देऊन भीष्माला आपला सेनापति नेमलें. त्याची तोंडभर प्रशंसा केली. पांच योजनें लांबरुंद असा पांडवांच्या सैन्याचा तळ पडला. दुर्योधनाच्या सैन्यानें आठ योजनें जागा व्यापली. उभयदळीं अशी सिद्धता थोड्याच वेळांत झाली. सुसज्ज सैन्य प्रत्यक्ष रणधुमाळीला केव्हां मुहूर्त लागतो त्याची वाट पाहूं लागलें.



# भीष्म-द्रोणपर्व

भगवान् श्रीकृष्णाची शिष्टाई विफल झाली. तडजोडीचे सर्व उपाय हरले. कौरव-पांडवांमधली तेढ वाढतच गेली. आणि शेवटीं युद्धप्रसंग ओढवला. उभयपक्षांचें मिळून अठरा अक्षौहिणी सैन्य कुरुक्षेत्राच्या रणभूमीवर एकवटलें. म्हातारे-कोतारे आणि मुलें वगळल्यास मधल्या वयाची सर्व तरुण पिढी तिथें मरण-मारणासाठीं दाखल झाली. एवढें सगळें होत आहे तोंच व्यासमुनि हस्तिनापुरांत आले. त्यांनीं धृतराष्ट्राची गांठ घेतली. 'राजा, माझा भविष्यार्थ आत्तांच ऐकून ठेव. हें युद्ध नव्हे. हा कुलक्षय आहे. कुरुक्षेत्रावर दोन्ही दळें आटणार आहेत. फक्त उरणार आहेत ते पांच पांडव. धृतराष्ट्रा, तुला तुझे पुत्र कसे वीरश्रीनें लढतात तें प्रत्यक्ष पहायचें आहे का? असेल तर मी तुला तेवढ्यापुरते डोळे देईन.'

त्यावर धृतराष्ट्र म्हणाला, 'नको. मला तें अनर्थावह रणकंदन पहावणार नाहीं. मला इथेंच बसल्या जागीं युद्धाची वार्ता कळेल असें कांहीं तरी कर.' मग व्यासांनीं संजयाच्या मस्तकावर वरदहस्त ठेवून त्याला ज्ञानदृष्टि दिली आणि 'रणभूमीवर जें जें तुला दिसेल तें तें राजाला श्रुत कर' अशी त्याला आज्ञा केली.

दोन्ही सैन्यांत व्यूहरचना झाली. रणतुरें वाजूं लागलीं. निरनिराळे सैन्यविभाग अतिरथी, महारथी यांच्या हवालीं करण्यांत आले. 'तुमच्यावरच आमची सारी भिस्त' म्हणून दुर्योधनानें पुढें होऊन विनीतभावानें भीष्माचार्यांना मोठेपणा दिला. त्यामुळें उत्तेजित होऊन भीष्मानें प्रचंड सिंहनाद केला. त्या नादानें आकाश दणाणलें. सप्तसागर क्षोभले. गिरिकंदरें दुमदुमलीं. कल्पांतीं विश्व ग्रासायला निघालेल्या प्रलयानलासारखा तो आपला रहंवर फेकीत उभयसैन्यांच्या मध्यभागीं येऊन उभा राहिला. त्यानें हात वर करतांच सगळे वाद्यध्वनि एकदम थांबले. कौरव-पांडव तटस्थ झाले. तो मेघगंभीरवाणीनें धर्मयुद्धाचे नियम सांगूं लागला.

"कौरव आणि पांडव हो! सावधानपणें ऐका. हें युद्ध धर्मयुद्ध झालें पाहिजे. वैर करायचें तें लढतांनाच. संध्याकाळीं शिबिरांत गेल्यावर निर्वैर वृत्तीनें वागायचें. जो पळेल त्यावर शस्त्राचा घाव घालायचा नाहीं. शरणा-

गताला अभय द्यायचें. केवळ कौतुकानें युद्ध पहायला येणारे आणि युद्धोपयोगी सेवकजन यांच्यावर शरप्रहार करायचा नाहीं."

इकडे कुंतीचा मध्यम पुत्र अर्जुन याचा रथ साक्षात् भगवंतानें सज्ज केला. त्याचें सारथ्य स्वतः स्वीकारलें. रणांगणांत प्रत्यक्ष उतरण्यापूर्वी त्यानें अर्जुनाला रणचंडी दुर्गेचें विजयार्थ स्तवन करायला सांगितलें. हस्तपाद प्रक्षालून पार्थानें तिचें स्तवन मांडलें. 'हे आदिमाते दुर्गे! तुझा जयजयकार असो! तूं या रणांगणांत माझी पाठी राख. इंद्र-उपेंद्र तुलाच स्तवून आजवर आपल्या दानवसंहाराच्या कार्यांत यशवंत झाले आहेत. तूं प्रणवस्वरूपिणी आहेस. तूं मूळ स्फूर्ति आहेस. तूं शंकराला प्रिय आहेस. तूं भवभयमोचक आहेस. आमच्या विजयासाठीं मी तुझी प्रार्थना करतों.'

जगदंबा तत्क्षणीं प्रसन्न झाली. तिनें आकाशवाणी उच्चारून म्हटलें. 'पार्था, कचरूं नको. मी आणि विश्वपालक श्रीकृष्ण तुला सर्वार्थी साह्यकारी आहों. तूं विजयी होशील!' तें ऐकून अर्जुनाला विलक्षण उत्साह आला. त्यानें धनुष्य उचलून देवदत्त नांवाचा शंख फुंकला आणि श्रीहरीला म्हटलें,

"देवा, माझा रथ उभयसैन्यांच्या मध्यभागीं घेऊन चल. माझ्याशीं लढायला कोण कोण वीर सरसावले आहेत ते मला एकदां समक्ष पाहूं दे."

श्रीहरीनें 'ठीक आहे' म्हटलें आणि रथ पुढें हांकारला. अर्जुनानें शत्रु-सैन्यावर नजर टाकली मात्र; त्याला एकदम कसेंसेंच झालें. त्याचा रणावेश एकदम ओसरला. तो मलूल होऊन देवाला म्हणाला, 'भगवन्, हा काय प्रकार आहे! हे शत्रु कसले? हे तर माझे आप्त. रक्ताच्या नात्याचे. पितामह भीष्म, गुरु द्रोणाचार्य आणि इतर स्वजनबांधव हे माझ्याशीं युद्ध करायलाच आले आहेत का? मी यांच्याशींच लढून यांनाच मारायचें का? एकाच कुळांतल्या पुरुषांनीं एकमेकांचा जीव घेणें याला युद्ध म्हणतां येईल का? यांना संहारून का मी राज्यभोग मिळवूं? जळो तें राज्य! मी यांच्यावर मुळींच बाण टाकणार नाहीं. यांनीं वाटल्यास मला मारावें. गोत्रवधाचे परिणाम किती भयानक असतात तें या कौरवांना ठाऊक नसलें तरी मला त्याची कल्पना आहे. देवा! हा कुलक्षय जर माझ्या हातून घडला तर कुलधर्म बुडतील. कुलस्त्रिया बिघडतील. वर्णसंकर होईल. कीं मग

पितरांचा अधःपात आणि आपल्याला नरक. राज्यें येतात आणि जातात. पण त्यांच्यासाठीं केलेलीं पापें मात्र कर्त्यांच्या माथीं बसतात. नको, देवा! मला हें युद्ध नको. माझ्या अंगाला कंप सुटला आहे. घशाला कोरड पडली आहे. धनुष्य हातांतून गळूं पहात आहे.'

बोलतां बोलतां अर्जुन गहिंवरला आणि 'मी लढणार नाहीं' म्हणून त्यानें रथाखालीं उडी घेतली. अशा रीतीनें अर्जुनाचें धीरोदात्त हृदय कारुण्यानें द्रवलेलें पाहून भगवंताला त्याची दया आली. तो त्याला संबोधून म्हणाला.

"अर्जुना, हें आज तूं आरंभलें आहेस काय? आजवर तूं अनुचिताला चित्त कधीं दिलें नाहींस. धीर कधीं सोडला नाहींस. देव-दैत्यांनाहि धाक उत्पन्न करणारें तुझें क्षात्रतेज या वेळीं कुठें गेलें? अंधकारानें सूर्याला ग्रासावें तशी तुझी दीन अवस्था झाली आहे. पार्था, दया हा सद्‌गुण खरा; पण युद्धाच्या वेळीं नव्हे. संग्रामात हृदयाचें ढिलेंपण हें क्षत्रियाच्या अधःपाताला साधन......"

"देवा! तूं म्हणतोस तें खरें; पण हें मुळीं युद्धच नव्हे. हा प्रमाद आहे. ज्यानें मला जीव ओतून धनुर्विद्या पढवली, त्या गुरुद्रोणावर शरसंधान करून मी दुसरा भस्मासुर का होऊं? भीष्माचार्य तर माझे आजोबा! त्यांची पूजा करायची का त्यांचें हृदय बाणांनीं विंधायचें? छेः! मला नको असलें हें राज्य. त्यापेक्षां मी गिरिकंदरांत जाईन किंवा भीकसुद्धां मागेन."

मोहरूपी प्रबळ काळसर्पानें अर्जुनाला कडाडून दंश केला. तें विष त्याच्या आत्म्यांत भिनलें. भ्रांतीच्या लहरीवर लहरी येऊं लागल्या. काय होणार अर्जुनाचें आतां! पण इतरांना त्याची काळजी नको. श्रीहरि गारुडी जवळच आहे. तो केवळ कृपादृष्टीनेंच अर्जुनाचें विष उतरील. त्याचा दाह तर शमेलच. शिवाय तो तत्त्वज्ञानानें उजळून निघेल. भगवंताच्या ज्ञानोपदेशानें तो अर्जुनपणाच्या मोहांतून मुक्त होऊन कृष्णरूपानें उरेल आणि कृतार्थ होईल.

भगवान् त्याला म्हणतो—

"अर्जुना, तुला शहाणा म्हणावें का अज्ञानी म्हणावें तेंच मला समजेनासें झालें आहे. हे कौरव मरतील म्हणून तुला शोक झाला आहे. काय तुझी ही भ्रमिष्ट समजूत! विश्वाला जडलेले जन्म-मृत्यु तूं का निर्माण केले आहेस? तूं

या कौरवांना मारलें नाहींस तर हे काय अमर होतील ? मी मारणारा आणि हे सगळे मरणारे ही कल्पना तूं आधीं सोडून दे. सृष्टि अनादिसिद्ध आहे. ती स्वभावतःच उत्पन्न होते आणि स्वभावतःच नाश पावते. ज्ञानाच्या दृष्टीनें उपजणें आणि मरणें ही केवळ भ्रांति होय.

देह होतात आणि जातात ; पण आत्मा अमर असतो. तो कधीं जन्मत नाहीं, कधीं मरत नाहीं. भरलेला कलश उपडा होतो आणि त्यांत प्रतिबिंबित झालेलें सूर्यमंडळ अदृश्य होतें. पण वर पहावें तों तें आकाशांत असतेंच. तसेंच शरीर निमालें कीं त्यांतलें आत्मतत्त्वहि नष्ट झाल्यासारखें वाटतें ; पण तें वस्तुतः कधींच नष्ट होत नाहीं. जीर्ण वस्त्र टाकून देऊन आपण नाहीं का दुसरें नवें नेशीत ? तसाच चैतन्यनाथहि जुन्या देहाचा त्याग करून नव्याचा स्वीकार करतो. आत्मा हा निर्गुण-निराकार आणि भूतमात्रीं भरलेला आहे. याचें खरें स्वरूप तुला कळलें कीं तुझा हा शोक आपोआप दूर होईल. आत्म्याला कोणी मारूं शकत नाहीं आणि देहाला कोणी रक्षूं शकत नाहीं.

शिवाय, या प्रश्नाला दुसरीहि एक बाजू आहे. स्वधर्म हा कोणालाहि कोणत्याहि परिस्थितींत टाकतां येत नाहीं. आणि धर्माचरण करणाऱ्याला कसलेंच पातक स्पर्श करीत नाहीं. अर्जुना, संग्राम हा तुम्हा क्षत्रियांचा स्वधर्म आहे. त्यांत मरणें किंवा मारणें टळत नाहीं. युद्धांतली हत्या हा वध नव्हे. हा स्वधर्म तूं सोडशील तर मात्र तूं पापाचा धनी होशील. तूं स्वधर्मांत वागलास तर तुझे सकल काम पूर्ण होतील. यांत तूं मेलास तर स्वर्गसुख आणि विजयी झालास तर पृथ्वीचें निष्कंटक राज्य तुझ्यासाठीं ठेवलेलें आहे.

तूं म्हणशील कीं, कर्म हें बंधक आहे ; मग तें बरें असो अथवा वाईट असो. पण तुला एक वर्म सांगतों. कर्म जर फलाची आशा सोडून केलें तर तें बाधत नाहीं. भागा आलेलें कर्म माणसानें निमूटपणें आचरीत रहावें. मात्र त्याच्या फलाचा अभिलाष धरूं नये. यालाच बुद्धियोग म्हणतात. बुद्धियोग हें वज्रकवच आहे. तें अंगांत चढवून कर्माच्या रणांत घुसणाऱ्या कर्मवीराला पापरूपी शब्दांचे प्रहार लागत नाहींत. स्वधर्म हा नित्ययज्ञ आहे. त्याच्या आचरणानें मोक्ष निश्चित आहे. विधात्यानें सृष्टि उत्पन्न करते वेळींच मानवाला हा धर्मरूप यज्ञ जोडून दिलेला आहे. त्या यज्ञांतच त्याचें जीवन आणि पोषणहि आहे. स्वधर्म नाहीं तर जीवनांत काय राम आहे ! तो

केवळ भूमीला भार! अर्जुना, देहधारण करून उचित कर्माचा जे कंटाळा करतात ते गांवढे आहेत असें समज. जनकासारख्या जीवनन्मुक्त पुरुषानेंहि स्वकर्म सोडलें नाहीं हें लक्षांत घे. कर्मांत बंध आहे हें खरें, पण तो कशामुळें आहे तें पाहिलें पाहिजे आणि तेंच नेमकें टाकलें पाहिजे. 'हें कर्म मीं केलें' हा अहंकर्तृत्वाचा फुंज आणि 'माझ्या कर्माचें फल मी चाखीन' हा अभिलाष या दोहोंचें नांव बंध आहे. हीं दोन्ही टाकलीं कीं कर्म निर्जीव झालें. मग तें जीवाला बद्ध करूं शकत नाहीं.

विहित कर्माचें आचरण ही भगवंताची सेवाच आहे. विहित आचरणें म्हणजे भगवंताचें मनोगत जाणणें. कर्मरूपी सेवा देवाला फार आवडते. चंपक आणि पारिजात यांच्या फुलांपेक्षां कर्मकुसुमें त्याला अपार संतोष देतात. त्या पूजेनें आत्मराज रिझतो आणि शांतिरूपी पसायदान देतो. धुरंधुर अर्जुना, योगी पुरुष निष्काम कर्माचरणानें मी होऊन माझ्या रूपीं मिळतो. माझ्या प्रसादानें त्याला आत्मनिष्ठा प्राप्त होते. त्याच निष्ठेनें मग माझी भक्ति उल्लसित होते. आणि अखेरीस भक्तीनें माझ्याशीं समरस होऊन तो पूर्ण सुखी होतो. यासाठीं अर्जुना, तूं भागा आलेलीं सर्व कर्मे करून त्या कर्माचें फल मला अर्पण कर. विचारपूर्वक हा फलत्याग होऊं दे. त्याच विचाराच्या बळानें कर्मावेगळें आपलें निर्मल स्वरूप तुला माझ्या स्वरूपांत दिसेल. मग त्याच आत्मस्वरूपांत तूं आपली बुद्धि स्थिर कर.

स्वर्ग-नरकांना कारणीभूत होणारे हे धर्म-अधर्म अज्ञानांतून उगवतात. हें अज्ञान तूं समूळ उच्छेदून टाक. त्याचा उच्छेद झाला म्हणजे धर्माधर्म दोन्ही दूर होतील आणि मी एकीएक तेवढाच शिल्लक उरेन. त्या मजशीं मग तूं सोऽहंबोधानें अनन्य हो. मग तुला पाप-पुण्याची विवंचना करावी लागणार नाहीं. तुझें पाप-पुण्य मीच होईन. आणि तुला सर्व बंधनांतून सोडवीन."

भगवंताचा हा उपदेश ऐकून अर्जुनाच्या सर्व शंका फिटल्या. पूर्णब्रह्म त्याच्या हृदयांत ओसंडूं लागलें. त्याला जिकडेतिकडे ज्ञानाचा लखख प्रकाश दिसला. भगवंतानें त्याला विश्वरूप दाखवलें. तें पाहून तर देवाचें बोलणें त्याच्या प्रचीतीसच आलें. त्यानें भगवंताला प्रसन्न मनानें सांगितलें. 'देवाधि-देवा! माझ्या मनोभूमींतून तूं मोहाचे कांदे खणून काढलेस. आतां तूं जशी आज्ञा देशील तसा मी निःशंकपणें वागेन.'

मग अर्जुन पुनश्च रथावर चढला. भगवंतानें घोड्याचे लगाम धरले. युद्धाची इशारत झाली. दोन्ही दळांत रणतुरांची घाई लागली. त्या धाकानें पृथ्वी डळमळूं लागली. उभय पक्ष एकमेकांवर कोसळले. शस्त्रास्त्रांची देवाण-घेवाण सुरू झाली. भीष्म एकदम अर्जुनावर चाल करून आला. अर्जुन आणि भीष्म. जसे मेरु आणि मांदार. भीष्मानें पांडवसेनेचा संहार मांडला. त्याचा रथ अलातचक्रासारखा फिरूं लागला. क्षणांत पूर्वेस तर क्षणांत पश्चिमेस. त्यानें बरेंचसें पांडव सैन्य आटवलें. पण अर्जुनानेंहि कांहीं कमी हस्तलाघव दाखवलें नाहीं. तोहि मध्याह्नींचा चंडकिरण भासूं लागला. त्यानेंहि अद्‌भुत वीरकर्म केलें. नंतर अंगीं निर्दोष कवच घालून मस्तकीं किरीट झळकवीत अर्जुनाला पाठीशीं घालून रथावर बसलेल्या भगवंताला भीष्मानें म्हटलें.

## भीष्मप्रतिज्ञा

"देवा, 'मी युद्धांत शस्त्र धरणार नाहीं' अशी तूं प्रतिज्ञा केली आहेस; पण आज माझी अघटित करणी पहा. मी तुला शस्त्र धरायला लावीन. ही माझी तुझ्या उलट प्रतिज्ञा. ही मीं खरी केली नाहीं तर गंगा मला व्यर्थ प्रसवली असें समज."

आणि त्यानें धनुष्याचा टणत्कार केला. त्याचे बाण मनोवेगानें धांवूं लागले. लक्षांचीं लक्ष शिरें उडवूं लागले. पांडवसैन्याला त्याच्यापुढें धीर धरवेना. अर्जुनहि गलितधैर्य झाला. त्याच्या बाणवृष्टींत जीवच उरला नाहीं. खुद्द देवावरहि आकांत ओढवला. त्याला पांडवपक्षाचें आणि अर्जुनाचेंहि लक्षण ठीक दिसेना. श्रीकृष्ण लगेच खालीं उतरला आणि रथावरचा प्रतोद उचलून त्या शरवर्षावांतून भीष्माच्या रथावर धांवला. देव आपल्यावर चालून येत आहे, त्यानें आपली प्रतिज्ञा मोडली आहे हें पाहून त्या वृद्ध पितामहाचा आनंद पोटीं सामावेना.

"भक्तवत्सला! ये, ये! तुझ्या हातांतलें तें शस्त्र माझ्या शिरीं घाल. तुझ्या हातून मला मृत्यु येऊं दे. आज माझें ब्रह्मचर्याचें पुण्य फळाला आलें असें मी समजतों."

अर्जुनानें तो प्रकार पाहिला. त्याला बरें वाटलें नाहीं. तो रथाखालीं उडी घालून श्रीकृष्णाजवळ पोंचला. देवाला मिठी घालून मागें खेचूं लागला. देव



शिष्टाईस आलेल्या श्रीकृष्णाला दुर्योधनानें दुरुत्तरें केलीं. —पृ. १३४

ऐकेना. त्यानें त्याला झिडकारलें; पण अर्जुनानें चिकाटी सोडली नाहीं. 'देवा, तूं आपलें वचन सत्य कर. नाहीं तर लोक तुला मिथ्यावादी म्हणतील. भीष्माचार्यांचा वध मी करीन. तूं मागें फीर.' मग देव शांत झाला आणि पुनश्च अर्जुनाच्या रथावर आला.

अर्जुनानें शिखंडीला पुढें करून युद्ध सुरू केलें. शिखंडीहि भीष्मावर बाण सोडूं लागला. शिखंडी हा आधीं स्त्री आणि नंतर पुरुष असा असल्यामुळें भीष्म त्याच्यावर बाण सोडीना. भीष्म शत्रूच्या शस्त्राला शस्त्रानें प्रत्युत्तर देईना हें पाहून दुर्योधनाला दुःख झालें. शिखंडीच्या मागून अर्जुनानें आपलें धनुष्य कामाला लावलें. भीष्माचें धनुष्य तुटलें. ध्वज पडला. सर्वांग विद्ध झालें. अशा रीतीनें जर्जर झालेला तो कुरुवृद्ध भीष्म युद्धाच्या दहाव्या दिवशीं सूर्यास्ताला थोडासाच अवधि असतांना रथांतून खालीं कोसळला. त्यासरशीं कौरवसैन्यांत हाहाकार उठला. स्वर्गांतले देवहि त्याच्या पतनानें विषण्ण झाले. पडतां पडतां भीष्म प्राण सोडील या कल्पनेनें आकाशवाणी झाली. 'अजून दक्षिणायन थोडें शिल्लक आहे. तोंवर तूं प्राण धारण कर!' इच्छामरणी भीष्मानें ती आज्ञा मान्य केली. तो शरशय्येवर पडून राहिला. कौरव-पांडव हातींचीं शस्त्रें टाकून त्याच्या भोंवतीं जमा झाले. सर्वच दुःखीकष्टी झाले. भीष्म मात्र सर्व दुःखें विसरून श्रीहरिस्मरणांत तल्लीन झाला.

त्याच रात्रीं दुर्योधन द्रोणाच्या शिबिरांत जाऊन त्याला म्हणाला. 'आचार्य, भीष्मपितामहांच्या पतनामुळें आमचें सैन्य अनाथ झालें आहे. तरी तुम्हीं सेनापति होऊन त्याला आधार द्यावा आणि युद्ध पुढें चालवावें.' द्रोणानें तें मान्य केलें. दुर्योधनानें त्याला सेनापतिपदाचा अभिषेक केला. त्यावर द्रोण दुर्योधनाला म्हणाला कीं, 'तुला हवा तो वर माग.' दुर्योधनानें मागितलें कीं, 'युधिष्ठिराला जिवंत धरून माझ्या स्वाधीन करा.' द्रोणानें सांगितलें, 'जर अर्जुन त्याचें संरक्षण करीत नसेल तर मी त्याला जिवंत पकडून आणीन.'

द्रोणाच्या आज्ञेप्रमाणें सैन्य पुढें चालूं लागलें. द्रोणानें शिकस्त केली. युद्धाला चांगलाच रंग भरला. अर्जुन नेटानें त्याचा प्रतिकार करूं लागला. द्रोणाला युधिष्ठिर हवा होता. पण अर्जुन त्याला द्रोणाच्या दृष्टिपथांतहि येऊं

देईना. अखेर दिवस संपला. उभय सैन्यें आपापल्या शिबिरांत गेलीं. रात्रीच्या भयाण काळोखांत दुर्योधन पुनश्च द्रोणाकडे आला.

" आचार्य, तुमची प्रतिज्ञा पुरी झाली नाहीं. युधिष्ठिर अजून माझ्या हातीं लागला नाहीं. "

" दुर्योधना, तें खरें ; पण अर्जुनापुढें माझें बळ चालत नाहीं. अर्जुनाला तूं कोणत्याहि युक्तीनें रणभूमीच्या बाहेर काढ. म्हणजे मग मीं प्रतिज्ञा पुरी केलीच म्हणून समज. "

दुसऱ्या दिवशीं दुर्योधनानें कपट केलें. त्यानें संशप्तक या वीरांना वेगळें काढून तीस लक्ष सैन्य त्यांच्या हवालीं केलें. सुशर्म्याला त्यांचा मुख्य नेमलें. त्यांनीं अर्जुनाला दुसरीकडून युद्धाचें आव्हान दिलें. अर्जुनाला वाटलें कीं, यांची टुरटुर एकदां कायमची बंद करून टाकावी. त्यानें भीमादि इतर पांडवांना युधिष्ठिराचें रक्षण करण्याची कामगिरी सांगून आपला रथ संशप्तकां-कडे हांकारला. लगेच रणधुमाळी सुरू झाली. अर्जुनाचा मार असह्य होऊन ते वीर दशदिशां पळूं लागले.

इकडे द्रोणानें आपल्या सैन्याचा चक्रव्यूह रचला. पांडवांनीं गरुडव्यूह रचून धर्माला सुरक्षित ठेवलें. पांडव द्रोणाशीं युद्ध करूं लागले ; पण त्यानें मांडलेला चक्रव्यूह त्यांना फोडतां येईना. तेव्हां अभिमन्यु पुढें होऊन धर्माला म्हणाला,

" मला आज्ञा द्या. मी चक्रव्यूह फोडतों. मला तो भेदून आंत घुसण्याची विद्या माहीत आहे. "

धर्म प्रथम त्या गोष्टीला कबूल होईना. अभिमन्यूचें वय लहान, तेव्हां त्याला या जिवावरच्या अतिदुर्धर कामगिरीवर पाठवूं नये असें त्याला वाटलें. पण अभिमन्यूनें त्याचें मन वळवलें आणि अनुज्ञा मिळवली.

## अभिमन्यूचा पराक्रम

केला धर्मास नमस्कार युद्धा निघाला पार्थकुमार
तों एक शत राजपुत्र व्यूह पूर्ण रक्षिती १

व्यूह भेदीत जाय सौभद्र दहा सहस्र मारिले कुंजर
एक अयुत महावीर अश्वांसहित पाडिले २

एक अयुत महारथी तत्काळ पाडी उत्तरापति
जेथें शंभर राजपुत्र रक्षिती त्या स्थळासी पातला ३

दळासमवेत राजकुमार एकल्यावरी सोडिती शर
परी तो आनकदुंदुभिकन्याकुमार[1] तितुके तोडी क्षणमात्रें ४

तितुक्यांचेंहि बाणजाळ एका शरें छेदी सुभद्राबाळ
जैसें उगवतां सूर्यमंडळ भगणें[2] सर्व लोपती ५

कीं विष्णुनामेंकरून असंख्य दुरितें जाती पळोन
कीं चेततां कृशान असंख्य वनें दग्ध होती ६

हृदयीं प्रकटतां बोध सहपरिवारें पळती कामक्रोध
कीं प्रत्यया येतां ब्रह्मानंद क्षुद्रानंद विरघळती ७

तैसा एकलाचि धनंजयकुमार परि सैन्य केलें अवघें जर्जर
कोणी वरी उचलितांचि कर शस्त्रासहित भुजा छेदी ८

दुर्योधनपुत्र जो लक्ष्मण त्याशीं युद्ध केलें निर्वाण
घेतला तत्काळ त्याचा प्राण शिर उडवुनी पाडिलें ९

पृथक् पृथक् युद्ध केलें शतही राजपुत्र पाडिले
अष्ट कौरव मारिले सुयोधनाचे बंधु पैं १०

१ वसुदेवाच्या कन्येचा पुत्र म्ह० अभिमन्यु. २ तारामंडळ.

बाण सोडितां धांवला कर्ण तों दो बाणीं भेदिले त्याचे कर्ण
अंग टाकूनि भानुनंदन पळता जाहला एकीकडे ११

दशबाणीं सुयोधन खिळिला द्रोण पंचबाणीं विंधिला
जयद्रथ पळविला एकाच बाणेंकरूनी १२

अश्वत्थामा कृपाचार्य हेही पळती गतवीर्य
देखोन अभिमन्यूचें शौर्य द्रोण मस्तक डोलवी १३

पूर्ण होय हा प्रतिअर्जुन ऐसें बोले गुरु द्रोण
तों क्रोधें संतप्त दुर्योधन आचार्याप्रती बोलत १४

जैसा मर्दे मातला सूकर जिव्हेनें चोखितां छेदी जिव्हार
तैसा तूं आमुचा हितकर पाहसी क्षुद्र सर्वदा १५

माझा प्रिय पुत्र लक्ष्मण येणें मारिला न लागतां क्षण
अजूनि काय पाहतां निर्वाण घ्यावा प्राण आजि याचा १६

व्यूहीं सांपडला पार्थकुमार तों सहा जण महावीर
सोडिते जाहले निर्वाणशर एकालिया बाळकावरी १७

सुकुमार तो सौभद्र एकल्या हाणिती महावीर
चहूंकडे पाहे तो सुंदर आपुलें कोणी दिसेना १८

असता जरी पिता अर्जुन तरी साह्य करिता येथें पूर्ण
जयद्रथ असे व्यूहद्वार धरून शिववरद[1] तो नाटोपे १९

आक्रांत झाला पांडवदळीं जवळी नाहीं पार्थ वनमाळी
व्यूह फोडी तैसा बळी कोणी नाहीं पांडवांत २०

---

१ शिवानें ज्याला वर दिला आहे असा.

युद्ध करितां अभिमन्यू कर्णें सोडिले निर्वाणबाण
हातींचें धनुष्य तोडून बाणभाता छेदिला २१

सारथी घोडे ते वेळे द्रोणाचार्यें मारिले
मग अभिमन्यूनें खड्ग घेतलें रथावरून उतरला २२

जैशी वीज लवूनि जाये तैसा अभिमन्यु तळपताहे
तों दुर्योधनें लवलाहे खड्ग छेदिलें हातींचें २३

मग गदा घेऊन पार्थसुत अमित वीरांतें पाडित
तों दु:शासनें त्वरित गदा छेदिली हातींची २४

मग घेतलें रथचक्र तळपतसे सुभद्राकुमार
जैसा श्रीकृष्ण चक्रधर तैसा वीर दिसतसे २५

कर्ण द्रोण दुर्योधन सोडिती बाणापाठीं बाण
हातींचें रथचक्र जाण अश्वत्थाम्यानें छेदिलें २६

तों दु:शासनपुत्र दौ:शासनि वेगें आला गदा घेऊनी
अभिमन्यूनें तये क्षणीं गदा घेतली दूसरी २७

दोघीं गदायुद्ध मांडिलें सकळीं बाणजाल[1] घातलें
दौ:शासनीस केलें अभिमन्यूनें मूर्च्छित २८

सर्वेंचि दु:शासनसुतें हाणितलें अभिमन्यूतें
दोघेहि पावले मूर्च्छेतें गदाघातें एकमेकां २९

---

१ बाणसमुदाय.

मूर्च्छा सांवरूनि दौःशासनी वेगें आला गदा घेऊनी
विकल सौभद्र पडला रणीं त्याचे मस्तकीं घातली ३०

तेणें चूर्ण जाहलें शिर पडला पडला पार्थकुमार
तों आकाशवाणी वदे उत्तर धर्मयुद्ध नव्हे हें ३१

सकळ दळभार एकवटला भोंवता पहावया पाळा पडला
त्यांत जयद्रथें हाणितला अभिमन्यु लातेनें ३२

द्रोणें धिःकारलें जयद्रथा दुर्जना ! वीरास हाणिसी लत्ता
त्या अभिमन्यूनें बाण सोडितां पळालासी त्वरेनें ३३

कौरव गेले समस्त अभिमन्यु घायें विलापित
श्रीहरीचें नाम स्मरत वाट पहात पार्थाची ३४

—श्रीधरकृत पांडवप्रताप, अ. ४५

पांडवदळांत आकात झाला. धर्मराज डोळयांतून पाणी गाळूं लागला. आतां अर्जुन येईल; त्याला तोंड कसें दाखवावें अशी त्याला विवंचना पडली. इकडे संशप्तकांना वधून अर्जुन विजयानंदानें परतला. पण वाटेंत त्याला अपशकुन होऊं लागले. आपल्या पाठीमागून कुरुक्षेत्रावर काय घडलें असेल त्याची त्याला कल्पना येईना. शिबिरांत येतो तर पांडव अधोमुख बसलेले. विचारलें तर कोणी उत्तर देईना. 'माझा अभिमन्यु कुठें आहे?' या त्याच्या प्रश्नाला कसेंबसें सत्य उत्तर मिळालें. अर्जुनाच्या हृदयावर वज्राघात झाला. त्याला एकदम मूर्च्छा आली. पडतां पडतां श्रीहरीनें त्याला सांवरलें. अर्जुन सावध होऊन सर्वांना धिक्कारूं लागला. 'जळो तुमचा पुरुषार्थ! तुम्ही एवढे मोठे रणधीर असतांना माझ्या लहानग्याला काय म्हणून रणांगणांत लोटलेंत?' एवढ्यांत सुभद्रा उपप्लव्याहून आली. हृदय पिटीत तिनें दुःख मांडलें. 'ये रे माझ्या लाडक्या बाळा! मला एकदां तरी भेट रे!' असा ती विलाप करूं लागली. तिच्याबरोबर उत्तरा होती. तिचा शोकसागर

उचंबळला, त्याला तर पारावारच राहिला नाहीं. खुद्द देवालाहि गहिंवर दाटला. एवढ्यांत व्यास आणि नारद तिथें आले. व्यासांनीं सुभद्रेचें कसें-बसें सांत्वन केलें. पांडवांनाहि अनेक विचाराच्या गोष्टी सांगितल्या.

मग श्रीकृष्णासह सगळे पांडव रणांगणावर गेले. त्या वेळीं रात्र झाली होती. चंद्रप्रकाश धारातीर्थी पडलेल्या वीरांच्या कलेवरांवर पसरला होता. बराच शोध केला तरी अर्जुनाला अभिमन्यु गवसेना. एवढ्यांत दुसऱ्या बाजूनें कांहीं शब्द त्याच्या कानीं पडले. 'कृष्णा, गोविंदा, नारायणा! धांव घे आणि मला अंतकाळचें दर्शन दे.' हा अभिमन्यूचा क्षीण पण मंजुळ आवाज त्यानें ओळखला. कृष्णार्जुन धांवत तिथें गेले. अभिमन्यूनें डोळे उघडले. अर्जुनानें धाय मोकलली. अभिमन्यु त्याच्या कानांत बोलला. 'मी रणांत पडलों त्याचा मला खेद नाहीं; पण पडल्या स्थितींत जयद्रथानें मस्तकांत लाथ हाणली; त्यामुळें माझें सर्वांग ठणकतें आहे.' तें ऐकून अर्जुन म्हणाला.

"मी तुझें उसणें घेईन. उद्यां सूर्यास्ताच्या आंत जयद्रथाला कंठस्नान घालीन. अन्यथा अग्निकाष्ठें भक्षण करीन!"

पित्याच्या या प्रतिज्ञेनें त्या बालवीराला हायसें वाटलें. कृष्णमुख न्याहाळीत त्यानें मग लगेच प्राण सोडला. कृष्णानें मोठ्या शर्थीनें अर्जुनाला तिथून परत फिरवलें. अर्जुनानें परिस्थितीचा विचार न करतां जयद्रथवधाची प्रतिज्ञा केली हें लक्षांत येऊन द्वारकाधीशाला रात्रभर झोंप आली नाहीं. अर्जुन हा देवाचा परम सखा; तेव्हां त्याची प्रतिज्ञा पुरी करण्याचा भार देवावरच येऊन पडला होता. ती रात्र कशीबशी संपली. सकाळ उजाडतांच पुनश्च रणतुरें झडूं लागलीं. त्या दिवशीं अर्जुनाला युद्धावर पाठवतांना धर्माला अवघड झालें. त्यानें पार्थाचा हात भगवंताच्या हातीं देऊन 'तूंच आतां याला प्रतिज्ञेच्या सागरांतून वर काढ' अशी करुणा भाकली.

आपल्या वधाची अर्जुनानें घोर प्रतिज्ञा केली आहे हें कौरवशिबिरांत जयद्रथाला कळलें त्याच्या पोटांत भयाचा गोळा उठला. भयानें तोंड साफ उतरलें. 'मी देशत्याग करतों' म्हणून तो दुर्योधनाचा निरोप मागायला गेला. त्यावरून सर्वांनीं त्याचें पाणी जोखलें. पण द्रोण त्याला अभयवचन

बोलला, 'तूं पळ काढूं नको. मी तुझ्याभोंवतीं शकटव्यूह रचून तुझे प्राण रक्षीन.' जयद्रथ मोठ्या कष्टानेंच तिथें राहिला.

अर्जुन रथांत बसून रणभूमीकडे निघाला. देवानें त्या दिवशीं मनोवेगाचे वारू त्याच्या रथाला जोडले होते. अर्जुनाला आश्चर्य वाटलेलें पाहून देव प्रसन्न मनानें त्याला बोलला. 'आज मी असाच रथ चालवीन. तूं जयद्रथाचें शिर छेद. द्रौपदी, सुभद्रा, उत्तरा यांना सुख दे. निर्दोष यशाचा तुरा लाव.' देवानें अर्जुनाला द्रोणाच्या शकटव्यूहापुढें आणून उभें केलें. स्वतः द्रोणाचार्यच त्याचें द्वार रक्षून उभा होता.

प्रथम दुःशासन त्याच्या अंगावर धांवला. अर्जुनानें त्याला मोजक्याच बाणांत पळवून लावलें. नंतर कृतवर्मा आला. त्याला रथांतच मूर्च्छित पाडलें. पुढें श्रुतायुध खवळून आला. त्यानें आपली गदा सरळ देवाच्या हृदयावरच फेकली. ती वरुणाची गदा भगवान् म्हणूनच सोसूं शकला.

दिवस मध्याह्नाला येईपर्यंत अर्जुनानें अपार वीर संहारले. मग त्याला तहान लागली. त्याचे घोडेहि तृषाक्रांत झाले. पण तिथें पाणी होतें कुठें! अर्जुनाला युक्ति सुचली. त्यानें एक बाण खालीं पाताळांत मारला. त्यासरशीं भोगावतीचें जळ उमाळून वर आलें. अर्जुन आणि त्याचे वारू यथेच्छ पाणी प्याले. कौरवदळ तो प्रकार पाहून विस्मित झालें.

पुनरपि कंदन सुरू झालें. अर्जुन व्यूह फोडीत फोडीत जयद्रथाला मोकळा करण्यासाठीं आंत घुसूं लागला. कौरववीर पडलेलें खिंडार लगोलग बुजवूं लागले. जयद्रथ जवळ असूनहि अर्जुनाला दूरच राहिला. दिवस अगदीं थोडा उरला. देवाला चिंता उत्पन्न झाली. सूर्यास्ताच्या आंत जयद्रथाचें शिर उडलें नाहीं तर आपला प्राणसखा पार्थ देह ठेवणार हें त्याला पुरतें ठाऊक होतें. म्हणून मग त्यानें एक अघटित माया रचली. कृत्रिम तम उत्पन्न करून सूर्याला एकाएकीं झांकून टाकलें. 'सूर्य अस्तमला' अशी एकच आनंदाची आरोळी कौरवदळांत दणाणली. जयद्रथानें सुटकेचा निःश्वास टाकला. द्रोणाला कृतकृत्यता वाटली. जयद्रथ व्यूहाच्या मध्यभागीं उभा होता त्याला दैववशात् दुर्बुद्धि झाली कीं, सूर्य खराच अस्ताला गेला कीं काय तें एकदां वर मान करून पहावें. आणि त्यानें बगळ्यासारखी आपली मान वर काढली. तत्क्षणीं

श्रीहरीची माया सूर्यावरून दूर झाली. सूर्य अजून वर होता. त्याचा सोनेरी प्रकाश सर्वत्र पसरला. भगवंतानें अर्जुनाला म्हटलें.

"अर्जुना ! हा सूर्य आणि हा जयद्रथ. उडव त्याचें शिर. क्षणाचाहि विलंब लावूं नको !"

आणि दुसऱ्याच क्षणाला अर्जुनाच्या तीक्ष्ण बाणानें आपल्या लक्ष्याचा कंठ वेधला. जयद्रथाचें शिर चेंडूसारखें अंतराळांत उडत असल्याचें आश्चर्य-जनक दृश्य उभयदळांना पहायला मिळालें. पांडवसैन्यानें हर्षाची टाळी पिटली. कौरव हाहाकार करूं लागले. त्यांचा दिवसभराचा आटापिटा एका निमिषांत व्यर्थ ठरला होता. जें होऊं नये तें अचूक आणि अचानक घडलें होतें. वृद्धक्षत्र हा जयद्रथाचा बाप स्यमंतपंचक क्षेत्राच्या बाहेर तप करीत बसला होता. जयद्रथाचें शिर भूमीवर पाडील त्याचें मस्तक शतधा चूर्ण होईल असा त्यानें वर मिळविला होता. हें शिर जें उडालें तें नेमकें वृद्ध-क्षत्राच्या मांडीवर जाऊन पडलें. त्यानें तें खालीं टाकतांच वृद्धक्षत्रहि तत्काळ मृत्यु पावला. एकाच बाणानें अर्जुनावरचीं हीं दोन प्राणसंकटें निरस्त झालीं आणि भगवंतानें आपल्या भक्ताचें काज पूर्ण केलें. विजयवाद्यांचा गजर करीत पार्थ आपल्या शिबिरांत परतला. 'देवा, माझ्या अर्जुनाला आज कृतांताच्या मुखांतून तूंच ओढून काढलेंस, सर्वांगाची छाया करून प्रह्लादा-सारखें रक्षिलेंस' म्हणून धर्मराजानें देवाला भरल्या डोळ्यांनीं धन्यवाद दिले.

## घटोत्कचाचा वध

दुसऱ्या दिवशीं द्रोण आणि अर्जुन यांची समोरासमोर गांठ पडली. त्या दिवशीं विलक्षण संकुल युद्ध झालें. रथाशीं रथ दाटले. गजांना गज संघटले. स्वारांना स्वार भिडले. ब्रह्मांड हाकांनीं भरलें. रात्रीचा मिट्ट काळोख पसरला, तरी धुमश्चक्री थांबली नाहीं. द्रुपद हा द्रोणाचा वैरी. ते दोघे या वेळीं हात-घाईला आले होते. त्यांनीं एकमेकांना बरेंच घायाळ केलें होतें. शेवटीं द्रुपदाची शक्ति संपुष्टांत आली आणि त्याच वेळीं द्रोणाच्या एका विजे-सारख्या बाणानें द्रुपदाचें काम काढलें. द्रुपद पडला हें समजतांच पांडव-सैन्याचा धीर खचला. त्या दिवसाची एकंदरींत लढाई पांडवांच्या अंगाशींच आली होती. त्यांत आतां सासरा द्रुपद धारातीर्थीं पहुडला. त्यामुळें सर्वांचीच

मति कांहीं काळ कुंठित झाली. सैन्य कचरलें आणि मिळेल त्या वाटेनें अंग काढूं लागलें.

भीमपुत्र घटोत्कचानें ही पळापळ पाहिली. त्यानें धीर देऊन सर्वांना मागें परतवलें. आपलें राक्षसदळ एकवट करून तो कौरवांवर अकस्मात् घसरला. त्यानें शांबरी माया पुढें काढली. प्रथम वायुअस्त्र फेकून त्यानें कौरवदळांतल्या दिवट्या मशाली विझवल्या. त्यांना मित्र कोण नि शत्रु कोण हें कळेनासें झालें. आकाशांतून पर्वत आणि पाषाण कोसळूं लागले. त्यांच्या तळीं सांपडून वीर महावीर चिरडूं लागले. एका बाजूनें चक्रें यावीं, दुसऱ्या बाजूनें गदा आदळाव्या, तिसऱ्या बाजूनें तोमर मुसळें धडकावीं, असा प्रकार सुरू झाला. सगळ्या अतिरथी-महारथ्यांचे हात कुंठले आणि प्राण गोळा झाले. जिकडे तिकडे मरणारांच्या अंगावर शहारे आणणाऱ्या आरोळ्या आणि पळत्यांचे पदाघात ऐकूं येऊं लागले.

दुर्योधन कर्णाजवळ जाऊन म्हणाला, ‘ मित्रा, घटोत्कचाची माया दारुण. एका रात्रींत तो सगळा दळभार रणभूमीवर निजवील. या वेळीं तूं आम्हांला राख. इंद्रानें तुला दिलेली निर्वाणीची शक्ति आतां या घटोत्कचावर सोड. ’ त्यावर कर्ण बोलला, ‘ सुयोधना, मी ती शक्ति अर्जुनासाठीं आजवर जिवापाड राखून ठेवली आहे. ती या क्षुद्र प्राण्यावर कशी सोडूं ? ’ पण दुर्योधनाचा आग्रहच पडला तेव्हां ती त्यानें भात्यांतून बाहेर काढली.

त्यासरशीं सहस्रसूर्य तळपावे तसा तिचा चंड प्रकाश सर्वत्र पसरला. सर्वांच्या डोळ्यांपुढें अंधारें आलें. ती जणूं कृतांताची लळलळती जिव्हाच होती. ती जणूं महाप्रलयींची वीजच होती. कर्णानें न्यासमंत्र जपून ती घटोत्कचावर सोडली. सहस्र विद्युल्लता कडकडत, ब्रह्मांड भाजीत, निघाव्या तशी ती सुसाट सुटली. हां हां म्हणतां तिनें घटोत्कचाच्या काळजाचा ठाव घेतला. महावृक्ष करकरां उन्मळावा, मदांध हत्ती पर्वतावरून कोसळावा, किंवा मेरूचा कडाच घसरावा, तसा तो महाभयंकर घटोत्कच तिथल्यातिथें मरून धरणीवर आदळला. उरलेलें राक्षससैन्य द्रोण आणि कर्ण यांनीं बाणजाळ घालून थोड्याच वेळांत खलास करून टाकलें.

कौरव परम आनंदित झाले. पांडवांना घटोत्कचाच्या मृत्यूचें दुःख झालें. इथेंहि देवाचीच इच्छा समर्थ ठरली. ती वासवी शक्ति कर्णाच्या भात्यांत

उरली असती तर तिनें अर्जुनाचे प्राण निःसंशय ग्रासले असते. ती घटोत्कचावर पडल्यामुळें अर्जुन सुरक्षित झाला आणि इकडे माजलेला घटोत्कच आपल्या अतुर्बळी सैन्यासह परभारें शांत झाला. त्याच्या संहारानें भगवंताचें भूभारहरणाचें कार्य तितकेंच कमी झालें.

पुन्हा द्रोणाचार्यांनीं संग्रामाला रंग भरला. धृष्टद्युम्न त्याला सामोरा झाला. सगळ्या पांचालांनीं द्रोणापुढें आपली आघाडी उघडली. ते द्रोणावर निर्दय शस्त्रपात करूं लागले. द्रोणहि प्रलयसागरासारखा खवळला. त्यानें पांचालांच्या पंचवीस हजार रणधुरंधर सैनिकांना एकाच वेळीं रणभूमीवर कायमचें निजवावें म्हणून ब्रह्मास्त्र बाहेर काढलें. त्याचा प्रयोग करतांच पांचालांचा संहार झाला. नंतर त्यानें पांचशें मत्स्यवीर मारले. सहा हजार सृंजय ठार केले. रथसमुदाय, गजसमुदाय यांचा विध्वंस केला. पांडव विजयाविषयीं निराश झाले. अर्जुनहि त्याच्यापुढें जायला धजेना. द्रोण म्हणजे त्या वेळीं विश्वग्रासी वणवा झाला होता. जें पुढें येईल तें सगळें त्याच्या आगींत दग्ध होत होतें.

एवढ्यांत एक चमत्कारिक घटना घडली. त्या संकुल युद्धांत भीमानें इंद्रवर्म्याचा अश्वत्थामा नांवाचा एक मदमत्त हत्ती गदेनें मारला. लगेच 'अश्वत्थामा मेला' म्हणून एक आरोळीहि ठोकली. जिकडे तिकडे तिचे पडसाद उठले. 'अश्वत्थामा मेला ! खरेंच मेला ?' अशी कुजबूज सर्वत्र सुरू झाली. द्रोणानेंहि ती ऐकली. त्याचा धीर खचला. हात-पाय गळले. पुत्रशोकानें तो एकदम दीन, करुण झाला. खरा प्रकार प्रत्यक्ष पहावा म्हटलें तर अंधारी रात्र पसरलेली. माणसाला माणूस भिडलेलें. भूमीवर मनुष्यांच्या आणि पशूंच्या प्रेतांचा खच पडलेला. त्यांत अश्वत्थाम्याला कुठें पहायचें अन् कसें पहायचें ? पुत्राच्या मृत्युवार्तेवर त्याचा विश्वासच बसेना. कारण तो चिरंजीव आहे हें त्याला ठाऊक होतें. पण चौकशी केल्यावांचून स्वस्थहि बसवेना. पण खरा प्रकार सांगणार कोण ? त्याला एकाएकीं धर्मराजाचें स्मरण झालें. तोच एक पुरुष सत्याशीं प्रतारणा करणार नाहीं, अशी त्याची खात्री होती. युद्ध थांबवून तो धर्माकडे जायला निघाला. श्रीहरीनें त्याला येतांना पाहिलें. तो धर्माला म्हणाला, 'तूं या वेळीं खरें बोलूं नको आणि खोटेंहि सांगूं नको. संदिग्ध असें वचन बोल.' धर्माला तें रुचलें नाहीं. तो म्हणाला, 'देवा !

जन्मादारभ्य या जिह्वेला असत्याचा विटाळ घडला नाहीं. मग आतांच मी तो कलंक कसा लावून घेऊं?' त्यावर देव पुन्हा म्हणाला. 'सत्याचा अर्थ मी तुला सांगतों. सर्वांचें कल्याण साधील तें सत्य. हा द्रोण जर आणखी अर्धा दिवस जिवंत राहील तर तुमच्या सैन्याचा, तुम्हां सर्वांचा धुव्वा उडवील. माझी इच्छा अशी आहे कीं, हें घडतां कामा नये. ईश्वरी नेमानेमाला तूं बाध आणशील तर तेंहि एक मोठेंच असत्य होईल.' धर्मराजानें देवाचें वचन मनाविरुद्ध मानलें.

द्रोणाचार्यानें पुढें येऊन विचारलें; तेव्हां धर्म एवढेंच म्हणाला. 'अश्वत्थामा मेला हें खरें; पण नरो वा कुंजरो वा!' अर्धें वाक्य द्रोणाच्या कानीं पडलें. पण पुढचें अर्धें वाक्य श्रीहरीनें त्याच क्षणीं मुद्दाम वाद्याचा गजर करवला त्यांत गडप झालें. तें द्रोणाला ऐकूं गेलें नाहीं. तो समजला कीं, आपला पुत्र मेला. आतां शंका धरायला नको. त्याला आतां युद्धाशीं आणि आपल्या जीविताशींहि कांहीं कर्तव्य उरलें नव्हतें. चौदा विद्या आणि चौसष्ट कला यांचा तो सागर. वेदशास्त्रांत पारंगत. धनुर्वेदात आगळा. मंत्रशास्त्रांत महासिद्ध. तो परत आपल्या रथावर आला आणि शत्रूच्या ऐवजीं आपल्याच जीविताचा शेवट करायचें त्यानें ठरवलें. रथांत बसूनच त्यानें अंतकाळाचें ध्यान धरलें. एवढ्यांत नारदादि मुनिवर तिथें प्रगट झाले. ते म्हणाले, 'द्रोणाचार्य! तुम्ही मंत्रवेत्ते ब्राह्मण. रणांगण ही तुमची जागा नव्हे. कंदन हा तुमचा धर्म नव्हे. पण तुम्हांला दुष्टांची संगत बाधली. तुम्ही आपल्या धर्मापासून च्युत झालांत. तुम्हांला एवढी प्रचंड हिंसा करायचें कांहींच कारण नव्हतें. पण झालें तें होऊन गेलें. आतां हे लटके मायापाश तोडा, आसक्ति सर्व सोडा आणि देवाच्या घरीं चला.'

मरणकाळाला उचित असा उपदेश करून ते मुनीश्वर गुप्त झाले. द्रोणाला तो पटला. त्यानें रथावरच पद्मासन घातलें. प्राण आणि अपान हे देहांतले वायु हळूहळू वर खेंचण्याचें काम सुरू केलें. सकल इंद्रियांचे मार्ग निरोधले. त्याच्या अंतरांत ब्रह्मानंदाचा प्रकाश डोकावूं लागला. खेद निमाला. भेदाभेद विरले. सारे कौरव-पांडव आश्चर्यस्तिमित होऊन त्याच्या त्या वीतराग, निर्वाणाभिमुख मूर्तीकडे पाहूं लागले आणि एवढ्यांत तिथें आणखी एक अद्भुत हिंस्रकर्म उभें झालें.

पांचालांचें आणि द्रोणाचें हाडवैर. धृष्टद्युम्न हा पांचालांचा कुलदीपक आणि द्रुपदाचा पुत्र. आपल्या बापाचा वैरी असा आपसुख मरतो हें त्याला बरें वाटलें नाहीं. आपल्या हातून त्याचा वध झाला पाहिजे ; त्याशिवाय बापाचा सूड घेतला गेला असें होणार नाहीं, असें त्याला वाटलें. सगळे कौरव-पांडव आपापल्या जागीं स्तंभित उभे आहेत ही संधि साधून त्यानें आपलें खड्ग उपसलें. गरुडासारखा तो द्रोणाच्या रथावर झेंपावला. तो कुठें जात आहे, काय करूं पहात आहे, याचा इतरांना अंदाज लागण्यापूर्वीच त्यानें डाव्या हातानें द्रोणाचा जटाजूट पकडला आणि उजव्या हातानें खड्दिशीं त्याचें शिर तोडलें. धृष्टद्युम्नाचें हें विपरीत कर्म कोणालाच रुचलें नाहीं.

द्रोणाचार्य स्वर्गाचा अधिकारी झाला. दोन्ही दळांत ' हाय हाय ' उठली. युधिष्ठिर अश्रुधारा गाळूं लागला. अर्जुनानें धरणीवर अंग टाकलें. आचार्यांचे गुण आणि त्यांचें प्रेम आठवून सर्वच पांडव शोकमग्न झाले.

अश्वत्थामा अनाथ झाला. त्याचें पितृच्छत्र अकस्मात् उडून गेलें. तो शोक-मोहांनीं झळंबला. धरणीवर पडून रडूं लागला. कौरवांनीं त्याचें सांत्वन केलें. ' बापाच्या मृत्यूचा सूड घे ' म्हणून त्याला चेतवलें. तो उठला. सकळ कौरवभार पाठीशीं घेऊन त्यानें पांडवांशीं घोरांदर युद्ध मांडलें. पण त्याचा तो आवेश अर्जुनापुढें कुचकामी ठरला. अर्जुनानें बाणवृष्टि करून त्याला पिटाळून लावलें.



# कर्ण—शल्यपर्व

भीष्माचार्यानें दहा दिवस आणि द्रोणानें पांच दिवस कौरवांचें सेनापत्य केलें. भीष्म शरपंजरीं पहुडला. द्रोण मृत्युपंथानें निघून गेला. हे दोघे कौरवांकडचे वयोवृद्ध आणि अतुलप्रतापी वीर अशा प्रकारें नष्ट झाल्यावर कौरव सैन्य अनाथ झालें. त्याला युद्धाचा उत्साहच उरला नाहीं. सगळ्या वीरांच्या हृदयांत एक प्रकारची भयग्रस्त उदासीनता पसरली. दुर्योधनाला हें लक्षण ठीक दिसेना. दिङ्मूढ होऊन तो कर्णाकडे आला. आतां तोच त्याचा एकमेव आधार होता. त्यानें कर्णाला गौरवून म्हटलें.

" मित्रा कर्णा! आतां तूं आमचा सेनापति हो. हें युद्ध तूं पुढें चालव. भीष्म-द्रोणांना जें साधलें नाहीं तें तूं करून दाखवशील असा मला भरंवसा आहे. तुझी बुद्धि सूक्ष्म आणि बळ अचाट आहे. भीष्म-द्रोण हे आमचे खरे हितकर्ते नव्हतेच. ते पांडवपक्षपाती होते. 'वपु इकडे मन तिकडे' अशी त्यांची स्थिति होती. पण तूं तसा नाहींस. तूं आपलें तन-मन मला वाहिलेलें आहेस. तूं सेनापति म्हणून रणांत उभा ठाकलास कीं पांडवांना वाटेल कीं, महाव्याघ्र आपल्याला दाढेखालीं रगडायला पुढें आला आहे."

दुर्योधनानें केलेलें हें स्तुतिस्तोत्र ऐकून कर्ण फुलला. त्यानें सेनापति होण्याचें मान्य केलें. लगेच दुर्योधनानें सुवर्ण कलशांत जल भरून कर्णाला अभिषेक केला. वस्त्रें, भूषणें, अश्व, गज देऊन त्याला तोषवलें. लगेच कर्णानें मनासारखी व्यूहरचना करून रणशिंग फुंकलें. दुसऱ्या बाजूनें अर्जुनहि सिद्ध झाला. देवाला वाटलें कीं, आज आपल्या प्रिय भक्ताची अर्जुनाशीं गांठ आहे. प्रसंग आणीबाणीचा आहे. त्यानें शिबिरांतून निघण्यापूर्वी अर्जुनाला आदित्यहृदय जपून सूर्याची प्रार्थना करायला लावलें. पहिल्या दिवशीं अर्जुनाऐवजीं नकुलानेंच सर्व शक्तीनिशीं कर्णावर धाड घातली. पण सूर्यापुढें काजवा तशी त्याची अवस्था झाली. कर्णानें धनुष्याची दोरी गळ्यांत अडकवून त्याला खेंचलें आणि 'जाऊं दे; तुला काय मारायचें!' म्हणून सोडून दिलें. अशा रीतीनें पहिला दिवस संपला. दुर्योधनाला वाटलें होत कीं, आजच कर्ण अर्जुनाचा शिरच्छेद करील आणि मग पार्थविरहित पांडवांना उद्यां आपण निःशेष करून टाकूं. पण दुर्योधनाचे हे मनचे मांडे प्रत्यक्षांत भाजले

नाहींत. तो हिंपुटी होऊन कर्णाकडे आला आणि रडगाणें गाऊं लागला. त्यावर कर्ण प्रतिज्ञावचन बोलला.

" उद्यां मी अर्जुनाला मारीन तरच तुला तोंड दाखवीन."

दुर्योधनाला तें ऐकून हायसें वाटलें. कारण कर्णाच्या पराक्रमावर त्याचा विश्वासच तसा होता ; पण त्याच वेळीं कर्ण त्याला वस्तुस्थिति सांगायला विसरला नाहीं.

" माझ्याजवळ भार्गवचाप आहे. पण अचूक काम साधणारी वासवी शक्ति मात्र हातून गेली आहे. भुजंगाचे दांत पाडावे, वाघाच्या दाढा काढाव्या तशी माझी अवस्था झाली आहे. मी मनांत चिंतातुर आहें. शिवाय अर्जुनाला श्रीहरीसारखा चतुर सारथी मिळाला आहे आणि मला मात्र त्याची उणीव आहे. तेव्हां तूं एक गोष्ट कर. मद्रदेशचा राजा शल्य याला एका दिवसापुरता माझा सारथी व्हायला सांग. कृष्णाप्रमाणेंच त्यालाहि अश्वहृदय संपूर्ण अवगत आहे. तो सारथी मिळाला तरच मी अर्जुनाला मारूं शकेन."

दुर्योधन म्हणाला, 'ठीक आहे. मी तशी व्यवस्था करतों.' लगेच तो शल्याच्या शिबिरांत गेला. 'कर्णाचा सारथी हो' असें शल्याला सांगतांच तो दुर्योधनावर उसळून उठला. 'त्या सूतपुत्राचा मी सारथी होऊं? राजा, तूं हा माझा अपमान करतो आहेस. तुला मी नको असेन तर उद्यांच्या उद्यां मी स्वदेशीं निघून जातों.' दुर्योधनानें कमालीची नम्रता धरून त्याला विनविलें. 'तुझी योग्यता मी जाणतों ; पण माझ्यासाठीं एवढें कर. मला जीवदान दे.' त्यावर शल्य बोलला, 'ठीक आहे. मी सारथ्य करीन ; पण मी जें जें बोलेन तें तें कर्णानें सोसलें पाहिजे. प्रतिवाद करतां कामा नये. तो जर उलट उत्तर करूं लागला तर मी रथ टाकून निघून जाईन.'

कर्णानेंहि तें निरुपायास्तव मान्य केलें. शल्य सूर्यसारथी अरुणाप्रमाणें कर्णाचा रथ चालवूं लागला. कर्ण त्याला म्हणाला, 'तूं असेंच चतुर सारथ्य केलेंस तर आज मी अर्जुनाला निःसंशय परलोकीं धाडीन.' त्यावर शल्यानें लगेच त्याचें बोलणें खोडलें.

" वृथा वचन बोलूं नको. भीमार्जुनांचा आजवरचा पराक्रम आठव एकदां. एकानें शंभर कीचक मारले. दुसऱ्यानें गोग्रहणप्रसंगीं तुमचीं वस्त्रेंहि

हिराघून घेतली. अर्जुनाची आणि तुझी तुलना करायची तर तो सागर आहे, तूं तडाग आहेस. तो देवेंद्र आहे, तूं रंक आहेस. तो सूर्य आहे, तूं काजवा आहेस. तूं कौरवांच्या मेळाव्यांत आत्मबलाची घमेंड मार; पण मी तुला ओळखतों. तुझ्या हातून अर्जुनाचा रोमहि वांकडा होणार नाहीं.'

कर्णाला तें शल्याचें बोलणें जखमेवर मिठाचें पाणी ओतावें तसें वाटलें. तो निर्दय तेजोभंग त्याला असह्य झाला. तो म्हणाला, 'आतां पुरे! खूप बोललास. माझा पराक्रम आतां डोळे उघडे ठेवून पहा. तोंड आवरून रथ चालव.' शल्यानें रथ इच्छित स्थळीं आणला. कर्णानें मोठी हाक फोडली. कृष्णार्जुनांना आव्हान दिलें. प्रथम खुद्द धर्मराजानें त्याला तोंड दिलें. दहा बाणांनीं त्याचें हृदय विंधिलें. कर्ण पहिल्या धडाक्यालाच विकल पडला. खरें म्हणजे कर्ण हा धनुर्विद्येंत उणा नव्हता. तो वैऱ्यांचा महाकाळ होता; पण आज त्याच्या अंतरांतून आत्मविश्वास गळाला होता. वासवी शक्ति भात्यांत नसल्यामुळें त्याला हात मोडल्यासारखें वाटत होतें. पण 'हत्ती रोडला म्हणून घोड्यांच्या घोडवळींत मावत नसतो.' तो लगेच सावध झाला. धर्माचा मुकुट बाणानें उडवून त्यानें त्याचें उसनें फेडलें. धर्म त्या माऱ्यानें मागें फिरतो असें वाटलें तेव्हां आपला रथ आडवा घालून त्यानें धर्माला अडवलें आणि रथावर चढून त्याला धरलें. तो धर्माला मारणार एवढ्यांत कुंतीला दिलेलें वचन त्याला आठवलें. 'अर्जुन सोडून बाकीच्या चौघांचे प्राण रक्षीन' असें तो तिला बोलला होता. 'जा, तुला मी जिता सोडतों.' म्हणून तो खालीं उतरला.

कर्णानें त्या दिवशीं खरोखरीच प्रळय केला. पांडवांचे सातशें रथी त्यानें संहारले. मी मी म्हणवणारांना धाक बसवला. पांडवसैन्याचा उत्साहच मारून टाकला. धर्मानें तें सैन्याचें विध्वंसन पाहिलें. त्याला रहावलें नाहीं. तो अर्जुनाला चिडून बोलला. 'अर्जुना, कुठें गेलें तुझें रणपांडित्य? अजून कर्ण जिवंत आहे याची तुला लाज वाटत नाहीं का? धिक्कार असो तुझ्या गांडीव धनुष्याचा.'

त्या क्षणीं अर्जुनानें खड्ग उपसलें, पण तें कर्णाला मारण्यासाठीं नव्हे; तर धर्माचें मस्तक छेदण्यासाठीं. 'माझ्या गांडीवाचा जो धिक्कार करील त्याला

मी कंटस्नान घालीन' अशी त्याची प्रतिज्ञा होती. अर्जुन धर्मराजाच्या अंगावर धावलेला पाहून श्रीहरीनें त्याला मिठी घालून आवरलें. 'अरे, हें काय आरंभलें आहेस तूं? वडील बंधूचा वध करून ब्रह्मांडभर अपकीर्ति का करून घेणार आहेस?' कृष्णानें त्याला खडसावून विचारलें. त्यावर अर्जुन म्हणाला. 'माझी प्रतिज्ञाच तशी आहे. ती मी न पाळीन तर दुसऱ्या बाजूनें नरकाचा धनी होईन. तेव्हां आतां तूंच यांतून मार्ग सुचव.'

त्यावर भगवान् बोलला. 'वडील माणसांची निर्भत्सना ही त्यांच्या वधासारखीच आहे. तेव्हां तूं तसे चार शब्द बोल आणि युधिष्ठिराला शरण जा.' अर्जुनानें लागलीच तसें केलें. श्रीहरीच्या युक्तिबुद्धीनें पांडवांवरचा एक महान् अनर्थ टळला. धर्मानें त्याला आलिंगन दिलें. आपण क्रोधाला वश झालों म्हणून स्वतःचाच धिक्कार केला. 'कर्णाला मारून विजयी हो' म्हणून त्यानें पार्थाला आशीर्वाद दिला. श्रीकृष्णानें धर्माला सांगितलें कीं, 'आज कर्णाचा वध निश्चित आहे; तूं चिंता करूं नको.'

पण कर्णाचा मृत्यु होण्यापूर्वी त्याच दिवशीं निराळीच एक घटना कुरुक्षेत्रावर घडली. त्या घटनेचा कर्ता भीमसेन होता. तो त्या दिवशीं अचाटच खवळला. मागचें पुढचें कांहीं न पहातां त्यानें कौरवदळात मुसंडी मारली. तो हत्ती उचलून हत्तीवरच मारूं लागला. रथावर रथ आपटूं लागला. त्याची गदा दिसेल त्याचें चूर्ण करूं लागली. शत्रूंच्या रक्तानें तो बळाचा डोंगर नुसता न्हाऊन निघाला. कौरववीरांनीं त्याला कोंडलें; पण तो रणभैरव कोणालाच आटोपेना. त्यानें त्या दिवशीं मनुष्यसत्र आरंभलें होतें. रणमंडल हें होमकुंड. तीव्र द्वेष हा त्यांतला अग्नि. कौरव हे यज्ञपशू. त्याच्या आहुतींवर आहुती पडत होत्या. दुःशासनाला हें पाहून भयंकर त्वेष उत्पन्न झाला. त्यानें खदिरांगारासारखे डोळे करून भीमावर चाल केली. त्याच्यावर प्रखर बाणांचा पाऊस पाडला. दुःशासनाला समोर पाहून भीमाचेंहि पित्त खवळलें. त्याचीं सर्व दुष्कृत्यें भीमाला आठवलीं. आज त्या सगळ्यांचा वचपा काढायचा असें भीमानें ठरवलें. आणि मग दोघे एकमेकांना भिडले. जणूं सह्य आणि विंध्य. जसे मेरु आणि मंदार. एक आग तर दुसरा इंगळ.

## दुःशासनवध

धावति अन्योन्यावरि ते दोघे आठवूनि अपकार
जाणों ते मदमत्त क्रोधोद्धुरें[1] दंपतीच अपकारें[2] १

जें वैरशल्य दुःसह हृदयांत करावया तदुद्धरण
अत्यद्भुतबळ अरि ते करिते झाले हठें विरुद्धपण २

दुःशासनशर मर्मी लागे नागेशसा असुख रचिता
मूर्च्छित करि भीमातें इतरांचे तो पळांत असु खरचिता[3] ३

सावध होउनि भीम क्षिप्र महाशक्ति शत्रुवरि सोडी
तीसहि तो दुःशासन दशबाणांहीं पराक्रमें तोडी ४

तेव्हां गदाप्रहारें भीम ललाटीं स्वशत्रुला ताडी
क्षितिवरि हरिवज्राहत[4]गिरिशिखर जसें तसें तया पाडी ५

पत्नीचा केशग्रहसमय स्मरला, निजप्रतिज्ञा ते
आठवि म्हणे म्हणोत न मिथ्यावादी मजप्रति ज्ञाते ६

गरुड जसा गगनांतुनि वेगें उतरोनि पन्नगा झडपी
तैसा भीम बळानें दुःशासनकंठ अंघ्रिनें दडपी ७

भीम विदारी खड्गें सहज परम कठिन शत्रुचें उर तें
वाटे पविपातींही[5] त्या साध्वीला न गांजितां उरतें ८

अशनिहत शिलातलजल रक्त जसें खड्गभग्न तें उरवी
तृषित घटोत्कचतात प्राशी शोणित न लेशही उरवी ९

---

१ रागानें खवळलेले. २ पकार नसलेले दंपती म्हणजे दंती = हत्ती. ३ प्राण घेता. ४ इंद्राच्या वज्रानें पाडलेलें गिरिशिखर. ५ वज्राघात झाला असता तरी.

मग कंठनाल चरचर तो सत्य करावया बिरुदें[1] कापी
देउनि मिटक्या मटमट घटघट त्या स्वाहितासृगुदें[2]का पी १०

जे जे लोकीं असती रस तो त्यांची न माधुरी थोडी
परि अरिच्या रक्तरसीं मज बहु त्याहूनि लागली गोडी ११

ऐसें वदोनि ओष्ठप्रांत जिभेनें पुनः पुन्हा चाटी
अवलंबी अत्युग्रा भीम अतृप्त द्विपारि[3]चि घाटी १२

रिपु शूर दूर तेथुनि तें दारुण कर्म पाहतां पळती
किति पडती किति दडती कितिएकांचीं धृतायुधें गळती १३

जाणों त्या अत्युग्रा मूर्त श्रीनारसिंह मंत्रास
पाहोनि पावले ते रिपुभटभूपाळसूत[4] संत्रास १४

म्हणति मनुष्य नव्हे हा, राक्षस कीं काळ हा खवळला हो
कीं आमुची कराया, मूर्त प्रळयाग्नि राख, वळला हो १५

भीम पुन्हा दुःशासनरक्तें अंजलि भरोनियां डोले
मिटक्या देउनि पाहुनि कर्ण-सुयोधनमुखांकडे बोले १६

"पीतों हें रक्त तुझें हांसत होतासि मज जसा भणगा
दुःशासना ! तसा तूं पुनरपि गोंगोंः[5] स्वआननें म्हण गा १७

मज काळकूटदूषित भोजन दिधलें प्रमाण[6] कोटींत
मर्मीं सर्प डसविले काळाच्या घातलेंचि ओटींत १८

१ प्रतिज्ञा. २ आपल्या शत्रूचें रक्तरूपी पाणी. ३ सिंह. ४ शत्रु-योद्धे-राजे आणि सारथी. ५ 'गाय, गाय' असा शब्द. ६ कोटिप्रमाणांत.

आधीं निमग्न केलें ऐसें अतिदुस्तर प्रमोहांत
बांधोनि बुडविलें मग मज सरितेच्या गभीर डोहांत १९
जतुगृह[1]दाह द्यूतीं श्रीस्त्रीवस्त्रापहार वनवसती
दुःखें विराटभवनीं जीं बहु कोणींहि भोगिलीं नसतीं २०
काय करूं काळानें अभय दिलें घेतलास तूं पदरीं
दुःशासना ! कुळक्षयमूळा तुज रक्षिता दुजा न दरीं[2]" २१
ऐसें बोलत हांसत शत्रुरुधिरदिग्ध[3]पाणिमुख विकट
प्रकट महाभैरवसा नाचत गेला जयाच्युतां निकट २२

दुःशासनाचा अशा रीतीनें वध झाल्यावर पांडवांना एक अतुर्बळी वैरी निवटल्याचें समाधान झालें. कौरवांकडे तितकीच आग भडकली. कर्णपुत्र वृषसेन अर्जुनावर येऊन थडकला. त्यानें थोडा वेळ कृष्णार्जुनांना चांगलेंच चकित केलें. पण शेवटीं अर्जुनाच्या बाणाला तो बळी पडला. पुत्राचा मृत्यु पाहून कर्ण जणूं दुसरा प्रलयरुद्र झाला. दोघे महामारीला पेटले. शस्त्रांनीं काम भागेना, तेव्हां त्यांनीं अस्त्रयुद्ध सुरू केलें. तरीहि कोणी हटेना. अखेर दोघेहि दमले. आणि याच वेळीं कर्णानें आपल्या भात्यांतला अेक विशिष्ट बाण काढला. तो बाण नसून साक्षात् तक्षकच बाणरूपानें तिथें राहिला होता. त्याला अर्जुनाच्या हृदयाला डसायचें होतें. तो बाण जेव्हां सुटला तेव्हां सहस्र विजा चमकल्यासारखें झालें. अर्जुनाचा कंठ लक्षून तो सुसाट जात होता. देवाला तें कळलें. अर्जुन जगत नाहीं असेंहि क्षणभर वाटलें. गोष्ट खरोखर तशीच होती. पण परमात्मा सारथी होऊन कशाला बसला होता तिथें! त्यानें बाण जवळ यायच्या वेळीं अर्जुनाच्या विजय रथावर डोंगराचा भार आणला. घोड्यांचे पाय दुमडले. रथ वांकला आणि तो बाण अर्जुनाचा मुकुट उडवून पसार झाला. जिवावरचें मुकुटावर निभावलें.

---

१ लाक्षागृहदाह. २ संकटांत. ३ शत्रूच्या रक्तानें भरलेले हात आणि तोंड.

# कर्णाची वीरशय्या

अर्जुनानें किरीटाऐवजीं शेला डोक्याला गुंडाळला. तो बाणरूपी तक्षक परत कर्णाकडे येऊन म्हणाला. 'माझें पहिलें संधान चुकलें. मला पुन्हां धनुष्याच्या दोरीला लावून सोडून दे. या खेपेला मी तुझ्या आणि माझ्या वैऱ्याचा जीव घेईन.' पण कर्णानें तें मान्य केलें नाहीं. तो म्हणाला कीं, 'मला तुझ्या बळावर शत्रु मारायचा नाहीं. तूं तुझ्या मार्गानें चालता हो.' कर्ण पुनश्च लढूं लागला. त्यानें अनेक बाण सोडून कृष्णार्जुनांच्या अंगाची चाळण करून टाकली. मग कृष्ण अर्जुनाला बोलला कीं, 'आतां वेळ आणीबाणीची आहे. कर्ण असा तसा आटपायचा नाहीं. तूं शिवानें दिलेला बाण भात्यांतून काढ.' अर्जुन त्या तयारीला लागला. येवढ्यांत कर्णाच्या रथाचें चाक भूमीनें गिळलें. वायुवेगानें फिरणारा त्याचा रथ एकाएकीं जमिनींत रुतून बसला. कर्ण खालीं उतरून तें वर काढण्याचा प्रयत्न करूं लागला. सगळें बळ खर्च केलें. पण चक्र वर येईना. विप्रशापानें तें रुतलें होतें, तिथें कर्णाचें काय चालणार! त्याचा काळ समीप आला. त्यानेंहि तें जाणलें.

इकडे अर्जुनाचे बाण सूं सूं करीत येतच होते. पण कर्णाचे हात मात्र अडकले होते. तो अर्जुनाला म्हणाला. "एक घटकाभर थांब. मला एवढें रथचक्र वर काढूं दे. मी मरणाला भीत नाहीं; पण तुला तरी धर्मयुद्धाचे नियम टाकून असूं देत." त्याला अर्जुनानें प्रत्युत्तर देण्याच्या पूर्वी भगवंतानेच तें दिलें.

"कोणाला सांगतोस धर्माधर्माच्या गोष्टी! आतांच तुला धर्म आठवला काय? तुम्हीं कौरवांनीं द्रौपदी सती भरसभेत ओढलीत. कपटद्यूत खेळलांत. पांडवांना परोपरीनें गांजलेंत. त्या वेळीं कुठें गेला होता तुमचा धर्म? सगळ्यांनीं चौमेरीं धाड घालून अभिमन्यु बाळाला मारलेंत. त्या वेळीं कुठें गेला होता तुझा धर्म?..."

आणि एवढ्यांत तो अर्जुनाकडचा शिवदत्त बाण धनुष्याच्या दोरीपासून सुटला. तो तेजानें धगधगणारा बाण सर्वांचे डोळे दिपवीत कर्णाच्या कंठ-नाळाला भिडला. दुसऱ्याच क्षणीं कर्णाचें शिरकमल अंतराळांत उडालें. कर्णाच्या मुखांतून एक किरणशलाका बाहेर निघाली आणि सूर्यमंडळांत प्रविष्ट

होऊन निमाली. पांडवसैन्यांत जयवाद्यें दुमदुमलीं. स्वर्गांत देवेंद्राला हर्ष झाला. दिव्य सुमनें अर्जुनावर वर्षलीं. सूर्यानें दुःखाश्रु ढाळले. पांडवांकडचे वीर अत्यानंदानें एकमेकांना खेंव देऊं लागले. कर्ण-दुःशासनांसारखे महाप्रतापी शत्रु एकाच दिवशीं स्वर्गाची वाट चालूं लागल्यामुळें पांडवांना अर्धे युद्ध जिंकल्यासारखें वाटलें. त्यांचा आत्मविश्वास बळावला. शल्य रिकामा रथ घेऊन कौरवांच्या शिबिराकडे परतला. दुर्योधनाला आपला परम मित्र नव्हे; तर अर्धा प्राणच निघून गेल्यासारखें वाटलें. तो आंसवांनीं भुई भिजवूं लागला. दुर्योधन खरा खचला तो त्या दिवशीं आणि त्या वेळीं. कृष्णकृपेचें बळ अद्भुत खरें!

---

## शल्य—सौप्तिकपर्व

युद्धाचे सतरा दिवस संपून अठरावा उजाडला. कर्णाच्या मृत्यूमुळें रिकामी झालेली सेनापतीची जागा त्या दिवशीं दुर्योधनानें शल्याला दिली. शल्याची पाठी राखा म्हणून समस्त वीरांना आज्ञापिलें. शल्यानें सगळें सैन्य गोळा करून सर्वतोभद्र व्यूह रचला आणि तो स्वतः व्यूहद्वारावर राहिला. श्रीकृष्णानें त्या दिवशीं धर्माला शल्यावर पाठवलें. शल्य पांडवांच्या सेनासागराचें आचमन करीत चालला. त्यानें धर्मालाहि बरेंच जर्जर केलें. पण त्या दिवशीं धर्मानें शल्यवधाचा पणच केला होता. सामान्य शस्त्रांनीं शल्य आटोपत नाहीं असें दिसतांच त्यानें आपल्या भात्यांतून काळशक्ति उपसली. तिच्यावर अथर्वण मंत्राची मारणी टाकली. धर्माच्या धनुष्यापासून शल्याचा कंठ लक्षून ती निघाली. तिनें शल्याचें हृदय फोडलें आणि मग पाताळांत घुसून ती विझली. वृक्ष उन्मळून पडावा तसा शल्य भूमीवर पडला.

इकडे सहदेव आणि शकुनि यांची गांठ पडली. सहदेवाला मारण्यासाठीं शकुनि खड्ग उपसून धांवला. सहदेवानें त्याचे शतखंड केले. गदा फेंकली, तिचेंहि पीठ केलें. शक्ति सोडली, तीहि मोडून काढली. तो मग शकुनीवर गर्जून उठला. आजवर कौटिल्य आचरलेंस त्याचें आज माझ्या हातून फळ भोग.' असें म्हणून त्यानें शकुनीचे ध्वज, तुरंग, सारथी, मोडून खिळखिळे केले. शकुनि खालीं उतरून पळूं लागतांच त्यानें प्रथम त्याचे पाय तोडले नि मग दोन्ही हात. शकुनि लोळागोळा होऊन पडणार एवढ्यांत सूर्यमुख बाणानें त्याचें शिरहि धडावेगळें केलें. सहदेवाचें हें वीरकर्म पाहून चौघांहि बंधूंनीं पाठ थोपटून त्याला क्षेम दिलें. शकुनीचें उरलें सुरलें सैन्य मग अर्जुनानें स्वाहा केलें. कौरवांच्या अकरा अक्षौहिणी आटल्या. पांडवांचा दळभारहि किंचिन्मात्रच उरला. कुरुक्षेत्र हें कृतांतक्षेत्र बनलें. प्रेतांचा खच पडला. रक्ता-मांसाचा चिखल झाला.

## भीम-दुर्योधनांचा समरप्रसंग

दुर्योधनानें तें सर्व पाहिलें. पहातां पहातां त्याचीं गात्रें दुर्बळ, निस्सत्त्व झालीं. त्याला त्या रणभूमीवर रहावेना. तो हातांतली गदा खांद्यावर टाकून

कोणाला कळूं न देतां तिथून निसटला. दूर अंतरावर कृष्णद्वैपायन नांवाचा एक डोह होता, त्यांत जाऊन त्यानें उडी घातली. पांडव त्याला शोधूं लागले; पण तो गवसेना. त्याचें स्थान सांगेल त्याला धर्मराजानें बक्षीस लावलें. फांसेपारध्यांनीं तें सांगून धर्माकडून बक्षीस मिळवलें. कृष्णासह पांडव त्या डोहावर गेले. दुर्योधन जलस्तंभन करून डोहांत पहुडलेला त्यांनीं पाहिला. धर्मराज त्याला म्हणाला.

"सुयोधना, बाहेर ये. आतां लपून काय उपयोग! उगाच क्षात्रधर्माला मात्र डाग. ऊठ, समरांगण गाजव. राज्य अथवा स्वर्ग यांपैकीं एक कांहीं तरी साधून घे."

"मी आज थकलों आहें. आतां युद्धाची हौसहि भागली. कोणी राहिलें नाही माझें आतां. हें सगळें साम्राज्य तूंच उपभोग. मी वनांत जाऊन आयुष्य कंठीन."

"छेः छेः! तें आतां होणें नाहीं. तूं दिलेलें भिकेचें साम्राज्य नको आम्हांला. ज्या वेळीं आम्ही अवघे पांच गांवें मागत होतों त्या वेळीं बोललास कीं, 'सुईच्या अग्रावर राहील एवढी मातीहि देणार नाहीं.' आता काय तो सोक्षमोक्ष होऊं दे."

धर्माचें हें वाक्ताडन दुर्योधनाला सहन झालें नाहीं. वारुळांतून नाग फुस्कारत बाहेर यावा तसा तो डोहांतून बाहेर पडला. त्यानें आपली गदा पेलली. भीमहि आपली गदा घेऊन उठला. त्यानें हांक फोडून ब्रह्मकटाह गाजवला. 'शकुनीच्या दुष्टमतीला भाळून पापकर्म केलींस. भोग आतां त्याचीं कडू फळें.' तो दुर्योधनाला म्हणाला. दुर्योधनानें त्यावर लगेच प्रत्युत्तर केलें, 'वृथा वल्गना नकोत. आज माझ्या हातून तुझ्या हाडांचें पीठ व्हायचें आहे. अरे, अखेर हस्तिनापुरचा सम्राट् मीच!'

एवढ्यांत तीर्थयात्रेला गेलेला बळराम तिथें आला. दोघांहि वीरश्रेष्ठांनीं त्याला नमस्कार केला. त्यानें वर्तमान प्रसंग जाणून घेतला आणि सांगितलें कीं, 'लढायचेंच असेल तर इथें नको. स्यमंतपंचक क्षेत्रावर चला. तें विख्यात मोक्षदानी तीर्थ आहे. जो तिथें पडेल तो उत्तम लोक पावेल.' बलभद्राची आज्ञा मान्य करून भीम-दुर्योधन आणि त्यांचे सांगाती स्यमंतपंचकावर आले.

तिथें गदायुद्ध जुंपलें. दोघेहि हांक फोडूं लागले. भीमानें करकरा दांत खाल्ले. ‘ कुलांगारा! द्रौपदीला भरसभेंत मांडी उघडी करून दाखवली होतीस ना? तीच मी आज फोडून चिरडून टाकीन. ’ भीमाची गदा वैऱ्याच्या काळजावर आदळली. पण तो खचला नाहीं. त्यानेंहि भीमाला मर्मप्रहार केला. दोघेहि रक्तबंबाळ झाले. जणूं फुललेले पळसच. दोघेहि नानामंडलें दाखवूं लागले. स्थिरक, चमक अशा गती घेऊं लागले. गदेशीं गदा झगडतांच तिथें महाज्वाला उठूं लागल्या. मांडी खुंटी घ्यायची, मधेंच उडी मारायची. याची लाथ त्याला; त्याची लाथ याला. दोघेहि तिडमिडायचे ; पण पुन्हां उठायचे.

इतर मंडळी भोंवतीं उभे राहून हें अभूतपूर्व हृदयभेदक गदायुद्ध पाहूं लागली. अर्जुनाला क्षणभर विवंचना पडली कीं, हें युद्ध कोण जिंकणार! आपल्या भीमाचें काय होणार! त्या दोघांत कोणीहि सरस–नीरस नव्हता. दोघेहि सारखेच सबळ, सारखेच कुशल. बराच वेळ ती देमार, घेमार चालली. कोणी हटेना, कोणी बधेना. शेवटीं भगवंतानें भीमाला संकेत केला. ‘ मांडीवर गदा घाल ’ हा त्याचा अर्थ होता. भीमाला तो पटला. संधि साधून त्यानें दुर्योधनाच्या डाव्या मांडीवर प्रहार केला. ती विदीर्ण झाली. दुर्योधन भूमीवर पडला. त्याला भयानक मूर्च्छा आली. आतां तो जगत नाहीं, परत उठूं शकत नाहीं हें सर्वांना कळलें. अठरा दिवसांच्या रणयज्ञाची दुर्योधन ही पूर्णाहुति होती. भीमानें ती दिली.

रणभूमि ओस पाडून विजयाचा तुरा मिरवीत पांडव शिबिराकडे निघाले. अर्जुनानें गांडीव धनुष्याची दोरी सोडली. भाता बांधून ठेवला. कृष्णार्जुन विजयरथावरून खालीं उतरले. ध्वजस्तंभावरच्या मारुतीनें लगेच त्यांचा निरोप घेतला. तो सेतुबंधाला चालता झाला. देव खालीं उतरतांच रथानें एकदम पेट घेतला. धर्म–भीम देवाला विचारूं लागले कीं,‘ हें काय अद्भुत ? ’ देव म्हणाले. ‘ शत्रूंनीं सोडलेल्या अस्त्रदेवता अर्जुनाचा प्राण घेण्यासाठीं टपल्या होत्या. पण माझ्या शक्तीपुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. त्या रागानें त्यांनीं आतां हा रथ जाळून टाकला. ’ त्या वेळीं पांडवांना कळून चुकलें कीं, देव पाठीराखा होता म्हणूनच आपण या रणाच्या खाईतून सुखरूप बाहेर आलों. त्यांचा अभिमान गळाला. मग सर्वांनीं मनोभावें कृष्णस्तवन केलें.

नंतर भगवान् हस्तिनापुरीं जाऊन धृतराष्ट्राला भेटला. त्याचें आणि

गांधारीचें त्यानें सांत्वन केलें. 'आतां तुम्हीं एक करा. पांडवांनाच आपले पुत्र माना. धर्म तुम्हाला कधींहि अंतर देणार नाहीं.' एवढ्यांत व्यासमुनिहि तिथें प्रगटले. त्यांनींहि कृष्णवचनाचाच अनुवाद केला. त्या दोघांचा निरोप घेऊन श्रीहरि माघारां फिरला. जगजीवन आलेला पाहून पांडव आनंदले.

इकडे दुर्योधन रणभूमीवर लोळत होता, विवळत होता. अजून त्याच्या कुडीची नि प्राणांची ताटातुटी झाली नव्हती. सर्वांग धुळीनें भरलें होतें. त्यांतच रक्त भळभळत होतें. एवढ्यात अश्वत्थामा तिथें आला. दुर्योधनाची ती अवस्था पाहून त्याला रडूं कोसळलें. दुर्योधन त्याला बोलला, 'आमचें दैव फिरलें. म्हणून ही अवदशा आली.' अश्वत्थाम्याला ते बोल सहन झाले नाहींत. हात चोळून, दांत खाऊन तो दुर्योधनाला म्हणाला.

"अजून दैव फिरलें म्हणूं नको. अजून युद्ध संपलें असें समजूं नको. मी आहें. माझा पराक्रम आहे. आत्तांच्या आत्तां मी पांडवांचीं आणि पांचाळांचीं शिरकमलें तुझ्या पायीं आणून वहातों. तरच मी नांवाचा अश्वत्थामा — "

दुर्योधनाला तशा त्या मरणोन्मुख अवस्थेंतहि हर्ष झाला. त्यानें जलकलश भरून आणवला आणि सेनापति म्हणून अश्वत्थामा अभिषेकिला. एवढ्यांत सूर्यास्त झाला. कौरवांच्या बाजूनें आतां फक्त तिघेच उरले होते. कृतवर्मा, कृपाचार्य आणि अश्वत्थामा. एका वटवृक्षाखालीं त्यांनीं आपला रथ सोडला आणि चिंता, शोक करतां करतां ते तिथेंच झोंपले. दोघांना झोंप लागली ; पण अश्वत्थाम्याला मात्र निद्रा येईना. महासर्पासारखा उष्ण निःश्वास टाकीत तो नुसता पडला होता. होतां होतां रात्र वाढली. त्या वटवृक्षावर हजार कावळ्यांचीं घरटीं होतीं. ते सुखानें झोंपले होते. एवढ्यांत कुठून तरी एक घुबड तिथें आलें आणि एक, दोन, तीन करीत सगळ्या कावळ्यांच्या माना मुरडून पसार झालें. अश्वत्थाम्यानें तो प्रकार पाहिला. त्याला वाटलें कीं, हा आपला गुरु. याच्यासारखेंच आपणहि करायचें. पांचाळ आणि पांडव यांचा असाच झोपेंत घात करायचा. त्यानें त्या दोघांना उठवून आपला बेत सांगितला. पण त्यांना तो मानवला नाहीं. त्यांनीं अश्वत्थाम्याची निर्भर्त्सना केली.

पण तो या वेळीं लज्जा, नीति, धर्म सगळें गुंडाळून बसला होता. त्यानें लगेच रथ हांकारला. तेहि दोघे मग त्याच्या मागून निघाले. अश्वत्थामा पांडव-

शिबिरांत शिरला. त्यानें त्या दोघांना द्वारावर उभें केलें. काळी मिट्ट रात्र आणि तितकाच अंतर्बाह्य काळा कृतांत अश्वत्थामा. तो प्रथम धृष्टद्युम्नाच्या शिबिरांत गेला. त्याला उठवून त्यानें एकाच घावांत ठार केलें. मागून द्रौपदीचे पांचहि पुत्र स्वर्गाला पाठवले. पांडवसैन्याच्या सात अक्षौहिणींपैकीं उरला सुरला भाग त्यानें त्या रात्रीं काळधाड घालून संहारला. मग त्या शिबिरांना आग लावून दिली. पांच पांडव सोडून सगळयांची अश्वत्थाम्याच्या क्रोधाग्नींत आहुति पडली.

देवाला हें स्वप्न आधींच पडलें होतें. वेगळया भागांत एक नवेंच शिबिर उभारून तो त्या रात्रीं पांडवांसह तिथें राहिला होता. अश्वत्थाम्यानें थैमान घालीत इकडे तिकडे पांडवांना शोधलें. पण देवानें ज्यांना लपवलें ते अश्वत्थाम्याला कुठून गवसणार! झालें तें पुष्कळच झालें असें समजून तो विवळत्या दुर्योधनाकडे आला. त्यानें त्याला केलेलें सगळें सूडकृत्य निवेदलें. 'माझा मनोरथ तूं पूर्ण केलास' म्हणून दुर्योधनानें त्याला धन्यवाद दिले आणि शेवटचा हुंकार देऊन प्राण सोडला. तिघांच्याहि नेत्रांतून दुःखाच्या धारा लागल्या. अशा प्रकारें अठरा दिवसांत अठरा अक्षौहिणींचें सर्पण खलास होऊन त्या महायुद्धाचा भडका शांत झाला.



# स्त्री–शांतिपर्व

त्या रात्रीं अश्वत्थाम्यानें जी संहाराची आकस्मिक खाई पेटवली, त्यांत पांडवसैन्य समाप्त झालें आणि शिबिरांचीहि जळून राख झाली. त्या वणव्यांतून एकटाच वांचून बाहेर पडला तो म्हणजे धृष्टद्युम्नाचा सारथी. तो आक्रांत करीत पांडवांच्या शिबिराकडे धांवला. 'अहो उठा ; निजलांत काय? अश्वत्थाम्यानें तुमचा कुलक्षय केला!' त्यानें टाहो फोडला. पांडव ताड्कन उठले. कृष्णा-सहित आपल्या तळावर आले. पहातात तों सगळी राख! अधून मधून प्रेतांचा खच. क्षणभर सगळे सुन्न झाले. मग दुःखसागरांत बुडाले. नकुल रथ घेऊन उपप्लव्याला गेला. द्रौपदी-सुभद्रा तिथें होत्या. त्यांना घेऊन लगेच परतला. आपल्या पुत्रांचीं कलेवरें पाहून त्यांचीं काळजें उपडीं पडलीं. द्रौपदी गडबडां लोळून आपल्या तोंडांत माती घालूं लागली. सुभद्रेनें आक्रोश मांडला. 'माझ्या सात मुलांपैकीं एकाचें तरी निर्मळ मुखकमल मला दाखवा हो! कसे तुम्ही असे जड झालांत! कसे निर्दय झालांत!' द्रौपदी म्हणाली, 'माझे मुलगे लढतां लढतां मरते तर मीं एवढें दुःख केलें नसतें. पण त्या क्रूरकर्म्यानें झोंपलेल्या अवस्थेंत त्यांना मारलें हें नाहीं सहन होत.'

## अश्वत्थाम्याची विटंबना

तो अश्वत्थामा चांडाळ बाळहत्यारी परम खळ
त्याचें शिर छेदूनि तत्काळ उठा आणा आतांची १

नाहीं तरी जीवाशा सोडून एथेंच आम्ही देऊं प्राण
ऐसें ऐकतां भीमसेन क्रोधेंकरूनि उठिला पैं २

भीम बैसला रथीं नकुल जाहला सारथी
मग बोले कमलापति पार्थाप्रती तेधवां ३

ब्रह्मशिरोस्त्र दारुण अश्वत्थामा देईल टाकून
तेव्हां कैंचा उरेल भीमसेन भस्म होईल क्षणार्धें ४

तरी अर्जुना धांव सत्वर बैसावया नाहीं रहंवर
मग श्रीकृष्णरथीं सुभद्रावर धर्मराजहि बैसला ५

धुरेवरी बैसला इंदिरावर भीमास आटोपीत सत्वर
परी धांवतां नाटोपे वृकोदर पवनवेगें धांवतसे ६

तों जान्हवीचे तीरीं व्यासदेव देखिले ते अवसरीं
ऋषींची [1]मांदी निर्धारीं भोंवतीं तेव्हां विराजे ७

व्यासाचे पाठीं लपोन बैसलासे द्रोणनंदन
भीमास दुरून देखोन भयभीत जाहला ८

पाहोन भीमाचा आवेश वाटे येतो काळपुरुष
भीमें हांक फोडिली विशेष तेणें ब्रह्मांड गाजविलें ९

मग क्रोधायमान गुरुपुत्र काढिलें निर्वाणींचें अस्त्र
ज्याचें निवारण हरिहर विधि पुरंदर[2] करूं न शकती १०

तें अस्त्र द्रोणें पुत्रास दिधलें जरी बहुत प्राणसंकट पडलें
ते वेळे हें सोड धहिलें कार्य चिंतिलें करणार ११

तें अस्त्र द्रौणी जपोन ध्यानमंत्रन्यास करून
मग दर्भशिखा[3] घेऊन संकल्प करून सोडित १२

म्हणे हें महाप्रलयास्त्र येणें संहरोत पांडव समग्र
त्यांचे स्त्रियांचे पोटीं असेल साचार गर्भ जरी कोणीही १३

१ मेळावा. २ इंद्र. ३ दर्भाची काडी.

गर्भांत असेल जरी पुरुष । तोही या अस्त्रें पावेल नाश
मग तो दर्भ सोडितां निःशेष । [1]चपलेऐसा चालला ॥ १४

श्रीरंग म्हणे अर्जुनासी । त्वरा करीं काय पाहसी
तुम्हां पांचांसही ग्रासी । ऐसें अस्त्र येतसे ॥ १५

ब्रह्मशिरो नाम अस्त्र । तूंही आतां सोडी सत्वर
तेणें चापास लावून शर । त्याच प्रकारें सोडिलें ॥ १६

प्रलय करीत जात ते क्षणीं । दोन्ही अस्त्रें मिळोनि गगनीं
त्या [2]तेजावर्तीं [3]शशि-तरणी । बुचकळ्या देऊं लागले ॥ १७

प्रलयींच्या विजा सहस्र । एकदांच कडकडिल्या साचार
तैशीं अस्त्रें मिळालीं एकत्र । प्रलय थोर वर्तला ॥ १८

ब्रह्मांड तडाडिलें ते काळीं । नवखंडें कंपित जाहलीं
समुद्रांचीं उदकें तापलीं । उकडों लागलीं जलचरें ॥ १९

सप्त पाताळें हडबडती । [4]भोगींद्रें सोडूं पाहे क्षिती
मेरुमंदार आंदोळती । मुनी भाविती अंत झाला ॥ २०

व्यासदेव बोले ते समयीं । अस्त्रें आवरा रे दोघेही
हीं मनुष्यावरी सहसाही । सोडूं नका सर्वथा ॥ २१

पार्थ म्हणे स्वामी समर्था । तुझी आज्ञा माझिया माथां
महाअस्त्र क्षण न लागतां । आवरोनि आच्छादिलें ॥ २२

---

१ विजेसारखा. २ तेजाच्या भोंवऱ्यांत. ३ चंद्र-सूर्य. ४ शेष.

परि द्रोणपुत्रासी जाणा ब्रह्मास्त्र कदा आवरेना
उपाय केले परी नाना आटोपेना कदाही २३

द्रौणी म्हणे भीमभयेंकरूनी म्यां क्रोधें सोडिलें संकल्पूनी
परी हें आतां कदा माझेनी सहसाही आटोपेना २४

तरी माझें अस्त्र अनिवार गर्भांचे आदिकरूनि समग्र
उरों नेदी पांडव साचार हा निर्धार चुकेना २५

मग बोले गोविंद उत्तरेस दिधला विप्रांनीं आशीर्वाद
युद्धांतीं दिव्य पुत्र प्रसिद्ध परीक्षितिनामें होईल २६

द्रौणि म्हणे माझें अस्त्र उपप्लव्यास जाईल सत्वर
न लागतांहि क्षणमात्र गर्भ छेदील उत्तरेचा २७

मग बोले चक्रपाणी तूं बालहत्यारा पापखाणी
तीन सहस्र वर्षें घोरवनीं पिशाच होऊन विचरे पैं २८

कोणी सत्पुरुष ब्राह्मण त्याचें तुज न होय दर्शन
जैसें दीपाचे पोटीं काजळ कुलक्षण द्रोण उदरीं तैसा तूं २९

पांडवांस मी आहें रक्षक तूं त्यांस काय करिसी मशक
घुंगुरडें कोपलें जरी निष्टंक[1] तरी पर्वत केवीं त्या गिळवे ३०

आतां छेदीन म्हणसी उत्तरेचा गर्भ तरी रक्षीन त्यास मी पद्मनाभ
गोकुळ रक्षिलें स्वयंभ प्रलयशिला वर्षतां ३१

१ अत्यंत.

द्वादश गांवें लागला अग्न म्यां गिळून रक्षिले गोकुळजन
प्रल्हाद गांजितां दारुण म्यांच रक्षिला नानापरी ३२

तो परीक्षिति रक्षीन नानापरी तरीच मी भक्तसाहकारी
साठ सहस्र वर्षें निर्धारी राज्य करील पुण्यपुरुष ३३

कृपाचार्यापासोन पावेल विद्या संपूर्ण
उपजला नसतां जाण भविष्य केलें जाण हें ३४

—श्रीधरकृत पांडवप्रताप, अ. ५३

भगवान् ऐवढें बोलतो न बोलतो तोंच अर्जुनानें बाण सोडून अश्वत्थाम्याच्या मस्तकींचा मणि छेदून घेतला. त्यासरशीं अश्वत्थामा चिरंजीव असूनहि प्रेतवत् झाला. जिथून मणि काढून घेतला, ती जखम सारखी वाहूं लागली. सर्वांगीं गलित कुष्ट निर्माण झालें आणि या सगळ्या व्यथा–वेदना असह्य झाल्यामुळें तो पिशाचासारखा उत्तर दिशेकडे धांवत सुटला.

अर्जुनानें तो मणि आणून द्रौपदीच्या हातीं दिला. तिनें तो धर्मराजाला अर्पिला. कृष्णार्जुनांनीं द्रौपदीचें खूप सांत्वन केलें. एवढ्यांत उत्तरा 'धांवा, धांवा' म्हणून ओरडली. अश्वत्थाम्याचें तें अस्त्र पांडवांचा समूळ वंशक्षय करण्यासाटीं उत्तरेच्या उदरांत शिरलें होतें आणि ती म्याली होती. ती आठ महिन्यांची गर्भवती होती. त्या गर्भाचें संरक्षण करण्यासाटीं भगवंतानें तात्काळ अंगुष्ठमात्र रूप धारण केलें आणि हातीं सुदर्शन घेऊन तो उत्तरेच्या उदरांत प्रवेशला. गर्भाला स्पर्श करण्यापूर्वीच भगवंतानें तें अस्त्र निष्फळ करून टाकलें. तो गर्भ आपल्या रक्षणकर्त्याकडे टक लावून पाहूं लागला. ती मूर्ति त्यानें आपल्या अंतरांत ठसवून घेतली. नंतर थोड्याच वेळांत उत्तरा प्रसूत झाली. पुत्ररत्न जन्मलें. अनेक स्त्री-पुरुष त्याला पहायला आले. जो जवळ येईल त्याच्याकडे टक लावून पहायचें आणि तो ओळखीचा नव्हे असें ठरलें कीं दृष्टि फिरवायची असें त्या बालकानें सुरू केलें. तो श्रीकृष्णाचें रुपडें शोधीत होता. त्याला त्याचें ध्यान लागलें होतें. सर्वांना त्या गोष्टीचें



धर्मराजानें सोडलेला अश्वमेधाचा श्यामकर्ण. — पृ. १८८

आश्चर्य वाटलें. धर्मराजानें परीक्षिति असें त्याचें नामकरण केलें. त्या एकुलत्या वंशतंतूचे सगळे सोहळे केले, करवले.

## धृतराष्ट्रविलाप

दुर्योधनासह शंभर पुत्र अवघ्या अटरा दिवसांत काळाचें खाजें झाल्याचें समजल्यावर धृतराष्ट्राला अनिवार दुःख झालें. तो भूमीवर पडून कपाळ आपटूं लागला. वृद्धपणीं आपले पंख तोडले गेले म्हणून विव्हळूं लागला. हें भविष्य व्यास-नारदांनीं पूर्वींच सांगितलें होतें; पण मी चांडाळानें ते ऐकलें नाहीं, असा त्याला आता पश्चात्ताप झाला. गांधारीची अवस्थाहि मोठी कठिण झाली. तिच्या पोटांतून उमाळे उठूं लागले. नेत्रांतून खळखळां अश्रू वाहूं लागले. आपल्या शंभर सुना विधवा झाल्या हें तिला अतिदारुण वाटलें. तो प्रसंग पाहून संजयहि गहिवरला. त्यानें त्या दोघां वृद्धांचें सांत्वन आरंभिलें.

" संसार म्हणजे अभ्राची सावली. विद्युल्लतेची प्रभा. इथलें सुख क्षणिक. जीव या नाशिवंत सुखाला भुलतात आणि पुढच्या दुःखाची जाणीव धरीत नाहींत. धृतराष्ट्रा ! कशाला उगाच रडतोस ? तुझें कुळ संहारलें गेलें हें खरें ; पण पांडवांचें तरी काय राहिलें आहे ! युद्ध, द्वेष, कलह यांची परिणति ही अशीच व्हायची. आतां तरी मनांतला कुढा भाव सोड. पांडव हे आपलेच पुत्र असें मान. त्यांच्यावरच स्नेहाची वृष्टि कर. तुला पुढें तिलांजलि तेच देतील. आपलेंच कर्म आपल्याला तारक अथवा मारक होतें. दुर्योधनादिकांचीं दुष्कर्मे अंतीं त्यांनाच फळाला आलीं. त्यांनीं आपल्या हातानें घराला अग्नि लावला. स्वतःच्या हातानें स्वतःच्याच उरांत शस्त्र खुपसून घेतलें. तूंहि त्यांना सर्व प्रकारें फूस दिलीस. आतां कशाला रडावें ! "

विदुरानेंहि याच प्रकारचा उपदेश करून धृतराष्ट्राला पुढील क्रमप्राप्त कर्तव्याला उभें केलें. धृतराष्ट्र, गांधारी, कौरवस्त्रिया ही सर्व मंडळी कुरुक्षेत्राकडे निघाली. त्यांच्या मागून पौरजन निघाले. हस्तिनापुर भणभणीत झालें. भरलीं मंदिरें ओस पडलीं. रणांगणांत मेलेल्या माणसांजवळ, जितीं असूनहि मृतप्राय झालेलीं आप्तेष्ट माणसें गोळा झालीं. धर्मानें पुढें होऊन धृतराष्ट्राला नमस्कार

केला. धृतराष्ट्रानें प्रीतीच्या पाडिभरानें त्याला हृदयाशीं धरलें. धृतराष्ट्र त्याला म्हणाला, 'मला भीम भेटवा हो!' देवाला त्यांतलें कपट उमगलें. त्यानें भीमाला भ्रूसंकेत करून बाजूला ओढलें आणि भीमाएवढाच एक लोहपुतळा धृतराष्ट्रापुढें धरला. अंधानें त्याला कवेंत घेतलें आणि रगडून एका क्षणांत त्याचें पीठ केलें. दुःशासनाचें रक्त पिणाऱ्या आणि दुर्योधनाची मांडी गदेनें फोडणाऱ्या भीमाचा त्याला सूड घ्यायचा होता. पण भक्तप्रतिपाळ करणारा यादवेंद्र तिथें होता म्हणून हें विघ्न निवारलें गेलें. आपण चूर्ण केला तो लोखंडाचा भीम; खरा भीम जिवंतच आहे, हें जेव्हां त्याला समजलें तेव्हां तो काळ्या अंतःकरणाचा म्हातारा परमलज्जित झाला.

धर्मराजानें नंतर गांधारीचे पाय धरले. 'माते, मी अन्यायी आहें. मी कुरुकुलाचा संहार केला. मला जिवंत ठेवूं नको. शापून भस्म कर.' धर्माचे हे कळवळ्याचे बोल ऐकून गांधारीचें हृदय स्नेहभरानें उचंबळलें. 'धर्मा, नियति टळत नाहीं. होणार तें चुकत नाहीं. तूं उगाच मनाला लावून घेऊं नकोस. तूं सुखानें नांद आणि राज्य कर.' ती साध्वी मोकळ्या मनानें बोलली. एवढ्यांत समस्त कौरवस्त्रिया रणभूमीवर धांवल्या. पति-पुत्रांचीं कलेवरें उराशीं कवटाळून दीर्घ स्वरानें आक्रंदूं लागल्या.

## कौरवस्त्रियांचा शोक

तें सर्व स्त्रीचेष्टित[१] गांधारी दिव्य दृष्टिनें पाहे
कृष्णासि म्हणे 'कोण्ही स्त्री मजसम दुःखिता जगीं आहे!' १

दुर्योधनास भेटे होय तिच्या फार भर विलापाला
दैवें शतपुत्रविपेच्छ्यामेचा[२] तीस मरविला पाळा २

कृष्णा! युद्धारंभीं हा माझा पुत्र मत्पदा लागे
'माते विजय घडाया दे आशीर्वाद मज,' असें मागे ३

१ स्त्रियांचें विलापकर्म. २ शंभर पुत्रांच्या मृत्युरूपी भांगेचा.

वदल्यें मेघश्यामा, या माझ्या नंदनासि[1] मी बा गा !
जिकडे सुधर्म तिकडे जय युद्धीं, न भ्रमें महाभागा ! ४

रडत नसे पुत्रातें, स्वर्गा गेला, न सोडिली संधा[2]
कृष्णा ! रडत्यें मी या दीना हतबांधवा धवा[3] अंधा ५

मुख हुंगिती सुतांचें पतिवर कर फिरविती पहावेना
कृष्णा ! कोणाचा तरि शोक करिल हें मला सहावेना ६

हा दुःशासन कृष्णा ! मेलाही दाखवी न पाठ उनीं
पडला पहा उताणा अभिमान असे असूंसि पाठउनी ७

हा मूढ भ्रात्याचें कर्णाचें प्रिय करावयाहि तसें
साध्वीस सभेमध्यें गांजी तें कर्म या गमे हितसें ८

सौभद्र शिशु शरभसा[4] तो हा संपन्न जो महाक्रौर्यें
तुजहुनि, धनंजयाहुनि अधिक दिढीनें रणीं बळें शौर्यें ९

अंकीं मस्तक घेउनि ती बाळा उत्तरा पहा पतितें
चिबुक[5] धरुनि बोलविते ' लिहिलें ऐसें कसें महापतितें ' १०

म्हणत्ये मौन त्यजुनि स्मितपूर्वक एक बोल बोला जी
ती कसि निवेल तुमच्या प्रियवागमृतींच नित्य लोभी[6] जी ११

हा जन सखीसमाजीं तुमचा सोडूनि काय पद रमला
चुकल्यें क्षमा करावी पसराया उशिर काय पदर मला १२

१ मुलाला. २ प्रतिज्ञा. ३ पतीस. ४ एक महाबलवान् पशु. ५ हनुवटी. ६ लोभी.

नसतां उशी उशीर[1]व्यजन पय:फेनशुभ्र मृदु शयन
कशि निज आली जरि शिर न मदंकीं पदतळींहि हा [2]शय न १३

नेत्रें उघडूनि पहा! दासी तुमचीच हे नव्हे अन्या
भलती स्पर्शेल कसी? मी सत्य विराटनृपतिची कन्या १४

हा सातवा परिचया मास पहा गणुनि लोटले [3]साच
इतुक्यांत कसे विटलां? साधु म्हणति सख्य साधुसी साच १५

आर्या कृ[4]ष्णादेवी, आर्या कृष्णानुजा पृ[5]था आजी
यांवरि रुसलां कैसे जाता सोडूनि कां वृथा आजी? १६

तुजवांचुनि वांचुनि सुख कैंचें हा [6]काय भार तार मला
ने हंस मानसीं निजहंसीवीण काय भारता! रमलां? १७

उदकीं लवण तसें हें करिलचि शोकांत उर विलीन सती
असती मृदु तरि पळ या तापें लोकांत उरविली नसती १८

आयांतें दायांतें म्हणत्ये 'मज लाविली बळेंच [7]सवे'
कां मोडितां तुम्हीच? क्षण आतां स्वपतिवेगळें नसवे १९

पतिजवळुनि कां नेतां नेउनि हितबोध करुनि खोलींत
तुमच्याहि असें अंतर पडलें कां गे क्रियेंत बोलींत? २०

जड सोडवितां हृदयीं देह मनोमयचि उरविला पतिचा
गांधारीनें कथिला, भिजवी प्रभुचेंहि उर विलाप तिचा २१

१ वाळयाचा पंखा. २ हात. ३ सहाच. ४ द्रौपदी. ५ कुंती. ६ देह.
७ संवय.

राधा म्हणत्ये ' हा ! मज पुत्रवतींचीच लागली दृष्टि
पुत्रा ! शून्या झाली तुजवांचुनि जेविं रविविना सृष्टि २२

मजपरिसहि बहु म्हणतिल हे वार्ता परिसतां धरासुर[1] हा !
अस्मद्भाग्यें केला तो कर्ण रणांगणीं परासु[2] रहा २३

द्विज हो ! संतत तुमच्या जो आशीरमृतवृष्टिनें ओला
पार्थदवानें[3] केला कल्पद्रुम भस्म तो कसा ? बोला ! २४

वृषसेना रणिं म्हणते ' नाथा ! तुज न विजयें[4] न गुरुशापें
वधिलें कृष्णाक्षोभें[5] अथवा माझ्याचि पूर्वकृत पापें २५

ब्रह्मण्य[6] शूर दाता बुध सर्वांगोपभोग जो कर्ता
हर्ता शत्रूपद्रव दुष्टे ! महि[7] ! मारिला कसा भर्ता ? २६

मज तुजहि समाचि भजला उपभोगें तोपला विलासवती
अन्या स्वर्गीं नेणे त्यासि कसा दोष लाविला सवती ? २७

मज कां गिळिलें नाहीं ? पापे ! रथचक्र गे कसें गिळिलें ?
दे उत्तर ऐकों दे ! कां न वदसि तोंड काय गे खिळिलें ? २८

धर्मा त्रयोदशाब्द[8] न ज्याच्या चिंतेकरूनि निज लागे
तो हा पुन्हा नुठाया वसुधे ! तुज दृढ धरूनि निजला गे २९

देवा जयद्रथाचें सांपडलें परि नसेचि धड धड तें
आलिंगिलें सुतेनें पाहुनि माझ्या उरांत धडधडतें ३०

१ ब्राह्मण. २ गतप्राण. ३ अर्जुनरूपी वणव्यानें. ४ अर्जुनानें. ५ द्रौपदीच्या क्रोधानें. ६ ब्राह्मणांना हितकर. ७ हे पृथ्वि ! ८ तेरा वर्षे.

कृष्णा हरिली जेव्हां कृष्णा ! हा तेधवांचि मारावा
परि धर्म म्हणे ' बुडतें भगिनीसौभाग्य म्हणुनि तारावा ' ३१

तैसीच या प्रसंगीं धर्में कां दुःशला[1] न आठविली
जाणों युद्धारंभीं करुणा तीर्थाटनासि पाठविली ! ३२

बहुतकरुनि तों एका कन्येच्या या जनांत ज्या माता
त्यांसि गमे स्वतनुपरिस अधिक [2]सुतासूनुपरिस जामाता ३३

येती पुनः पुन्हा शिर हुडकुनि धांवत सुता धडाजवळ
कीं काकगृध्रवृकबक तडतड तोडूनि भक्षिती कवळ[3] ३४

भीष्मप्रभु शर[4]तल्पीं निजला आहे जसा कुसुमतल्पीं
हें शौर्यवीर्य न सुरीं कैसें मनुजीं असेल मग अल्पीं ! ३५

या मार्गें धर्माचें पांडव पुसतील तत्त्व कोणातें ?
हा ! राजनीति विधवा झाली बैसेल धरुनि कोंणातें[5] ३६

सकळां शस्त्रधरांचा हरसा आ[6]चार्य नायक विने[7]ता
पडला पहा परांतें विलया म्हणऊनि ' हाय ' कवि नेता ३७

शिव शिव ! कृष्णा ! क्रव्यादांहीं[8] याचाहि भक्षिला काय
स्वाश्रय[9] न रक्षिला तरि अस्त्रांहीं अर्थ रक्षिला काय ? ३८

कृष्णा कृपी कृशाकृति कृपणा झाली पहा महाशोकें
नाना विलाप करिती गमती कोकीचें[10] टाकिली कोकें ३९

---

१ दुर्योधनाच्या बहिणीचें नांव. २ मुलगा आणि मुलगी यांपेक्षां. ३ घांस. ४ शरशय्येवर. ५ कोपऱ्याला. ६ द्रोणाचार्य. ७ गुरु. ८ हिंस्र प्राण्यांनी. ९ कौरव-पांडव दोघांचाहि आश्रय द्रोण. त्याच्या अरक्षणाचा दोष दोघांनाहि लागतो. १० चक्रवाकी.

हा शकुनि, अमृत परि ज्या विष धर्म-न्याय सत्य घामेलो[1]
नाहींच मनीं कपटद्यूतीं जोडूनि अत्यघा[2] मेला ४०

हे राजश्री व्हाया मम तोकांचा[3] विनाश शिकले तें[4]
तपनालाहि गिळी जो तम तो कां चाविना शशिकलेतें ४१

ऐसें वदोनि दुःखध्वस्तांज्ञाना[5] सती बहुत रडली
धैर्यातें सांडुनि ती गांधारी शोकमूर्छिता पडली ४२

—मोरोपंतकृत, म. भा. स्त्री., अ. ४–५

गांधारीला तो शोकभार सहन झाला नाहीं. विवेकी, विचारी खरी; पण त्या वेळीं ती एकदम क्षोभली. लीलानाटकी श्रीकृष्ण तिच्याजवळ उभा होता. त्याला तिनें त्या उद्वेगाच्या भरांत शाप देऊन टाकला. 'कृष्णा, या सगळ्या संहाराचा कर्ताकरविता तूं. तूंच माझा कुलक्षय केलास. आज जें माझें झालें तेंच शेवटीं तुझेंहि होईल. तुझें यादवकुळ तुझ्या डोळ्यांदेखत निर्मूल होईल!'

श्रीहरीनें तो शाप हंसत हंसत स्वीकारला.

"कौरवांच्या माते, तुझा शाप हा मला उपकारकच आहे. पिंड-ब्रह्मांडाच्या घडामोडी मीच करतों. युगायुगीं अवतार घेऊन मीं दुष्टसंहाराचें कार्य अव्याहत चालवलें आहे. पुढेंहि मी हेंच करणार आहें. कौरवांप्रमाणेंच यादवांचाहि नाश करणें मला भाग आहे. नाहीं तर तेच जगाला खायला उठतील. तेव्हां तुझ्या या शापानें माझें पुढचें संकल्पित कार्य तडीला जावो."

मग धर्मराजानें सगळ्या मृतवीरांना अग्निसंस्कार दिला. विदुर आणि युयुत्सु यांनीं त्याला साह्य केलें. कर्णाला तिळांजलि कोणीं द्यावी याचा विचार धर्मांच्या मनांत येताच कुंती अश्रूंच्या सरी वाहवीत तिथें आली. ती

१ विरघळला. २ अति पापास. ३ मुलांचा. ४ द्यूत. ५ दुःखानें जिचें ज्ञान नष्ट झालें आहे अशी.

धर्माला बोलली. 'धर्मा, कर्णाच्या जातकुळीबद्दल नसत्या शंका घेऊं नको. तो माझा पुत्र आणि तुम्हां पांची जणांचा ज्येष्ठ बंधु आहे. तुझ्या हातून त्याची सगळी उत्तरक्रिया झाली पाहिजे.'

धर्माला हें रहस्य ठाऊक नव्हतें. तें जेव्हां कळलें तेव्हां तो एकदम गहिंवरला. कर्णाच्या थंड देहाला मिठी घालून त्यानें विलाप मांडला. 'महाशूर कर्णा! कां आम्हांला टाकून गेलास? मला हें आधीं कळलें असतें तर मी हें राज्य तुला समर्पिलें असतें आणि तुझी सेवा करण्यांत आनंद मानला असता.' धर्माला एकाएकीं मूर्च्छा आली. कृष्णार्जुनांनीं त्याला सांवरून कसेंबसें शुद्धीवर आणलें.

पुढें धर्मराज कुंतीसह एक महिना गंगातटाकीं राहिला. तिथें त्याच्या भेटीसाठीं विश्वामित्र, दुर्वास, वसिष्ठ, नारद इत्यादि ऋषि-मुनी आले. धर्मानें त्यांना आसनादि उपचार समर्पिले आणि म्हटलें, 'ऋषीश्वर हो, माझ्या हातून कुलक्षयाचें महापाप घडलें आहे. मला आतां राज्याची अपेक्षा उरली नाहीं. मी तुमची सेवा करून माझें उर्वरित आयुष्य घालवीन.'

कर्ण आपला सहोदर बंधु होता आणि त्याच्याशीं आपण मरणांत वैर धरलें याचा त्याला विलक्षण पश्चात्ताप झाला होता. कुंतीनें हें रहस्य आपल्यापासून आजवर चोरून ठेवलें याबद्दल कुंतीविषयींहि त्याच्या अंतरांत तिटकारा उत्पन्न झाला होता. श्रीकृष्णालाहि या बाबतींत तो दोष देऊं लागला होता. आणि म्हणूनच 'जळो तें राज्य' म्हणून तो वनवासांत राहायची योजना करीत होता. ऋषि-मुनींना त्याचा हा उद्वेग आवडला नाहीं. त्यांनीं त्याला बहुत नीतिधर्म उपदेशिले. पण तरीहि पालथ्या घड्यावर पाणी झालें. मग वेदव्यास पुढें आले. त्यांनीं धर्माला सांगितलें, 'हे सर्व मुनीश्वर, छप्पन्न देशींचे राजे आणि अठरा जाती तूं राज्यावर बसून प्रजेचें पालन करावेंस अशी इच्छा करतात. तुला त्यांचें मन मोडतां येणार नाहीं.' श्रीकृष्णानेंहि व्यासांच्या शब्दाला अनुमोदन दिलें. धर्माचा निरुपाय झाला.

## धर्माचा राज्याभिषेक

मग तो उठला. सर्व मंडळीसह हस्तिनापुरांत प्रवेशला. त्याचें आगमन कळतांच चतुर्विध वाद्यें वाजूं लागलीं. नगरांतल्या पुरंध्री जलकुंभ आणि

रत्नदीप हातीं घेऊन त्याला सामोऱ्या आल्या. सकल पौरजनांनीं पुढें येऊन त्याचें स्तवन आरंभलें. नगरजनांना वस्त्रें-भूषणें वांटीत धर्मराज राजवाड्यांत आला. कृष्णाच्या आज्ञेनें तो सिंहासनावर बसणार एवढ्यांत एक राक्षस विघ्न करायला पुढें उभा झाला.

त्याचें नांव चार्वाक असें होतें. त्याची आणि दुर्योधनाची मैत्री होती. तो संन्याशाच्या वेषांत तिथें आला आणि कठोर वाणीनें धर्माला ताडन करूं लागला. 'तूं कुलघातकी आहेस. तुझ्या हातून गुरुहत्याहि घडली आहे. तुला राज्यसिंहासनावर बसायचा अधिकार नाहीं.' धर्माला त्याचे शब्द झोंबले. सर्व नागरिकांनीं धिक्कार करून त्याला सभेंतून तोंड काळें करण्यास सांगितलें. पण तो लोचट तिथून हालेना. अखेर ऋषींनीं अंतर्ज्ञानानें त्याचें स्वरूप ओळखलें आणि त्याला शापून भस्म केलें.

मधेंच उपस्थित झालेलें हें आडमेळें दूर झाल्यावर धर्माचा राज्याभिषेक यथासांग पार पडला. द्रौपदी त्याच्या अर्धांगीं बसली. ब्राह्मणांनीं पुण्याहवाचन म्हटलें. आणि भगवंतानें आपल्या पांचजन्य शंखांत सप्तसागर आणि सप्त-सरिता यांचें जल भरून घेऊन स्वहस्तें धर्मराजाच्या मस्तकावर धार धरली. यौवराज्य भीमाला मिळालें. अपार दान-धर्म झाले. अगणित याचकांना भोजन मिळालें. कोणीहि भुकेला, असंतुष्ट राहिला नाहीं. धर्मानें राज्यारंभींच सर्वांचा दुवा मिळवला. त्यानें मग आपल्या चौघांहि बंधूंना प्रेमपाडिभरानें जवळ बोलावून म्हटलें.

'माझ्या प्रिय बंधूनो, आजवर तुम्ही खूप कष्ट सोसलेत. आधीं वनांत, मग रणांत. आतां सर्व सुखें भोगा. सर्वकाळ श्रीहरीचें स्मरण करीत आनंदांत रहा. काय उणें पडेल तें मला सांगा. राज्याची दगदग मी सोशीन. फळाचे अधिकारी तुम्ही व्हा!'

भीमादि बंधूंनीं माना तुकवल्या. ते त्याच्या आज्ञेत सर्वदा राहिले. हस्तिनापूर आनंदाचें आगार ठरलें. यथाकाळ पाऊस पडूं लागला. धरणीमाता महापूर पिकूं लागली. अवर्षण, दुष्काळ, उत्पात, अपमृत्यु, आधि-व्याधी यांची नांवनिशाणीसुद्धां धर्माच्या राज्यांत राहिली नाहीं.

# भीष्मनिर्याण

पुढें एक दिवस श्रीकृष्ण कष्टी मुद्रेनें एका जागीं बसून राहिला आहे असें धर्मानें पाहिलें. त्याचें चित्त गजबजलें. 'देवा काय झालें तुला ?' म्हणून तो त्याची आळवणी करूं लागला. त्यावर कृष्ण म्हणाला, 'युधिष्ठिरा, काय सांगूं तुला ? माझा जिवींचा भक्त भीष्माचार्य कुरुक्षेत्रावर शरपंजरीं पहुडला आहे. त्यानें माझें अखंड स्तवन चालविलें आहे. तिकडे आज माझें मन ओढतें. त्यामुळें चैन पडत नाहीं. चल, आपण त्याच्या दर्शनाला जाऊं. तुझेंहि मोठें कार्य होईल. राजधर्म, मोक्षधर्म हे सर्व तुला त्याच्या मुखानें स्वच्छ कळतील. तुला परमज्ञान लाभेल.'

धर्माला तें मानवलें. त्यानें लगेच रथ सिद्ध केला. दोघेहि कुरुक्षेत्राकडे भरधांव निघाले. त्यांच्या पाठोपाठ इतरांनींहि आपले रथ घालाणले. सर्वांनीं भीष्माचार्यांपुढें येऊन त्यांना प्रणाम केले. देवानें त्याला कुशल विचारलें. त्याच्या ब्रह्मचर्याची आणि सामर्थ्याची थोरवी स्वमुखें गायिली. सर्व जण शरशय्येभोंवतीं मंडलाकार बसल्यावर भगवान् त्यांना म्हणाला.

"आचार्य, धर्मराजाचें मन आजमितीस ठिकाणावर नाहीं. कुलक्षयाच्या कल्पनेनें तो बहुत हिंपुटी झाला आहे. तुम्ही त्याला खऱ्या धर्माचा उपदेश करून शांत आणि प्रसन्न करावें."

त्यावर भीष्माचार्य बोलले.

"देवा, तूं सकल ज्ञानांचा सागर त्याचा साक्षकारी असतांना मीं आणखी काय सांगावें ! तुझ्यापुढें माझें ज्ञान म्हणजे कःपदार्थ !"

पण देवानें त्यांनाच आग्रह केला आणि त्यांच्या आज्ञेनें भीष्माचार्य युधिष्ठिराला धर्मोपदेश करूं लागले.

"राजा युधिष्ठिरा, तूं क्षत्रिय आहेस. क्षत्रियाचा मुख्य धर्म म्हणजे जो युद्धाला येईल त्याला तोंड देणें आणि पाठ कधींहि न दाखविणें. राजानें क्षमा करावी; पण प्रसंगीं कठोरहि व्हावें. खळाला दंड करतांना दया-माया धरूं नये. प्रजेकडून कर अवश्य घ्यावा; पण तिला पिळून मात्र नव्हे. वृक्षाचें फूल खुडावें; पण शाखा तोडूं नयेत हें तत्त्व कर घेतांना लक्षांत ठेवावें. गर्भिणी गर्भाचें पोषण

करते तसें प्रजेचें पालनपोषण करावें. प्रजेला सर्व प्रकारें निर्भय करावें. अंतःकरण लोण्याहून मृदु असावें; पण डोळे वाघासारखे असावे. दुष्टांना धाक वाटेल अशी मुद्रा ठेवावी. राजकारणांतले डावपेंच उघड करूं नयेत. वित्तासारखाच मंत्रहि गुप्त राखावा. कुटिल, कपटी, स्वार्थी लोक ओळखून ठेवावे. प्रपंच-परमार्थ समान बुद्धीनें चालवावे.

"अन्नसत्रें ठेवावीं. पाण्याची टंचाई असेल तिथें वापी, कूप, तडाग खोदावे. उद्यानें थाटावीं. वृक्ष लावावे, वाढवावे. पूर्ण विचारावांचून कोणत्याहि कार्यासाठीं पाऊल पुढें टाकूं नये. येणाऱ्या-जाणाऱ्या द्रव्याचा नीट हिशेब ठेवावा. शत्रू फोडावे, मित्र जोडावे. आपल्या राष्ट्राशीं द्रोह करून शत्रूची हेरगिरी पत्करणाऱ्या घातक्यांचा समूळ उच्छेद करावा."

अशाप्रकारें राजधर्माचें सविस्तर विवेचन करून भीष्माचार्यांनीं पुढें युधिष्ठिराला आपद्धर्म, मोक्षधर्म, वगैरेंचेंहि कथन केलें. धर्मराजाचें अस्वस्थ झालेलें मन निवलें, शांत झालें. सगळीं किल्मिषें दूर झालीं. धर्मराज आपल्या कर्तव्याला निरामयपणें सन्मुख झाला.

एवढ्यांत उत्तरायण लागलें. भीष्माचार्य त्याचीच वाट पाहात जीव धरून राहिले होते. त्यांनीं मग निर्याण करायचें ठरविलें. विदुर, कृपाचार्य, व्यास-नारदादि मुनीश्वर त्यांच्या भोंवतीं गोळा झाले. भगवान् श्रीकृष्ण त्यांना अंतकाळीं सन्मुख झाला. त्या दिवशीं माघ शुद्ध अष्टमी होती. सूर्य माध्यान्हीं आला होता. भीष्मांनीं सर्वांचा निरोप घेतला. मनमोहन श्रीहरीचें रूपडें आवडीनें न्याहाळलें. जसा बाहेर होता तसाच तो हृदयांत भरून घेतला. मग 'तत्त्वमसि' या महावाक्याचें चिंतन केलें. योगधारणेनें पंचप्राणांचें आकर्षण केलें. मग त्यांच्या देहांतली आत्मज्योत दशमद्वार भेदून वर गेली आणि परब्रह्मांत समरस झाली. एकच जयजयकार उठावला. देवांनीं पुष्पवृष्टि केली. स्वर्गांत दुंदुभी वाजल्या.

पांडवांच्या नेत्रांतून अश्रुधारा लोटल्या. युधिष्ठिरानें त्यांचें यथाविधि उत्तरकार्य केलें. त्यांच्या नांवें अपार दानधर्म केले. तेरा दिवसांनंतर पांडव हस्तिनापुरांत आले आणि ऋषि-मुनी भीष्मांची कीर्ति वाखाणीत स्वस्थानीं निघून गेले.

# धर्मराजाचा अश्वमेध

पुढें कांहीं दिवसांनीं वेदव्यास पांडवांकडे आले. धर्माचें आणि त्यांचें बराच वेळ बोलणें झालें. धर्मानें त्यांच्याकडे अश्वमेध यज्ञ करण्याची अनुज्ञा मागितली. व्यासांनीं ती आनंदानें दिली. ते म्हणाले, 'तूं अश्वमेध अवश्य कर. तो सर्व पातकांचा क्षय करणारा आहे.' श्रीकृष्णानेंहि त्या कार्याला अनुमोदन दिलें. युधिष्ठिरानें सर्व तयारी केली. योग्य मुहूर्त धरून ऋत्विजांनीं धर्माला यज्ञदीक्षा दिली. श्यामकर्ण अश्वाची पूजा करून धर्मानें त्याला विश्वसंचारासाठीं मोकळें केलें. अर्जुन त्याच्या संरक्षणासाठीं सैन्य घेऊन निघाला. अनेक क्षत्रिय राजे त्याच्या मदतीसाठीं मागून चालले.

तो यज्ञाश्व प्रथम त्रिगर्तांच्या देशांत गेला. त्रिगर्तांनीं त्याला अडवून बांधलें. अर्जुनाचें त्यांच्याशीं युद्ध झालें. त्रिगर्तांचा पाडाव करून अर्जुनानें अश्व सोडवून घेतला. पुढें प्राग्ज्योतिषाचा वज्रदत्त भेटला. अर्जुनानें त्याचाहि पराभव करून घोडा सोडविला. पुढें तो श्यामकर्ण मन मानेल तसा संचार करीत असतां मणिपूरच्या राज्यांत शिरला. तिथें अर्जुनापासून झालेला चित्रांगदेचा पुत्र बभ्रुवाहन राज्य करीत होता. आपला पिता राज्यांत आलेला आहे हें समजतांच बभ्रुवाहन त्याचा सत्कार करण्यासाठीं नम्रपणें पुढें आला. त्याचें हें कृत्य अर्जुनाला मानवलें नाहीं. तो म्हणाला.

"तुझें हें वागणें क्षात्रधर्माला शोभण्याजोगें नाहीं. मी इथें तुझा पिता या नात्यानें आलों नसून यज्ञाश्वाचें संरक्षण करण्यासाठीं आलों आहें. तूं माझ्याशीं युद्ध पुकारायचें तें सोडून एखाद्या स्त्रीसारखा खालीं मान घालून मजपुढें आलास. धिक्कार असो तुझा!"

बभ्रुवाहनाला ते शब्द लागले. त्याच्या रक्तांतलें क्षात्रतेज एकदम उसळून उठलें. तो बोलला. 'ठीक आहे. मग युद्धच घे तर!' लगेच त्यानें आपला दळभार सज्ज केला. चिलखत आणि शिरस्त्राण घालून तो आघाडीवर उभा राहिला. पिता-पुत्रांची शरवृष्टि सुरू झाली. बभ्रुवाहनानें ख्याति केली. अर्जुनाला अनेक तीक्ष्ण बाणांनीं जर्जर करून सोडलें. पार्थाला एका बाजूनें वेदना होत होत्या; पण दुसऱ्या बाजूनें पुत्राचें रणपांडित्य पाहून आनंदाच्या उर्मी येत होत्या. तो म्हणाला. 'शाबास माझ्या पुत्रा! मी संतुष्ट झालों.

आतां सावध व्हें का ! हे पहा तुझ्या हृदयाचें विधान करणारे प्रखर बाण माझ्याकडून सुटूं लागले.'

पण बभ्रुवाहन अर्जुनाचे बाण वरच्यावर तोडूं लागला. अर्जुनानें त्याच्या रथाचे घोडे मारले, तेव्हां तो भूमीवरूनच लढूं लागला. अर्जुन थोडा कनवाळूपणेंच लढत होता; पण बभ्रुवाहनाला मात्र चेव भरला होता. त्यानें एक उत्तम लखलखीत बाण जोडून अर्जुनाच्या हृदयाचें विधान केलें. तो बाण अर्जुनाच्या वर्मी भेदला. अर्जुन घायाळ होऊन धरणीवर निश्चेष्ट पडला. एका क्षणांत त्याचें प्राणोत्क्रमण झालें.

आपला बाप आपल्या हातून मरण पावला हें पाहातांच बभ्रुवाहनालाहि मूर्च्छा आली. तोहि तात्काळ धरणीवर कोसळला. नगरांत चित्रांगदेला बातमी कळली कीं, पिता-पुत्र दोघेहि रणभूमीवर निजले. ती हृदय पिटीत, कांपत, थरथरत तिथें आली. तिनें अर्जुनाजवळ बसून विलाप मांडला. अर्जुनाची आणखी एक भार्या नागकन्या उलूपी हीहि तिच्याबरोबर तिथें आली होती. पण तिनें चित्रांगदेसारखा आकांत केला नाहीं. थोड्याच वेळांत बभ्रुवाहन शुद्धीवर आला. आपली माता अनावर शोक करीत आहे, ती प्रायोपवेशन करून प्राणत्याग करायला निघाली आहे हें पाहून बभ्रुवाहन परमदुःखित झाला. पितृघातानें महत्पाप आपण आचरलें या जाणिवेनें त्या वीरपुंगवाचें तोंड उतरलें.

त्याची ही शोकाकुल अवस्था पाहून उलूपीला कळवळा आला. तिनें नागलोकींच्या संजीवन मण्याचें चिंतन केलें. लगेच तो तिच्या हातीं आला. तो तिनें पार्थाच्या हृदयावर ठेवतांच तो उठून बसला. जणूं आपण गाढ निद्रेतून जागे झालों असें त्याला वाटलें. बभ्रुवाहनाचा हर्ष गगनांत मावेना. त्यानें पुढें येऊन अर्जुनाचे चरण वंदिले. आपल्या दोघीहि स्त्रिया रणभूमीवर कां आल्या तें त्याला समजेना. त्यानें बभ्रुवाहनाला प्रश्न केला कीं, 'हा काय प्रकार आहे ?' बभ्रुवाहन म्हणाला. 'हें सर्व आपण उलूपीला विचारा.'

लगेच उलूपी पुढें झाली. ती म्हणाली. 'महाराज, मींच ही सगळी घटना घडवून आणली. भारतीय युद्धांत तुम्हीं भीष्माचार्यांना शिखंडीला पुढे करून मारलेंत. हा तुमच्या हातून अधर्म झाला. त्याची निष्कृति झाल्यावांचून तुम्हीं

देहत्याग केला असता तर अक्षय नरकाचे धनी झाला असतां. तुमचा क्षणभर मृत्यु हेंच त्या पातकाचें प्रायश्चित्त होतें. भीष्मांची माता गंगा हिनेंच तें ठरवलें होतें. म्हणून मीं तें घडवून आणलें.'

अर्जुनानें हें ऐकलें आणि तो उलूपीवर प्रसन्न झाला. त्यानें बभ्रुवाहनाचेंहि कौतुक केलें. त्याला अश्वमेधाचें निमंत्रण देऊन तो पुढें निघाला. नंतर मगधेश्वराचा आणि दशार्णाधिपति चित्रांगदाचा पराभव करून तो गांधार देशांत गेला. तिथें शकुनिपुत्राचें आणि त्याचें घोरांदर रण झालें. त्यालाहि अर्जुनानें जिंकलें. मग त्याचा घोडा हस्तिनापुराच्या दिशेनें परतला. पार्थ विजयी होऊन आलेला पाहून धर्म आणि श्रीकृष्ण यांना परमानंद झाला.

धर्मराजाचा अश्वमेध यथासांग पार पडला. ऋत्विजांना दक्षिणा द्यायच्या वेळीं धर्म व्यासांना म्हणाला. 'अश्वमेधांत पृथ्वी हीच दक्षिणा सांगितलेली आहे. म्हणून मीं ही जिंकलेली पृथ्वी आपणांस दान करीत आहें. मी आतां माझ्या भावांसह वनांत जाईन आणि उर्वरित आयुष्य तिथें घालवीन.' धर्माचें हें उदार भाषण ऐकून 'धन्य युधिष्ठिर' अशी आकाशवाणी झाली. व्यासांनींहि त्याची प्रशंसा केली. ते म्हणाले.

"मला दान दिलेली पृथ्वी मी तुला परत देत आहें. तूं आम्हांला तिच्या-ऐवजीं द्रव्य अर्पण कर आणि पृथ्वीचें यथायोग्य पालन कर."

धर्मानें व्यासांची आज्ञा मानली. ब्राह्मणांना अपार सोनें दिलें. त्यांची तृप्ति झाल्यावर उरलें तें इतर सर्व याचकजनांकडून लुटवलें. सर्वांना यथेष्ट भोजन घातलें. धर्माची सर्वत्र प्रशंसा होऊं लागली. जो तो म्हणूं लागला. 'असा अश्वमेध आजवर झाला नाहीं. अशी दक्षिणा कोणीं दिली नाहीं. असें अन्नसंतर्पण कोणीं केलें नाहीं.'

एवढ्यांत एक मुंगूस तिथें आला. त्याचे डोळे निळे होते आणि अर्धे अंग सोन्याचें होतें. त्यानें धर्माकडे पाहून त्या भरल्या सभेंत धीटपणानें म्हटलें. 'राजा! तुझ्या या अश्वमेधाची सगळे जण वाहवा करतात. पण मी स्वच्छ सांगतों कीं, कुरुक्षेत्रांत वास्तव्य करणाऱ्या एका ब्राह्मणानें एक प्रस्थ सातूंचें पीठ दान दिलें, त्याची सर कांहीं तुझ्या या यज्ञाला येणार नाहीं.'

हें त्या मुंगुसाचें भाषण ऐकून सर्वांनाच आश्चर्य वाटलें. इथें दान-दक्षिणेचे महापूर लोटले, असंख्य याचकांना इच्छाभोजनें झालीं आणि हा क्षुद्र प्राणी ब्राह्मणाच्या एक प्रस्थ सातूच्या पिठाची याच्यापुढें मातब्बरी मांगतो म्हणजे काय गोष्ट आहे! सर्वांनीं त्याला धरलें आणि म्हटलें. 'तुझें विधान सिद्ध कर.' त्यावर तो मुंगूस सांगूं लागला.

"कुरुक्षेत्रांत एक ब्राह्मण होता. तो धन्यानें कापून नेलेल्या शेतांतला एकेक दाणा टिपी आणि मिळालेल्या धान्यकणांची पाकसिद्धि करून पंचमहायज्ञ संपादी आणि आपली उपजीविका करी. कांहीं काळानें त्या देशांत भयंकर दुष्काळ पडला. ब्राह्मणाचें कुटुंब उपासमारीनें तळमळूं लागलें. असे काहीं दिवस गेले. त्यानंतर एके दिवशीं एका शेतांत दाणे वेचतां वेचतां एक प्रस्थ यव त्याला मिळाले. त्याच्या भार्येनें त्यांचें पीठ केलें. ब्राह्मणानें त्यावर वैश्वदेव केला. आतां तें पीठ सगळीं वांटून घेऊन भोजनाला बसणार एवढ्यांत एक अतिथि दारीं आला. तो अत्यंत क्षुधित होता. अन्नकणा-वांचून जणूं मरणाच्या दारीं पोंचला होता. ब्राह्मणानें त्याची पूजा केली आणि आपल्या वांट्याचें पीठ त्याला देऊन टाकलें. त्यानें तें आधाशीपणें खाल्लें; पण तेवढ्यानें त्याचें समाधान झालें नाहीं. तें पाहून त्याच्या बायकोनें, मुलानें, सुनेनें सर्वांनीं आपला वांटा त्याला अर्पण केला. अतिथि तृप्त झाला; पण तें कुटुंब मात्र भुकेलेंच राहिलें.

"तो अतिथि म्हणजे साक्षात् यमधर्म होता. ब्राह्मणाची सत्त्वपरीक्षा पहाण्या-साठीं तो अतिथिवेषानें आला होता. त्यानें प्रसन्न होऊन ब्राह्मणाला म्हटलें. 'तूं न्यायानें मिळवलेली वस्तु श्रद्धेनें दान दिलीस. अतिथिसंतर्पणाच्या प्रसंगीं स्वतःची भूकहि लक्षांत घेतली नाहींस. तुझें हें दान म्हणजे सर्वस्वाचें दान आहे. खूप दिलें, अपरंपार दिलें, म्हणून तें दान मोठें नव्हे. अल्प, अत्यल्प का असेना; पण जें होतें नव्हतें तें सर्व आणि श्रद्धेनें दिलें असेल तर त्याची योग्यता मोठी. तूं या दानानें स्वर्गाचा अधिकारी झालास. कोणी राजसूय करील, कोणी अश्वमेध करील, पण तूं दिलेल्या या दानाचें महत्त्व त्याला मिळणार नाहीं.' "

असा हा वृत्तांत सांगून मुंगूस म्हणाला. "त्याच वेळीं मी बिळांतून बाहेर

आलों असतां ब्राह्मणाच्या त्या सातूंच्या पीठाचे कांहीं कण माझ्या अंगावर उडाले आणि त्यामुळें माझें अर्धें अंग सुवर्णाचें झालें. उरलेलें अर्धें अंगहि तसेंच सोन्याचें करून घ्यावें म्हणून जिथें जिथें यज्ञ आणि दानधर्म झाले तिथें तिथें मी हिंडलों. धर्मराजा, तुझ्याहि यज्ञांत त्याच हेतूनें आलों. पण एवढ्या पर्वतप्राय अन्नराशींत लोळूनहि माझें अर्धें अंग अजून तसेंच राहिलें आहे. आणि म्हणूनच मी म्हणतो कीं, तुझा यज्ञ भव्य खरा; पण त्या ब्राह्मणाच्या सातूंच्या पिठाची सर याला नाहीं."

याप्रमाणें त्या मुंगुसानें भाषण केलें आणि सगळे लोक आश्चर्य करतात तोंच तो एकाएकीं अदृश्य झाला.

---



श्रीकृष्णाच्या पायाला व्याधानं हरिण समजून बाण मारला. —पृ ११६.

# अनुशासन ते स्वर्गारोहणपर्वें

धर्मराजा धृतराष्ट्राला योग्य तो मान देऊनच राज्य चालवीत असे. सगळे पांडव त्याची सेवा करीत असत. म्हातारा, किंवा मुळांतला कारस्थानी म्हणून कोणीं त्याची उपेक्षा केली नाहीं. अशीं पंधरा वर्षें लोटलीं. नंतर धृतराष्ट्राला उपरति झाली. आपलें शाश्वत कल्याण साधावें असें त्याला वाटलें. त्यानें युधिष्ठिराजवळ अखेरच्या वनप्रस्थानाची अनुज्ञा मागितली. धर्मानें ती मोठ्या कष्टानें दिली. त्यानें कृष्णाजिनें आणि वल्कलें परिधान केलीं. कार्तिकी पौर्णिमेस ब्राह्मणांकडून इष्टि करवून अग्नीसह तो आपल्या मंदिरांतून बाहेर पडला. त्याच्या पाठोपाठ गांधारी आणि कुंती या दोघीहि निघाल्या. विदुरानेंहि त्याच वेळीं प्रस्थान ठेवलें. शतयूप राजाच्या आश्रमांत धृतराष्ट्रानें वानप्रस्थाश्रमाची दीक्षा घेतली.

धर्मराजाला या वृद्धमंडळींचा वियोग जाणवूं लागला. त्याचें चित्त कुठेंच रमेना. धृतराष्ट्राचें, कुंतीमातेचें वनांत कसें होत असेल या विवंचनेनें त्याल अन्नपाणी गोड लागेनासें झालें. त्यानें त्यांच्या भेटीस जायचें ठरवलें. सगळे पांडव आणि द्रौपदी हीं त्याच्या समागमें चाललीं. शतयूपाच्या आश्रमांत येऊन त्यानें धृतराष्ट्राची भेट घेतली. कुंतीच्या चरणांवर मस्तक ठेवलें. सर्व मंडळी भेटली ; पण विदुर कुठें दिसेना. त्यानें धृतराष्ट्राजवळ चौकशी केली तेव्हां त्याला कळलें कीं, तो वायुभक्षण करून त्या शून्यारण्यांत कुठें तरी भटकत आहे. धर्मराजा त्याच्या शोधासाठीं निघाला. थोड्याच अंतरावर विदुर एका झाडाला टेकून उभा असलेला त्याला दिसला. तो अत्यंत कृश झाला होता. त्याचें सर्वांग धुळीनें मळलें होतें. धर्मराजानें त्याच्यापुढें उभें राहून ' मी युधिष्ठिर तुमच्या दर्शनासाठीं आलों आहें ' असें त्याला सांगितलें. विदुर जणूं त्याचीच वाट पाहात होता. त्यानें मुखांतून एकहि शब्द न उच्चारतां त्याच्या दृष्टीला दृष्टि भिडवली. इतकेंच नव्हे तर त्यानें योगबलानें आपले प्राण बाहेर काढून ते युधिष्ठिराच्या प्राणांत मिळवून टाकले. जाग्यावर उरलें तें शरीराचें अचेतन काष्ठ! त्यायोगें धर्माचें सामर्थ्य वाढलें. मग त्याला स्मरलें कीं, विदुर आणि आपण दोघेहि एकाच यमधर्माच्या

अंशाचे आहेत. तो विदुराचा शोक करूं लागला तेव्हां आकाशवाणीनें त्याला त्यापासून परावृत्त केलें. तो मग धृतराष्ट्र, कुंती, गांधारी या सर्वांचे आशीर्वाद घेऊन बंधूंसह हस्तिनापुराला परतला.

नंतर धृतराष्ट्र गंगाद्वाराला जाऊन तप करूं लागला. एक दिवस तो गंगेंत स्नान करून आश्रमाकडे परतत असतां मोठा वारा सुटून रानाला वणवा लागला. या वणव्यांतून आपण बाहेर पडणें शक्य नाहीं हें पाहून तो मृत्यूला सन्मुख झाला. त्यानें तिथेंच पूर्वाभिमुख आसन घातलें. कुंती, गांधारी या दोघीहि त्याच्या मागें शांत मनानें भगवच्चिंतन करीत बसल्या. तो दावाग्नि सर्व बाजूंनीं जिभोळ्या चाटीत धृतराष्ट्राकडे येऊं लागला. थोड्याच वेळांत त्यानें त्या तिघांनाहि कवळून घेतलें. तिघांचेंहि तिथल्या तिथें प्राणोत्क्रमण झालें. नारदानें हस्तिनापुरांत येऊन ही वार्ता धर्मराजाच्या कानीं घातली. धर्म शोकविव्हल झाला. सर्वत्र रडारड सुरू झाली. नारदानें त्या सर्वांचें सांत्वन केलें. मग धर्मानें त्या तिघांनाहि तिलांजली दिली. त्यांचें यथाविधि और्ध्वदेहिक केलें. हीं सगळीं वडीलधारीं माणसें एकाएकीं कालवश झाल्यामुळें धर्माचें चित्त राज्यकारभारावरून उडालें. तो व्यथित अंतःकरणानें दिवस घालवूं लागला.

## यादवांचा संहार

इकडे द्वारकेंत यादव माजले. त्यांच्या उद्धटपणाला सीमा उरली नाहीं. एकदां द्वारकेंत विश्वामित्र, कण्व, नारद इत्यादि मुनी आले असतां त्यांनीं त्या महाभागांची चेष्टा आरंभली. सांबाला गर्भिणी स्त्रीचा वेष देऊन ते त्यांच्यापुढें घेऊन आले आणि म्हणाले, 'ऋषिवर्य हो ! ही बभ्रूची बायको गर्भवती आहे. हिला कन्या होईल का पुत्र तें कृपा करून सांगा.' ते तपोधन या चेष्टेनें खवळून म्हणाले, 'या सांबाला कुलघातक असें एक मुसळ होईल !' यादव तें ऐकून घाबरले. ते सांबाचें लुगडें सोडतात तर आंत एक मुसळ खरोखरीच निर्माण झालें होतें. तें वर्तमान त्यांनीं भीत भीत राजाच्या कानांवर घातलें. राजा परम खिन्न झाला. त्यानें त्या मुसळाचें चूर्ण करून तें समुद्रांत नेऊन टाकायला लावलें. यादवांत अंतःकलह पेटणार याचीं जाणत्या लोकांना स्वप्नें पडूं लागलीं.

मग राम-कृष्णाच्या सांगण्यावरून राजानें नगरांत दवंडी पिटविली—

"आजपासून या नगरांतलें मद्यपान बंद. जो कोणी ही आज्ञा मोडील त्याला मुळीं देण्यांत येईल!"

यादवांतले जबाबदार पुरुष याप्रमाणें सर्वविषयीं सावध राहूं लागले. त्यांना संहार टाळायचा होता. पण कालपुरुष गुप्त रूपानें द्वारकेच्या घरा-घरांतून फिरूं लागला. रोज नवे नवे उत्पात होऊं लागले. सगळीकडे अस्वस्थता पसरली. श्रीहरीनें जाणलें कीं, कालचक्र उलटें फिरत आहे. त्यानें मग वसुदेवाला सांगून त्याच्या आज्ञेनें सर्व यादवांना समुद्रतीरीं पाठविलें. यादवसमुदाय स्त्रीजनांसह प्रभासक्षेत्रावर आला. तिथें डेरे, राहुट्या करून मुक्कामाला राहिला.

थोड्याच वेळांत तिथें नाचरंग सुरू झाले. मद्यपान पराकोटीला गेलें. सगळेच झिंगले, प्रमत्त झाले. बोलण्यावरून बोलणें वाढलें. उखाळ्या पाखाळ्या निघूं लागल्या. पाठोपाठ मारामारी सुरू झाली. कोणालाहि विवेक उरला नाहीं. प्रथम सात्यकि मेला. त्याच्याबरोबरच प्रद्युम्नहि ठार झाला. दुसरें कांहीं शस्त्र हातांत उरलें नाहीं असें पाहून त्यांनीं समुद्रतीरावरचे लव्हाळे उपटून घेतले. ते लगेच मुसळासारखे टणक झाले. ऋषींच्या शापानें जें वज्रमुसळ निर्माण झालें होतें आणि ज्याचें चूर्ण करून समुद्रांत टाकलें होतें, त्याचेच ते लव्हाळे बनले होते. त्याच शस्त्रांनीं ते महामारीस प्रवर्तले. त्या यादवींत बापांनीं मुलांना ठार केलें. मुलांनीं बापाला बाप म्हटलें नाहीं. थोड्याच कालांत सर्व यादवांचा संहार झाला. बभ्रु आणि दारुक हे दोघेच काय ते उरले. एवढ्या सगळ्या अंदाधुंदींत बलराम कुठें दिसला नाहीं. तेव्हां मग श्रीकृष्ण त्याचा शोध करायला गेला.

वनांत एकांतस्थळीं बलराम योगमग्न होऊन बसला आहे आणि त्याच्या मुखांतून एक प्रचंड नाग बाहेर पडून समुद्राकडे चालला आहे असें श्रीकृष्णाला दिसलें. हा नाग म्हणजे शेष होय. त्यानेंच बलरामाचा अवतार घेतला होता आणि तो अवतारसमाप्ति करून आपल्या मूलस्थानीं जात होता. अशा रीतीनें बलराम निजधामास गेलेला पाहून श्रीकृष्णालाहि आपला अवतार संपविण्याची इच्छा उत्पन्न झाली. तो भटकत भटकत निघाला आणि एका वृक्षतळीं उजव्या पायावर डावा पाय आडवा ठेवून टेकून

बसला. त्यानें इंद्रियें, मन व वाणी यांचें पूर्ण नियमन केलें. आतां देह सोडायला कांहीं तरी निमित्त हवें होतें म्हणून तो त्याची वाट पहात बसला.

एवढ्यांत एक पारधी हरणाचा माग काढीत त्या रानांत फिरत होता, तो तिथें आला. त्यानें दुरून पाहिलें तर त्याला कृष्णाचा तो आडवा पाय हरिणासारखा दिसला. लागलीच त्यानें धनुष्याला बाण जोडून तो त्यावर सोडला. तो सरळ कृष्णाच्या तळशायांत रुतला. मागोमाग त्याला कळलें कीं, आपण भलतीच चूक केली. धांवत जाऊन त्यानें देवापुढें लोटांगण घातलें आणि क्षमायाचना केली. कृष्णानें त्याचें सांत्वन केलें आणि आपल्या तेजानें पृथ्वी आणि अंतराळ यांमधील अवकाश भरून काढीत वैकुंठीं गमन केलें. इंद्रादि लोकपाल, गंधर्व, सिद्ध, विश्वेदेव हे सगळे जयजयकार करीत त्याला सामोरे आले. भगवान् मूलस्थानीं परत आल्याचें पाहून स्वर्गांतल्या देवमंडळीला परम आनंद झाला. पृथ्वी मात्र शोकांत बुडाली.

मग दारुक हस्तिनापुरांत जाऊन पांडवांना भेटला. त्यानें द्वारकेंतलें सगळें वर्तमान धर्मराजाला निवेदिलें. आपला साह्यकारी श्रीकृष्ण गेल्याचें ऐकून धर्मराजा परम दुःखित झाला. त्याच्या आज्ञेनें अर्जुन द्वारकेंत जायला निघाला. द्वारका एखाद्या विधवा स्त्रीसारखी त्याला दिसली. अर्जुनाला पहातांच श्रीकृष्णाच्या सर्व स्त्रियांनीं आकांत मांडला. अर्जुनालाहि रडें कोसळलें. वसुदेवानें अर्जुनाच्या देखत देहत्याग केला. अर्जुनाच्या पाठोपाठ द्वारकेंतल्या सर्व स्त्रिया आणि प्रजाजन बाहेर पडले. द्वारका अशा प्रकारें निर्जन, निस्सत्त्व होतांच समुद्रानें तिला बुडवून टाकलें.

अर्जुन द्वारकेंतल्या स्त्रियांना घेऊन हस्तिनापुरांत येत असतां वाटेंत पंच-नद्यांचा प्रदेश लागला. तिथें आभीर नांवाच्या रानटी लोकांची वस्ती होती. अर्जुनाबरोबर एवढा प्रचंड स्त्रीसमुदाय आहे हें पाहून त्यांच्या मनांत पाप शिरलें. अर्जुनाबरोबर लढून आणि त्याचा पराभव करून त्या यादवस्त्रियांना त्यांनीं पळवून नेलें. ज्या कांहीं थोड्याबहुत म्हाताऱ्या कोताऱ्या राहिल्या, त्यांना घेऊन अर्जुन हस्तिनापुरांत आला.

## पांडवांचें महाप्रस्थान

द्वारकेंतला हा सगळा विपरीत प्रकार ऐकून धर्मानेंहि मग इहलोकींची यात्रा

संपवण्याचें ठरवलें. त्यानें महाप्रस्थानाला निघण्याचा आपला विचार बंधूंस सांगितला. त्यांनींहि त्याला ताबडतोब संमति दिली. लगेच युधिष्ठिर निरवानिरवीस लागला. त्यानें परीक्षिताला राज्याभिषेक करून राज्य त्याच्या हवालीं केलें. पहिल्या दिवशीं उपवास करून दुसऱ्या दिवशीं पांच पांडव, सहावी द्रौपदी आणि सातवा धर्मराजाचा एक कुत्रा एवढ्या मंडळींनीं नगरांतून बाहेर पडून प्रथम पूर्व दिशा आणि नंतर उत्तर दिशा धरली. क्रमानें ते हिमालयाच्या पायथ्याशीं पोंचले आणि हळूहळू वर चढूं लागले. हिमालय आक्रमून तीं सगळीं मेरुपर्वताकडे पोंचलीं. तोहि महागिरि त्यांना चढायचा होता.

पण त्या चढणींत द्रौपदी प्रथम पडली आणि तिचें प्राणोत्क्रमण झालें. धर्म म्हणाला, "द्रौपदी पांच पांडवांत अर्जुनाचा विशेष पक्षपात करीत होती. त्या पापामुळें तिचें पतन झालें." एवढी शहाणी सुरती जन्माची सोबतीण गेली; पण धर्मानें आपलें चित्त विचलित होऊं दिलें नाहीं. तिच्या पाठोपाठ सहदेव पडला. 'आपल्यासारखा ज्ञानी कोणीच नाहीं, या गर्वानें तो फुगला होता, म्हणून तो सदेह स्वर्गाला जाऊं शकला नाहीं,' असें धर्मराजानें त्याचें कारण सांगितलें. त्याच्यामागून नकुलाचीहि तीच दशा झाली. सौंदर्याचा गर्व हें त्याचें पाप होतें. त्यानंतर अर्जुनहि पतन पावला. 'मी एका दिवसांत सगळ्या शत्रूंना दग्ध करीन' ही प्रतिज्ञा त्यानें केली होती; पण तो ती पुरी करूं शकला नाहीं, हें पातक त्याला निमित्त झालें. मागाहून भीमहि पडतां पडतां म्हणाला, 'दादा, अरे मी काय पाप केलें होतें?' धर्मानें उत्तर दिलें कीं, 'तुला बळाचा अभिमान जडला होता.'

अशा रीतीनें धर्माचे सगळे बंधू एकामागून एक मरण पावले. उरला तो एकटा कुत्रा. तो मात्र त्याच्या बरोबरीनें पुढें पुढें जात होता. अशा प्रकारें धर्मानें स्वर्गाचें बरेंच अंतर तोडलें. एवढ्यांत एक सुंदर, तेजस्वी रथ घेऊन देवेंद्र त्याला सामोरा आला. धर्माचें अभिनंदन करून त्यानें सांगितलें कीं, 'या रथांत बसून स्वर्गांत ये.' त्यावर धर्म म्हणाला.

"माझी पत्नी आणि चौघेहि बंधू वाटेंत मरून पडले आहेत. तेहि माझ्यासमागमें स्वर्गांत यावे अशी माझी इच्छा आहे. त्यांना सोडून मी येणार नाहीं."

त्यावर इंद्रानें त्याला सांगितलें कीं, ' ती सर्व मंडळी तुझ्या आधींच स्वर्गांत जाऊन पोंचली आहे. ' धर्माला समाधान वाटलें. तो त्या कुत्र्याला घेऊन रथांत बसायला निघाला. तेव्हां त्याचा निषेध करून इंद्रानें म्हटलें, ' अं हं ! हा कुत्रा तुझ्याबरोबर येऊं शकणार नाहीं. तूं याला सोडून दे. ' त्यावर धर्म बोलला, ' तें शक्य नाहीं. यानें इथवर मला सोबत केली आहे. कसल्याहि संकटांत तो मला सोडून मागें राहिला नाहीं. आश्रिताचा त्याग करणें हें महत्पाप आहे. मी तें करणार नाहीं. याला सांगातीं घेऊन जर मला स्वर्गांत पाऊल ठेवतां येत नसेल तर मला तो स्वर्ग नको ! '

धर्माचें हें निर्धाराचें भाषण ऐकून त्या कुत्र्यानें आपलें मूळ रूप प्रगट केलें. तो कुत्रा नसून साक्षात् धर्म होता. त्यानें युधिष्ठिराची प्रसंशा केली. तो म्हणाला, ' तूं माझ्या कसोटीला उतरलास. याच तुझ्या पुण्याईमुळें तुला सदेह स्वर्गांत स्थान मिळणार आहे. ' त्यानंतर युधिष्ठिरानें त्या रथांत बसून स्वर्ग-लोकीं प्रयाण केलें. तिथें त्याला सर्व देव आणि त्याचे पूर्वज भेटले. त्यांनीं त्याला प्रथम नरकाचें दर्शन घडवलें. नंतर बंधूंची आणि द्रौपदीची भेट घडवली. नंतर यमानें त्याला सांगितलें कीं, ' इथले दिव्य भोग तुला आतां अक्षय्य मिळणार आहेत. पण ते तुला या देहानें भोगतां येणार नाहींत ; तरी तूं आतां या मनुष्यदेहाचा त्याग कर. ' युधिष्ठिरानें ती आज्ञा मानली. त्यानें आकाशगंगेंत स्नान करतांच त्याचा मानवदेह गळाला आणि त्याला दिव्य देह प्राप्त झाला.

वैशंपायनानें जनमेजयाला आणि सौतीनें शौनकादि ऋषींना हें महाभारत सांगितलें. या पवित्र ग्रंथाला इतिहास अशी संज्ञा आहे. भगवान् वेदव्यासांनीं योगसमाधींत ईश्वरी तेज अंगीं प्रगटलें असतां हा महान् ग्रंथ निर्माण केला. विस्तार आणि भार या दोन्ही कारणांमुळें याला महाभारत असें नांव मिळालें आहे. वेद, स्मृति, पुराणें, धर्मशास्त्रें हीं या ग्रंथांत साररूपानें समाविष्ट झालीं आहेत. हें महाभारत जो श्रवण करील, त्याचे सकल मनोरथ पूर्ण होतील आणि अंतीं तो मोक्षाचा अधिकारी होईल.

---

# मोरोपंतांच्या आर्याभारताचा उपसंहार

श्रीमान् सर्वश्रेष्ठ ग्रंथांच्या पूज्य हा जय[1] शतातें
ज्यांत शुकाच्या केलें प्रकट कथुनि धर्मराजयश तातें १
दिधलें सत्यवतीच्या[2] पुण्ययश अनंत शर्म दायादें
यांत कविकुळें, न तसीं यमुनासुरसिंधुनर्मदायादें. २
न स्तवित्यासि म्हणा, ‘जिभ जरि न धरिल मौन कापुनि वहा रे!’
बा! शारदी[3] हि याच्या कीर्तिपुढें शौनका! पुनिव हारे. ३
या ग्रंथा आदरितिल जे हरिहरदास साधु सुरसिक, ते ;
वाटे नरलोकीं जरि असते, तरि परिसतां चि सुर सिकते[4]. ४
शीलजितामर[5]चंदनतन्नंदन पांडुरंगराय हि तें
यश मिरवितो ; प्रजांचीं करि दशरथसा न राम काय हितें ? ५
श्रीगीतेच्या एकादशसंख्याचा जसा उपाध्याय[6],
केवळ भक्तिरसमय श्रीमदनंताख्य जो उपाध्याय. ६
तो होय शोभवुनि या कवनातें, साधु विप्र भासविता
निजतेजें श्री देउनि पंकरुहा[7] जेंवि विप्रभा सविता. ७
धन्य श्रीराम पिता, धन्या लक्ष्मी प्रसू जगीं झाली,
आली[8] सत्यवतीची[9], कीं, भारतकीर्ति सुतमुखीं आली. ८
श्रीनारदवाल्मीकिव्यासशुकप्रमुख जे कवीश्वर, ते
नमिले क्षमार्थ, ज्यांचें यश जाणुनि अमृतसेक विश्व रते ९
श्रीहरिजनरसिकसभे[10]! घे निजगुण, जरि मयूर चुकला, गे
कीं, बोलका नव्हे हा ; शिक्षित बोलावयासि शुक लागे. १०

---

१ महाभारत. २ सत्यवतीचा सुत जो व्यास त्यानें. ३ कार्तिकी पौर्णिमासुद्धां धर्मराजाच्या यशापुढें फिकी पडते. ४ अध्ययन करिते. ५ शांत व सुखकर स्वभावानें चंदनवृक्षाला जिंकणारा. ६ जवळचा अध्याय. ७ कोमजलेल्या कमळास. ८ सखी. ९ व्यासमातेची. १० भगवद्भक्त आणि रसिकहो.

चुकलों, तदपि न चुकलों ; कीं जें बहुमत शुकादिसन्मुनितें,
म्यां गायिलें यथामति सच्चरित चि सत्प्रियार्थ जन्मुनि तें ११
चुकलों म्हणोनि, तो हरिहरभक्त क्षोणिसुरसभे[1] ! लाजो,
घे बाळ शर्करेचा[2], न च मानुनि गार, सुरस मेला[2] जो १२
साधुसभे सुरभी तूं पोषिसि कवितर्णका[3], महाभागे !
परिससि बाळवचन बहु, परि न तुझा कर्णकाम हा भागे १३
साधुसभे ! भगवत्पदपद्मार्पित सर्व वस्तु तुज रुचलें
यास्तव समर्पिलें हें कवन श्रीपतिपदीं ; भलें सुचलें. १४
हरिपदसमर्पिता या, मैत्री हरिपदनमज्जना[4], कवना
लज्जा म्हणेल, होउनि शीघ्र अधोवदन, मज्जे नाकवना[6] ! १५
श्रीगुरुपदपद्मार्पित हा ग्रंथ महाप्रसाद जाणावा,
सज्जन हो ! मज्जन हो यांत, मनाँ त्यांत दोप नाणावाँ. १६
छंद:शास्त्रीं आद्या सन्मान्या जसि सतीगणीं आर्या,
आर्या हे सद्रसिका जेंवि शिवा ती तसि प्रिया आर्या. १७
अष्टादशपर्व जयग्रंथकथा आपणांत आर्यांनीं
आणिलि, जसि आणावी आर्या बहुमान करुनि आर्यांनीं. १८
शुद्धें अचंचलमनें अवलोकाव्या बुधें जशा आर्या
निःशेषपापतापव्यापत्प्रशमार्थ[9] या तशा आर्या. १९
ज्यांच्या गानें व्हावें प्रेमाश्रुक्षपितचंदन मयूरें
आर्या समर्पिल्या हरिचरणीं श्रीरामनंदन मयूरें. २०

१ ब्राह्मणसभे ! २ साखरेचा खडा. ३ कविरूप वत्साला. [illegible] हरिपदीं नम्र झालेल्या लोकांबरोबर ५ बुडून जा. ६ नंदनवना. ७ मनाव [illegible]. ८ पतिव्रता स्त्रिया. ९ सर्व पाप व ताप यांमुळें होणारी जी अति विपत्ति तिच्या निरसनार्थ.